# अजिता

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

कु. सरोजिनी बाबर, एम्. ए.

किंमत २ रुपये



कु. सरोजिनी बाबर
यांचें वाङ्मय

कमळाचं जाळं

अजिता

साहित्यदर्शन भाग १ ला

वडीलधारीं माणसें

बालनाटिका भाग १ ते ४

भारतीय स्त्रीरत्नें
भाग १ व २

मानवी प्रवास



# टिक्....टिक्....टक्....टक्.... १

'अयाई ग ऽऽ'

असं नकळत म्हणतच चुलीपुढची राख भरून लक्ष्मी कशीबशी उठली. सकाळीं उठल्यापासून तों आतां दुपारचीं जेवणं होऊन जाईपर्यंत तिच्या हाताला कसला तो दम नव्हता. केरवारा, धुणंपाणी, दळण, स्वयंपाक, मुलांच्या आंघाळी, निवडणं टिपणं वगैरे सारं घरांतलं काम लक्ष्मीच्याच गळ्यांत असल्यामुळं दुपारच्या वेळीं ती अगदीं थकून जाणं स्वाभाविक होतं. तशांतच तिचे दिवस भरत आल्यामुळं तिला तो थकवा आज विशेष जाणवत होता. त्यामुळं चटकन् न्हाणीवर जाऊन राखेनं भरलेला हात धुवायचा म्हणजे देखील लक्ष्मीच्या जिवावर आलं. अखेर गडबडीनं कसाबसा हात धुऊन ती माजघरांत आली आणि तिथं असलेल्या दाण्याच्या पोत्याशेजारीं एक घोंगडं टाकून हळूच आडवी झाली.

पोटांत वाढत असलेल्या बाळाच्या ओझ्यानं आणि त्याबरोबरच यांतून आपली सुटका कशी होईल या काळजीनं लक्ष्मीला एवढं दमल्यासारखं वाटत होतं कीं, एरव्हीं चोवीस तास काम केलं तरी न थकणारी लक्ष्मी आतां पडल्यापडल्याच आपला हातसुद्धां एका जागेवरून दुसऱ्या जागेवर उचलूं शकत नव्हती! त्यामुळं तिथं पडल्या पडल्याच

अंगाबरच्या पातळाचा पदर आपल्या तोंडावर ओढून घेत ती किंचितशी उजव्या कुशीवर बळली आणि तिनं आपले डोळे मिटून घेतले.

तसं पाहिलं तर लक्ष्मी अंगापेरानं चांगली दणकट होती लहानपणापासून तिला कामाची संवय असल्यानं तिचे हातपाय चांगले कणखर बनले होते. सुंदर शरीरयष्टि असलेली लक्ष्मी वर्णानंहि चांगली गोरीपान असल्यामुळं चार बायकांत सहज उठून दिसायची. तिच्या अंगाखांद्यावर फारसे दागिने नसले तरी गळयांत रुळणारी सोन्याची बोरमाळ, काचेच्या मण्याच्या काळया पोतींत ओवलेलं मंगलसूत्र, हातांतल्या कांचेच्या चारपांच बांगडया, चालतांना छिन् छिन् वाजणारीं पायांतील जोडवीं, कानांतील सोन्याचीं फुलं, डाव्या हातांत असलेली बदाम कोरलेली आंगठी, पावलीएवढं कपाळावरचं कुंकू, अंगांत धारवाडी खणाची चोळी आणि अंगावर लुगडं नाहींतर पातळ अशा तिच्या नेहमींच्या थाटांत ती एखाद्या झांकल्या माणकासारखीच कुणाच्याहि डोळयांत भरत असे. लांबसडक काळयाभोर केसांच्या अंबाडयावर लक्ष्मीनं आपल्या लुगडयाचा पदर घेतला कीं, ती फार शोभून दिसायची. नऊवारी पातळ कासोटा न घालतांच ती पायघोळ नेसून डोक्यावर पदर घेऊन घरांतून वावरूं लागली कीं, तिची आई तिला नेहमीं म्हणे, 'माझी लक्ष्मी मजी एकाद्या राजाची राणीच ग ऽ बाई ऽ' आणि तिनं तसं म्हटलेलं ऐकलं कीं, लक्ष्मी प्रेमानं तिच्याकडे पहात बोलून जाई, 'जा बाई, हें ग काय आई ?'

पण आज तिचा हा नेहमींचा खेळकरपणा कुठं दडून बसला होता कोण जाणे. कसल्यातरी काळजीनं काळवंडून जावा तसा तिचा चेहरा दिसत होता.

घोंगडयावर अंग टाकतांच लक्ष्मीला खूप झोप येईल तर बरं असं मनापासून वाटत होतं. कारण गेल्या कित्येक दिवसांत तिला म्हणावी तशीं विश्रांति मिळालीच नव्हती. झोप यावी म्हणून लक्ष्मीनं खूप प्रयत्न केला पण कांहीं केल्या तिला झोप येईना. त्यामुळं तोंडावर असलेल्या पदरा-

आडूनच तिनं सहज समोर असलेल्या खिडकीकडे पाहिलं. कां कोण जाणे, पण तसं पहातांक्षणींच तिला एकाएकी खूप हुषारी वाटली असावी. एवढंच नव्हे तर त्यावेळच्या तिच्या त्या पदराआडून पहाण्यामुळं एवढा वेळ आलेला तिचा सारा आळस, सारा थकवा, सारी निराशा, काळजी कुठल्याकुठं पार पळून गेली एवढा तिला आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांतच तिनं आपल्या तोंडावरचा पदर थोडा बाजूला केला आणि लगेच पुन्हां पांघरलाहि.

लहानपणच्या एका गोड आठवणीनं लक्ष्मीच्या खेळकरपणाला जाग आली होती. त्यामुळं त्यावेळीं आपलं मोठेपण विसरून लहान पोरांसारखं एकदम धांवत जाऊन खेळत सुटावं असं तिला वाटल्याशिवाय राहिलं नाहीं. पण तिनं तसं वागायचा कितीहि प्रयत्न केला असतां, तरी अशा अवघडलेल्या स्थितींत तिला तें शक्य नव्हतं, हें ध्यानांत येतांच लक्ष्मीनं नकळतच आपल्या आईला हांक मारली, ‘ आई ’ !...पण आपल्यापासून कित्येक मैल दूर असलेल्या आपल्या आईला आपली हांक ऐकूं जाणार नाहीं हें जेव्हां तिला पटलं, तेव्हां आपल्या या वेडेपणाला मोकळ्या मनानं हंसून ती स्वतःशीच पुटपुटली, ‘ आईग, तुझ्या मांडीवर मी झोपलें नि मग तिथूनच तुझ्या पदराआडून असं पाहिलं कीं कित्ती कित्ती मजा वाटायची नाहीं ग !’...असं म्हणतांना लक्ष्मीच्या डोळ्यांत आसवं तरारत होतीं आणि ओठावर हंसूं फुटत होतं. बाळपणींच्या या रम्य आठवणीचा आस्वाद आपल्या आईच्या मांडीवर निजून आज देखील तिला घ्यावासा वाटत होता. क्षणभर आई आत्तांच्या आत्तां आपल्या जवळ असावी असा तिला विलक्षण मोह झाला. पण दुसऱ्याच क्षणीं तसं घडणं अशक्य असल्याच कळतांच थोडया वेळांपूर्वी तिच्या तोंडावर चमकणारी आनंदाची छटा आतां कुठल्याकुठं पार मावळून गेली.

अस्वस्थ मनानंच लक्ष्मी उजव्या कुशीवरून डाव्या कुशीवर अशी थोडीशी वळली. तसं वळतांना जेव्हां तिचा उजवा हात तिच्या पोटाला थोडा जोरानंच लागला तेव्हां तिला कससंच वाटलं ! स्वतःच्या

आयुष्याशीं एकसारखं आजवर झगडावं लागल्यानं आपोआप बनत गेलेल्या तिच्या बंडखोर वृत्तीला एकाएकीं आपली असलेली असहायता जाणवल्याविना राहिली नाहीं. धकाधकीच्या शेंकडो मामल्यांना धीमेपणानं तोंड देत परिस्थितीवर विजय मिळवूं पहाणारी लक्ष्मी आपल्या पोटांत वाढत असलेल्या बाळाच्या जाणीवेनं आनंदित होण्याऐवजीं व्यथितच झाली. आपल्या जीवनांतील दु:खाची झळ या बाळाला देखील सोसावी लागेल, या विचारानं तिचा जीव अगदीं कासावीस होऊन गेला...

लक्ष्मीच्या जिवाची अशी धांदल उडणं अगदीं स्वाभाविक असंच होतं. कारण विधात्यानं तिची लग्नगांठ ज्यांच्याशीं बांधलेली होती त्या तिच्या बाबूरावांबद्दल अलिकडे तिला मनस्वी संताप आला होता! आपल्या जवळच्या साऱ्या संपत्तीची, घरादाराची, पैशाअडक्याची आणि बायकोसह स्वतःच्या मुलाबाळांचीहि धूळदाण उडवूं पहाणारा हा तिचा नवरा, असून नसून तिला सारखाच वाटत होता...

दररोज पदोपदीं बाबूरावांशीं घरांत होणारा झगडा, त्यांतून सुटका करून घेण्यासाठीं तिला जिवापाड घ्यावे लागणारे श्रम, त्याबद्दल मिळणारा विलक्षण मोबदला, मुलाबाळांचे होणारे हाल आणि त्यामुळं तिच्या मनाला होणाऱ्या यातना या साऱ्या विचारानं लक्ष्मीचं डोकं अगदीं सुन्न झालं. त्यावेळीं आपल्या भोंवतालच्या साऱ्या जगाचा तिला वीट आला!....तिच्या मनांत तिनं ठरवलेल्या विविध आशांभोंवतीं निराशेचं दाट धुकं पसरूं लागलं...भर दुपारीं तिच्या डोळ्यांसमोर चांदण्या लकाकूं लागल्या...तिची कर्तव्यबुद्धिदेखील ग्लानीच्या झांपडींत गुरफटून गेली...

एवढ्यांत आपल्या लेकीच्या कसल्यातरी गुणगुणण्याचा आवाज कानावर आल्यानं लक्ष्मी आपल्या विचारतंद्रींतून खाडकन् जागी झाली. घरासमोरच्या सारवून सुरवून स्वच्छ केलेल्या अंगणांत आंब्याच्या घुमटाकार सांवलींत लक्ष्मीची चाकटी मुलगी सखू एकेक सागरगोटा आभाळांत उंच उडवीत गात होती—

आनंदी आनंद गडे
जिकडे तिकडे चोहिकडे

दुःखाची फारशी झळ न लागलेला सखूचा चिमणा जीव मोठ्या आनंदानं सागरगोटे गंमतीनं झेलत खेळत होता.

सखूच्या गाण्याची गोड लकेर कानावर येतांच आपले आळसावलेले डोळे चोळीत लक्ष्मी हळूच अंगणांत आली. आपलीं मुलं अशीं आनंदानं खेळत असलेलीं दिसलीं कीं, लक्ष्मीला तेवढ्या वेळेपुरता तरी आपल्या दुःखाचा विसर पडे. आजहि सखूला बघून तिला तसंच वाटलं. पण तिचं तें वाटणं फार वेळ तिला समाधान देऊं शकलं नाही.

सखू गात होती, त्या गाण्यांतील आशय ध्यानांत येण्याइतपत लक्ष्मी शिकलेली असल्यामुळं त्या गाण्याप्रमाणं आपला संसार देखील आनंदांत असावा असं वाटलं तिला !...उभ्याउभ्याच लक्ष्मी जवळच्या दारवाजाच्या दाराला टेकली. तेवढ्यांत कर्र्...असा दाराचा आवाज झाला.

खेळतां खेळतां सखूच्या कानावर तो आवाज गेल्यानं गांणं थांबवून व हातांतला सागरगोटा तसाच खालीं टाकून तिनं वळून दाराकडे पाहिलं. दोन मजली असलेल्या आपल्या मोठ्या घरासमोर उभी असलेली आपली आई दिसतांच सखूला वाटलं कीं, ती आपणाला बोलवायलाच आली असावी. आणि म्हणून सागरगोट्यांचा डाव मोडून ती धांवत लक्ष्मीजवळ गेली; आणि तिला बिलगून म्हणाली, ' मला बोलवीत होतीस होय ? '

लक्ष्मी सखूला कांहीं बोलणार इतक्यांत तिचा मुलगा गोविंदा पळत पळत तिथं येत सखूला उद्देशून म्हणाला, ' सखू, चल चल लौकर. तीं बघ सारीं पोरं जमलीं. खेळूंया काठीचा खेळ, पळ ' आणि तो आला तसाच लक्ष्मीकडे हंसून पहात माघाराहि पळाला. किती केलं तरी सखू लहानच होती. खेळाचा मोह तिला एवढा अनावर झाला कीं, आईचं आपल्याकडे कांहीं काम असेल याचं भान विसरून ती ' मी पण जातें गऽखेळायला ' असं म्हणत गोविंदाच्या मागोमाग दौडत गेली.

अंगणांत असलेल्या एका मोठ्या मोकळ्या जागेंत गोविंदानं

जमलेल्या मुलांना ओळीनं उभं केलं. त्यांच्यापैकीं प्रत्येकाच्या हातांत दोन्ही टोकांना घुंगुर बांधलेली ज्याची त्याची छोटीशी काठी होती. गोविंदानं कसलातरी जोराचा हूकूम सोडून आपापली काठी नीट आडवीं धरा असं प्रत्येकाला सांगितलं, आणि मुलांनीं तसं केल्यावर त्यानं आपल्या चड्डीच्या खिशांत ठेवलेली लहानशी बासरी काढून तोंडाला लावोत तिच्यावर आपलीं बोटं ठेवलीं. क्षणार्धांत बासरींतून बाहेर पडणाऱ्या छान गाण्याच्या तालावर मुलांची कवाईत सुरू झाली. बासरीवर ठेवलेल्या आपल्या बोटांची कौशल्यपूर्ण हालचाल करीत गोविंदा आपलं सुदरं गाणं वाजवूं लागला; आणि त्या नादांत मुलांचीं मनं तल्लीन होऊन गोविंदा डोळ्यांनीं खूण करील तशीं त्यांचीं शरीरंहि नाचूं लागलीं......

दरवाजाला रेलून उभी असलेली लक्ष्मी गोविंदाच्या या बालसेनेकडे कौतुकानं पहात होती. गोविंदाचं हें कौतुक बघून तिच्या अंगावर मूठभर मास चढलं. समाधानानं "दृष्टाविष्ट होईल बाई माझ्या बाळाला' असं म्हणत कौतुकानं पुन्हां पुन्हां वळून मागं पहात, ती घरांत निघून गेली.

खेळून आल्याबरोबर मुलांना कांहींतरी खायला द्यायला हवं म्हणून लक्ष्मीनं चुलींतल्या राखेत दडलेल्या विस्तवाला फुंकर घालून चूल पेटवली. चुलींत घातलेल्या काटक्या नीट आंत सारून जवळच असलेल्या फडताळांतला एक पत्र्याचा डबा तिनं बाहेर काढला आणि त्यांतले शेंगदाणे सुपांत ओतून घतले. पेटलेल्या चुलीवर तवा ठेवून सुपांतले दाणे निवडून घेऊन तिनं तवा तापतांच ते तव्यांत ओतले. दाणे चांगले भाजत आल्यावर त्यांवर थोडसं मिठाचं पाणीहि शिंपडून तिनं त्या दाण्यांला विशेष चव आणली.

भाजलेले शेंगदाणे लक्ष्मी पुन्हां सुपांत काढून घेत होती, एवढ्यांत खेळ सपवून सखू आणि गोविंदा धांवत धांवत 'आई, खायला देऽऽ' करीत तिथं आलीं. लक्ष्मीनं "कित्ती छान खेळतां रे तुम्ही!" असं म्हणून मुलांना शाबासकी देत त्यांच्या हातावर मूठमूठभर शेंगदाणे

ठेवले. तेव्हां गोविंदा थोडा खट्ट होऊनच म्हणाला. "हें ग काय आई! आम्हीं नाहीं जा अशानं. शेंगदाणेच कसे ग देतेस जेव्हां तेव्हां? कधीं तरी चांगलं चांगलं द्यायचं होतंस. दुसऱ्या मुलांचं बघा नाहींतर..." आणि तो तिथून उठून जाऊ लागला.

गोविंदाचा हट्ट कांहीं वावगा नव्हता हें ओळखूनच लक्ष्मीनं त्याच्या हाताला धरून त्याला खालीं बसवलं आणि प्रेमानं त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ती भारावलेल्या मनानंच म्हणाली, "उद्यां देईन दुसरं कांहींतरी चांगलं. मग तर झालं?" त्यावर एकदम हंसून आणि आईच्या जवळचे शेंगदाणे घेऊन तोंडांत टाकीत गोविंदा तिला बजावीत म्हणाला, "बघ हं! नाहींतर म्हणशील..." आणि त्यानं समाधानानं तो खाऊ गट्टहि केला. तेव्हां कौतुकानं त्याला जवळ घेत लक्ष्मी म्हणाली, "किती शहाणा आहे माझा बाळ."

"तर तर!" असं म्हणून डोळे मिचकावीत जेव्हां गोविंदा खेळायला म्हणून पुन्हां बाहेर निघून गेला, तेव्हां चुलीपासून लक्ष्मीला थोडं दूर ओढून नेत सखू म्हणाली, "आई, तुझ्या मांडीवर निजूं कां ग मी जरा?"

फार दिवसांनीं सखूनं अशी इच्छा दर्शविल्यामुळं लक्ष्मीनं तिला जवळ घेतलं आणि तोंडावर आलेल्या तिच्या केसांच्या अवखळ बटा मागें सारीत तिला कुरवाळलंहि. त्यामुळं आईच्या कुशींत शिरलेल्या सखूला कितीतरी आनंद झाला. असा हा आनंद आपणाला खूप वेळ मिळावा म्हणून ती लक्ष्मीला म्हणाली सुद्धां, "थोडा वेळ इथून उठवूं नको हं!"

"छे ग! नीज तूं आपली खुशाल." असं म्हणत लक्ष्मीनं सखूला आणखीनच जवळ ओढून घेतली.

लक्ष्मीच्या पोटाला बिलगून शांत पडलेल्या सखूच्या कानावर आईच्या पोटांतून कसला तरी टिक्...टिक्...टक्...टक्...असा आवाज आला. तिला त्यांत भारी गंमत वाटली. म्हणून तिनं पुन्हां पुन्हां कान देऊन तो आवाज ऐकला. शाळेंतल्या बाई गाण्याला ठेका धरतात

तस्सा तो आवाज ठेक्याबर पडत असलेला ऐकून तर तिला बिलक्षण नवल वाटलं. लक्ष्मीच्या लुगड्यांत पोटाजवळ चाचपून आणि तिच्या कुशींत लपविलेलं आपलं तोंड बाहेर काढून सखू गडबडीनं म्हणाली, " अग आई, तुझ्या पोटांत घड्याळासारखं काय ग टिक्...टिक्... टक्...टक्...करतंय ? " आणि ती चटकन् तिथून किंचित दूर गेली.

सखूच्या या बोलण्यानं लक्ष्मीला भयंकर आश्चर्य वाटून ती तिला म्हणाली, "हें ग काय भलतंच सखू ? पोटांत कुठं घड्याळासारखं वाजतं वाटतं ?...आतां एकवेळ तूं आपल्या काळजाबद्दल तसं म्हणालीस तर..." आणि त्यापुढं अचानक कांहींतरी आठवल्यानं आपली जीभ चावून एकाएकीं लाजून चूर झालेली लक्ष्मी सारं कांहीं लक्षांत येतांच सखूच्या पाठीवर चापट मारीत म्हणाली, " चल चावट कुठली ! "

आपल्याशीं खरं काय तें न बोलतां आई गालांतल्या गालांत हंसतेच तेवढी हें बघून सखू रागानं गाल फुगवून म्हणाली, "तें काय वाजतंय तें सांग हं ! नाहींतर..." तेव्हां तर लक्ष्मीला कमालीचं हंसूं आलं. त्यामुळं जास्त न बोलतां जेव्हां सखू तिच्या अंगाला झोंबू लागली तेव्हां तिला पटलं कीं, सखूला खरं सांगितल्याशिवाय भागायचं नाहीं. म्हणून तिला जवळ घेऊन लक्ष्मीनं हळूच तिच्या कानांत सांगितलं, " माझ्या पोटांत कीं नाहीं बाळ आहे बाळ ! " त्यावर तिला बाजूला ढकलीत सखू म्हणाली, " तें ठाऊक आहे मला. पण तें टिक्...टिक्....काय वाजतं आहे तें सांग अगोदर. " तेव्हां सखूशिवाय कुणालाहि ऐकूं जाणार नाहीं एवढ्या आवाजांत लक्ष्मी हंसून म्हणाली, " अग, तें बाळ कीं नाहीं तूं माझ्या अंगावर पडलेली बघून गंमतीनं टाळ्या वाजवतंय ! समजलं ? "

रुधिराभिसरणाची कल्पना सहा सात वर्षांच्या छोट्या सखूला समजणार नाहीं, म्हणून लक्ष्मीनं मारलेली ही थाप सखूला खरी वाटली. मग आईच्या पोटांतल्या बाळाला आपला त्रास होऊं नये म्हणून आणि आपल्याला खेळायला नवं बाळ मिळणार या आनंदानं ती लक्ष्मीपासून थोडी दूर होत म्हणाली, " खरं ना ग पण हें आई ? " त्यावर कौतुकानं सखूकडे पहात ओठावर आलेलं हंसूं दाबीत लक्ष्मी म्हणाली, "हो तर !

आणि बरं का सखू; तें बाळ तुला काय म्हणणार ठाऊक आहे ?"

"काय ग ?" मोठ्या कुतुहलानं सखूनं असं विचारतांच लक्ष्मीनं सांगून टाकलं, "सांगू ? तें कीं नाहीं तुला 'आक्का' नाहींतर 'ताई' म्हणेल अग ! आहे बुवा एका माणसाचा थाट हं !"

आपल्याला आई म्हणते त्यावरून हें नवं बाळ 'आक्का' नाहींतर 'ताई' म्हणणार या कल्पनेनं आनंदानं गोंधळून जाऊन सखू आपली इच्छा आईला सांगावी म्हणून म्हणाली, "आई ग, नुसतं 'आक्का' नाहींतर नुसतं 'ताई' नको जा ! त्या बाळानं कीं नाहीं एकदम 'आक्काताई' म्हटलेलंच आवडेल मला" आणि खद्खदून हंसत ती स्वतः भोंवतींच गिरक्या घेऊं लागली. तेव्हां लक्ष्मी तिला कांहींतरी बोलणार तों सखूच एकदम गंभीर होऊन पुन्हां म्हणाली, "पण काय ग आई, बाबांना नाहीं हं दाखवायचं हें बाळ ! नाहींतर माझ्यासारखंच त्याला पण ते मारतील ! नको बाई तसं व्हायला...आई, नाहीं ना ग दाखवणार ?"

सखूच्या या शंकेनं कांहीं वेळ शांत होऊन समाधानांत असणाऱ्या लक्ष्मीच्या मनांत एकदम तुफान वादळ निर्माण झालं. तिच्या जिवाची कालवाकालव होऊन बाबूरावांच्या नुसत्या आठवणीनं देखील सर्दिशी कांटा आला तिच्या अंगावर......अस्वस्थतेमुळं जाणारा आपला तोल सावरीत चिमुकल्या सखूला जवळ घेऊन ती फक्त एवढंच म्हणाली, "त्याची नको काळजी, तूं जा आपली खेळायला."



## माझा राजा गऽ तरी तो—

२

काल तिसऱ्याप्रहरीं गोविंदाला कबूल केलं होतं त्याप्रमाणं आज सकाळीं उठल्यापासूनच लक्ष्मीनं निश्चय केला होता, " कांहीं झालं तरी आज मुलांना कांहींतरी विशेष असा खाऊ द्यायचाच. " एखादी गोष्ट करायचीच असं लक्ष्मीच्या मनानं घेतलं कीं, मग त्यासाठीं ती वाटेल तें करायची. त्यांत सुखासुखी माघार घ्यायची नाहीं असा तिचा नेहमींचाच स्वभाव. त्यांत आतां तर मुलांच्या खाऊचा प्रश्न म्हणजे आपलं आद्य कर्तव्यच आहे असं तिचं ठाम मत झाल्यामुळं त्यासाठीं बाबूरावांकडून पैसे कसे मागावेत याचा ती बेत आंखूं लागली. गेल्या कित्येक दिवसांत जरूर त्या घरखर्चाखेरीज तिच्याजवळ पैसाच उरला नव्हता ! मग ती तरी कुठून आणणार खाऊ ? अर्थात् त्याबद्दल ती मनांतल्या मनांत खूप खाऊन घेई, जिवाला त्रास करून घेई, पण त्यापलीकडे कांहींच करूं शकत नसे. त्यामुळं चुलीपुढचं दुपारचं काम आटोपतांच ती सरळ माजघरांतल्या जिन्यावरून माडीवर गेली. तिथं एका लहानशा लोडाला टेकून बाबूराव पान खात बसले होते. त्यांच्यासमोर जाऊन बसत आणि पानांचे देठ हातानं खुडून टाकीत, लक्ष्मी खालीं मान घालूनच बाबूरावांना म्हणाली,

" बरं का, थोडे पैसे हवेत मला. "

वयानं चाळिशीच्या पलीकडे गेलेले, अंगानं बरेच स्थूल दिसणारे, घाऱ्या डोळ्याचे, छानदार पीळ मारून ठेवलेल्या मिशा असणारे, डोक्यावरचे केस किंचितसा भांग पाडून उलटे वळवलेले, डोळ्यावर पिंगट रंगाची फ्रेम असलेला चष्मा घातलेले आणि बेदरकारपणानं जगाकडे पहात बरचेवर तंबाखूची बुकणी उजव्या हाताच्या चिमटीन हळूच तोंडांत सोडणारे बाबूराव, त्यावेळीं कसल्यातरी विचारांत गुंगून गेलेले असावेत. कारण लक्ष्मीचं म्हणणं ऐकून घेऊन तिला उत्तर देण्याइतपत मनाला लागणारी स्वस्थता निदान त्यावेळीं तरी त्यांच्या ठिकाणीं खास दिसत नव्हती. आणि हें ध्यानांत येतांच लक्ष्मीनं जेव्हां त्याना थोडंसं मोठ्यानंच पुन्हां विचारलं, " ऐकलंत का ?" तेव्हां कुठं थोडंसं खाकरल्यासारखं करीत बाबूराव म्हणाले,

" हं, काय म्हणणं आहे तुझं ?"

" पण विचारूं का आधीं ? नाहींतर..."

" हो हो ! जरूर. कुठंतरी बसायला जायचं असेल शेजारी ! असंच ना ?"

" छे ! बसायला कसली जातेय !"

" मग ?"

" मला कीं नाहीं थोडे पैसे हवेत."

" पैसे ? आणि ते कशासाठीं ?"

" तसं कांहीं विशेष नाहीं. पण...पण मुलांना कांहींतरी खाऊ आणवावा म्हणतें. केव्हांची पाठीशीं लागलींत. आणि कालच मी गोविंदाला कबूलहि केलंय..."

" काय कबूल केलंय ? खाऊ आणूंया म्हणून ?"

" हो."

" हात्तिच्या ! एवढंच ना ? अग, मग कर जा कीं घरांतच कांहींतरी. त्यासाठीं एवढा पैशाची मागणी कशाला बुवा ?"

" तसं नव्हे..."

" मग कसं तर आणखी ?"

" हें पहा, घरांतच कांहीं असतं कीं नाहीं म्हणजे मग..."

" अरे वा ! जसं कांहीं सारं घरदार सोडून आपण कुठंतरी नव्या जागेंत रहायला आलों आहोंत अशीच बोलायला लागलीस कीं !"

बाबूरावांचा स्वभाव पक्का माहीत असल्यामुळं उगीच कांहीं वेडं वाकडं तोंडांतून जाऊं नये म्हणून लक्ष्मी सावकाशीनंच त्यांना विडा तयार करून देत म्हणाली, " मी म्हटलंय कां तसं ? "

" मग ? सारं संपलं घरांतलं ? आणि मी म्हणतों एकवेळ संपलं घरांतलं तर खा म्हणावं पोटभर भाजीभाकरी...खाऊ मागताहेत लेकाचे !..."

बाबूराव थोडे भडकले खरे. पण तिकडे लक्ष न देतां लक्ष्मी काकुळतीला येऊन म्हणाली, " असं काय बरं करायचं तें ! रोज रोज कां आपलीं मुलं खाऊ मागतात कधीं ? आजच्या दिवस तेवढे द्या थोडे पैसे. मग पुन्हां नाहीं मागायची. द्याल ना ?...हो म्हणा...म्हणाना हो..."

घरांतल्या माणसांबद्दल बाबूरावांना विशेष फिकीर कधींच वाटत नसे. तेव्हां पोरांच्या या खाऊच्या हट्टाचं त्यांना मोठंसं काय वाटणार म्हणा ! लक्ष्मीनं तयार केलेला विडा चघळीत आणि तिथल्या तिथंच उठून फेऱ्या मारीत त्यांनीं तिला सरळ सांगितलं, "माझ्याजवळ खरं म्हणशील तर दमडीसुद्धां नाहीं. या उप्पर कांहीं म्हणायचंय कां आणखी ?"

सोन्यासारख्या पोटच्या पोरांना एखादवेळ खाऊ देखील त्यांना हवा तसा देतां येऊं नये याचं लक्ष्मीला मनस्वी दुःख झालं. त्यावेळीं स्वतःवरच ती खूप चिडली. तिचा संताप इतका अनावर झाला कीं, रागानं लाल झालेल्या तिच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्याच पडताहेत कीं काय असा एखाद्याला भास व्हावा !...रागानं थरथरणारे तिचे ओठ आपोआप बोलूं लागले, " आजवर मी वाटेल तें ऐकलं तुमचं. पण आतां मुळींच नाहीं ऐकणार..."

लक्ष्मीचा संताप बघून आणि कधीं नव्हे तें तिनं उच्चारलेलं हें वाक्य

ऐकून बाबूरावहि भडकले. पण त्यांना न जुमानतां लक्ष्मी रागानं दांत ओठ खात त्यांच्याकडे रोखून पहात म्हणाली, “तुमच्या स्वतःच्या चैनीसाठीं तुम्हीं हवा तेवढा पैसा पाण्यासारखा खर्च केलात, शेतीभातीवर आणि घरावरहि तुळशीपत्र ठेवलंत, शेतांतल्या लक्ष्मीनं भरलेलं घर लख्ख पुसून काढलंत तेव्हां कधीं नव्हती अशी पैशाची मोजदाद केलीत ती !.... आणि पोटच्या पोरांना... ”

लक्ष्मीला पुरतं बोलूं देण्यापूर्वींच आपल्यावर अशी टीका करणारी ही कोण या कल्पनेनं बाबूरावांचाहि संताप अनावर झाला. मागचा पुढचा कसलाच विचार न करतां “ चांडाळणी, मला शहाणपण शिकवतेस काय ? ” असं म्हणत त्यांनीं काडकन् लक्ष्मीच्या मुस्कटांत मारली ! कानशिलावर जोराची थप्पड बसल्यानं लक्ष्मी थाड्दिशीं खालीं कोलमडली. तिला तोल सावरणं देखील आवाक्याबाहेरचं होऊन बसलं. तेव्हां संकटांत सांपडलेल्या एखाद्या हरिणीप्रमाणं तिच्या डोळ्यांत भीतीची छटा चमकली... अगोदरच भारावलेला तिचा देह या तडाख्यानं एकाएकीं ढिला होऊन कोलमडला... दाही दिशा फाटून जाऊन आपण अधांतरींच आभाळांत तरंगत आहोंत असं वाटून, तिनं गपकन् आपले डोळे मिटून घेतले.

आजवर बाबूरावांच्या हातचा असा मार लक्ष्मीनं कितीतरी वेळां खाल्ला असेल. पण आजच्या एवढा धक्का यापूर्वी तिला कधींच जाणवला नव्हता. थोड्या वेळानं तिनं डोळे उघडले आणि भीतीनं गर्भगळित होऊन, घामानं डबडबलेल्या आपल्या तोंडावरून हलकासा हात फिरवला. तेवढ्यांत बाबूराव कुठं तरी बाहेर जाण्याच्या तयारींत असलेले बघून लक्ष्मी अंगांत असेल नसेल तेवढं सारं बळ एकवटून कडाडली, “बाप आहांत कीं हैवान ! एखाद्या राक्षसाच्या कुळांत तरी जन्म घ्यायचा होतात त्यापेक्षां...माझ्या शरीराचीं काडं केलींत, माझ्या माहेरचा रस्ता मला बंद केलांत, सुखाच्या शब्दाची चुकूनहि कधीं भीक घातली नाहींत तरी देखील सारं गिळून बसलें मी. ...पण लक्षांत ठेवा कीं, माझ्या पोरांना देखील जर तुम्ही याच मार्गानं

नेणार असाल, तर मला तें मुळींच खपायचं नाहीं...त्यासाठीं माझे प्राण देखील मी पणाला लावीन..."

लक्ष्मीच्या या बडबडीनं बाबूरावांच्यावर कांहीं अनुकूल परिणाम तर झाला नाहींच, पण उलट त्यांचा राग आणखीनच भडकला. रागानं ते अगदीं लाल लाल झाले. स्वतःच्या बायकोनं आपला असा अपमान करावा ही कल्पना त्यांच्या मनाला विशेष झोंबल्यामुळं त्यांनीं जवळच असलेलं एक स्टूल उचललं आणि तें लक्ष्मीच्या अंगावर जोरानं फेकून देत ते ओरडले, "अस्सं काय? तर मग मर खुशाल......" आणि मागें वळूनहि न पाहतां ते धाड् धाड् जिना उतरून घराबाहेर पडले देखील !

दिवस भरत आलेल्या लक्ष्मीच्या अंगावर बाबूरावांनीं फेकलेलं स्टूल जोरानं येऊन आदळल्यामुळं तिचा जीव कासावीस झाला. तिनं जोरानं किंकाळी फोडली. कल्पनेच्या बाहेर तिला मूर्च्छा आली. एवढंच नव्हे तर तिचा जीव विलक्षण गुदमरून गेल्यामुळं तिच्या पोटांतील गर्भाला जोराचा धक्का बसला. त्याची हालचालसुद्धां एकाएकीं बंद झाली !... सारंच कसं अगदीं विचित्र होऊन बसलं...लक्ष्मीच्या अंगाला दरदरून घाम फुटला. नाडी मंद होत चालली...अस्ताव्यस्त हातपाय पसरून पडलेल्या तिच्या देहाची हालचालहि होईना...

एवढ्यांत शाळेला मधली सुट्टी झाल्यामुळं घरांत आल्याबरोबर गोविंदानं आईला हांक मारून 'आज देणार ना ग आई चांगला खाऊ?' असं म्हणत साऱ्या घरभर फिरत तिला शोधायला सुरवात केली. पण लक्ष्मीनं त्याला 'ओ' दिली नाहीं ! त्यामुळं गडबडीनं धडपडतच घरांत शिरावं त्याप्रमाणं जिना चढून वर जात त्यानं पुन्हां हांक मारली, 'आईऽऽ कुठं आहेस ग तूं ?' पण तरीसुद्धां लक्ष्मीच्या दांतांची घट्ट मिठी बसल्यामुळं त्याला उत्तर आलं नाहींच ! गोविंदा घाबरला आणि माडीवरच्या खोलींत प्रवेश करीत म्हणाला, 'आई, रागावलीस कां ग माझ्यावर ?' पण त्यानं लक्ष्मीची एकंदर वस्तुस्थिति जेव्हां पाहिली, तेव्हां तो भीतीनं गारठून जात किंचाळला, 'आईऽऽ'

"काय झाइरं गोइंदा ?" असं म्हणत शेजारच्या राधाकाकू जेव्हां

वर आल्या तेव्हां कुठं गोविंदाच्या जिवांत जीव आला. घाबरून गेल्यामुळं कोरड्या ठणठणीत झालेल्या आपल्या ओठांवरून जीभ फिरवीत त्यानं राधाकाकूंना विचारलं, "काकूबाई अशी काय हो करतेय आई?" आणि तो मुसमुसून रडूं लागला.

मघांची लक्ष्मीची किंकाळी ऐकूनच राधाकाकू वर आल्या होत्या. त्यांना देखील काय झालं असावं याचा नीट उलगडा होईना. त्यामुळं त्याहि घाबरल्या. पण आपल्या मनाचा तोल न ढळूं देतां त्यांनीं गोविंदाची कशीबशी समजूत घातली.

लक्ष्मीला असं कशानं झालं? घरांत नवराबायकोचं भांडण होऊन कांहीं वेडवाकडं तर नाहीं झालं? कां लक्ष्मीला एकाएकीं घेरी येऊनच ती खालीं पडली?...या साऱ्या प्रश्नांची जुळवाजुळव करीत लक्ष्मीचे हातपाय नीट सावरून तिचं डोकं मांडीवर घेत त्या गोविंदाला म्हणाल्या, " पान्याचा तांब्या आन् योक कांदा आन बाइच. पळ लौकर. "

राधाकाकूंनीं सांगितल्याप्रमाणं गोविंदानं पाणी आणि कांदा आणतांच त्यांनीं लक्ष्मीच्या तोंडावर पाणी शिंपडलं. हाताच्या बुक्कीनं कांदा फोडून तिच्या नाकाशीं धरला...राधाकाकू आपल्यापरीनं लक्ष्मीला सावध करीत होत्या. गोविंदा काळजीनं चूर होऊन गेला होता. त्याचे डोळे आईच्या अंतःकरणाचा ठाव घेऊं पहात होते. मनांतल्या मनांत तो म्हणत होता, " देवबाप्पा, माझ्या आईला बरं कर. मी तुला रोज रोज नमस्कार करीन. कध्धीं चुकायचा नाहीं. "

बराच वेळ लक्ष्मी सावध होईना, तेव्हां राधाकाकूंचाहि धीर खचत चालला. चटकन् त्यांनीं चुलीपुढचं लहानसं उलथणं आणलं आणि लक्ष्मीची घट्ट बसलेली दांतखिळी थोडी ढिली केली...पुन्हां त्यांनीं तिच्या तोंडावर पाणी शिंपडलं आणि नाकासमोर कांदा धरला... हळुहळू लक्ष्मी शुद्धीवर येण्याचं चिन्ह दिसतांच त्या समाधानाचा सुस्कारा सोडून गोविंदाला म्हणाल्या, " आतां कशाचा घोर न्हाई. "

लक्ष्मीच्या हातापायाची हालचाल सुरू होतांच गोविंदा तिच्या

गळ्याशीं पडत म्हणाला, "आई, बोल ना ग माझ्याशीं! मी तुझा ना ग? मग अशी का गप्प? आतां खाऊ नाहीं मागणार...बोल...आईऽ..." अद्याप लक्ष्मी म्हणावी तशी सावध न झाल्यामुळं राधाकाकूंनीं गोविंदाला मागें खेचीत म्हटलं, " वाइच दमानं घे."

साधारण अर्ध्या पाऊण तासानं राधाकाकूंनीं घेतलेल्या काळजीमुळं आणि श्रमामुळं लक्ष्मीनं हळूच डोळे उघडले; बावरलेल्या नजरेनं इकडे तिकडे घरांत पाहिलं; आणि समोर बसलेला गोविंदा दिसतांच त्याला ' बाळ, ' अशी जोरानं हांक मारून ती पुन्हां बेशुद्ध झाली...तें बघून गोविंदाची आणि त्याबरोबरच राधाकाकूंचीहि पांचावर धारण बसली! ...राधाकाकू लक्ष्मीला सावरीत गोविंदाला म्हणाल्या, " त्या रामाच्या देवळापसल्या डागदाराला तरी बोलीव जा बाबा. तुजा बा गेला असऽल त्या भवान्यांचीं घरं हुडकीत. तूं तरी येळला जाग... "

गोविंदा डॉक्टरांना घेऊन येण्यापूर्वीच लक्ष्मी राधाकाकूंच्या प्रयत्नानं शुद्धीवर येत चालली. त्यांनीं जेव्हां तिच्या मानेखालीं हात घालून तिला उठवायचा प्रयत्न केला तेव्हां त्यांना मिठी मारीत भरल्या आवाजांत लक्ष्मी म्हणाली, " माझ्या जिवाचं एक राहिलं पण पोटांतल्या पोरासाठीं तरी..." विलक्षण थकवा आल्यामुळं पुढं तिला बोलवेना. तिला उठवून आणि आपल्या अंगाला रेलून बसवीत राधाकाकूंना काय झालं असावं याचा चटकन् पडताळा मिळाला. पण त्यावेळीं त्या कांहीं बोलल्या नाहींत. त्या आपल्या लक्ष्मीच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणाल्या, " वाइच च्या करून आनूं का? मजी त्येबडीचं हुशारी वाटल." पण त्यांना उत्तर देण्यापूर्वीच लक्ष्मीच्या पोटांत एकाएकीं भयंकर कळा यायला लागून प्रसूति पूर्वीची सूचनाहि तिला मिळाली... त्यामुळं न कळत ' अग आई गऽऽ ' असं म्हणत ती पुन्हां कोलमडून पडली...

त्याचवेळीं शाळेंतून घरीं येत असलेल्या सखूला आईची बातमी सांगत आणि तिला बरोबर आणीत घाईघाईनं गोविंदा घरीं आला. त्यानं आई उठून बसली असेल म्हणून मोठ्या उत्सुकतेनं आल्याबरोबर

पाहिलं. त्याची खूप निराशा झाली. पळत आल्यामुळं तो धापा टाकीत होता. त्याला पहातांच राधाकाकूंनीं विचारलं, "आलं का डागदार ?" अंगावरचा शर्ट उगीचच ओढून धरीत गोविंदा म्हणाला, "घरांत नाहींत ते. कुठं बाहेर गेलेत असं त्यांच्या बायकोनं सांगितलं. आणि ती म्हणाली कीं, त्यांना यायला चांगला तासभर तरी वेळ लागेल !" हें ऐकून राधाकाकू लक्ष्मीला उठवून बसवीत म्हणाल्या, "येळला मिळाल्याबर डागदार कसला त्यो! पन त्येला तरी बिच्याऱ्याला बोलून काय फायदा !...आपलं आपूनच हाइ त्येवडं भोगाया व्हवं..."

प्रसूतिवेदनांनीं घायाळ होऊन लक्ष्मी जेव्हां कासाबीस झाली, तेव्हां तिचीं मुलं अगदीं घाबरून गेलीं. त्यांचीं केविलवाणीं तोंडं बघून तिला अगदीं भडभडून आलं. तिनं कसंतरी त्यांना जवळ घेत "खेळा जा बाहेर" असं म्हटलं आणि त्यांच्या तोंडावरून हात फिरविला. मुलांचीं सुकलेलीं तोंडं पहातांच तिला जोराचा हुंदका आला. तेव्हां राधाकाकूंनीं मुलांना बळजबरीनं बाहेर घालवलं आणि 'खेळा जाबा भाईर हं !' असं त्यांना बजावीतच त्या लक्ष्मीकडे सहानुभूतीनं पहात म्हणाल्या, "काय डोस्क्यावरचं बज्जं हाइ हुई बाई तवा वाटून घेऊं ? सोस आतल्या आंत. आधींच तुजं हें सारं बगून पोरं घाबरून गेल्यातीं. त्येंच्या तोंडचं पानी पळालया खुळे......"

राधाकाकूंच्या ह्या बोलण्यामुळं धीर येऊन लक्ष्मी त्यांना जोरानं बिलगली. त्यांच्या कुशींत शिरत तिनं 'काकूऽऽ' एवढंच जेव्हां म्हटलं, तेव्हां राधाकाकू तिला पोटाशीं धरीत म्हणाल्या, "घाबरू नग अशी. मी हाई की ग ! आन् असं भिऊन भागतंय हुई कुटं ?"

राधाकाकूंच्या सांगण्यावरून जेव्हां गोविंदानं एक जवळपासची सुईण बोलावून आणली तेव्हां त्या तिला म्हणाल्या "बग बाई तूं तरी ! पोरांच्या आईला एवडं घाल पांगरून. तुजा हात लई येससरी हाय म्हन म्यां हाळी मारलीया..."

सुईणीनं लक्ष्मीला तपासलं. पोटांतल्या मुलाची एकंदर बैठक थोडी विचित्र वाटल्यानं तिच्या देखील काळजांत चर्रर्र झालं. पण कांहीं

झालं तरी लक्ष्मीला वांचवावयाची शिकस्त करावी म्हणून तिनं मनाचा हिय्या केला. कारण नेहमींच्या बाळंतपणाला येणाऱ्या बाईपेक्षां लक्ष्मीची स्थिति थोडी वेगळी होती. नवऱ्यानं मारल्यामुळं अचानक बसलेल्या धक्क्यानं ती घाबरली होती. भीतीनं तिचा घसा कोरडा पडला होता. हातपाय गार झाले होते आणि तोंड पांढरं फटक पडलं होतं...लक्ष्मीच्या प्रसूति वेदना मधून मधून कमी जास्त होत होत्या. तिला तें सोसवत नव्हतं. म्हणून अखेरीस तिचं बाळंतपण सुलभ होईल अशी एकदोन इंजक्शनंहि सुईणीनं तिला दिलीं...

अखेर संध्याकाळीं साडेसात आठच्या सुमारास प्रसूतिवेदना असह्य होऊन लक्ष्मी जोरानं किंचाळली आणि सुदैवानं त्याचवेळीं तिची सुखरूप सुटकाहि झाली...पण कांहीं केल्या तें मूल रडेनाच इतर मुलं जन्मतःच रडतात तसं ! त्यामुळं नाळ कापून टाकून त्याच्या अंगावर गार पाणी शिंपडलं गेलं...त्याला उलथं पालथं केलं आणि त्याच्या जन्माची खूण म्हणून चिपाडाच्या गणग्याणं घरांतलं घंगाळ वाजवण्यांत आलं ! तेव्हां त्यानं 'टँहऽऽऽ' करीत जगांतली आपली पहिली शीळ घातली. आपले चिमुकले डोळेहि उघडले...

बाळाच्या रडण्याचा आवाज यायला आणि बाबूरावांनीं नेहमीं प्रमाणं डोक्यावरची टोपी काढून हातांत फिरवीत घरांत यायला एकच गांठ पडली. घरांतला एकंदर प्रकार बघून ते दारांत थबकले आणि त्यांना बघून राधाकाकू कडाडल्या, "आलास तसा चालता हो अणूदर... मानूस हाइस कां कोन ? ...तुज्या परास नुसता दगूड दिकुन लई बरा..."

आजपर्यंत आपणाशीं कधींहि फारसं न बोलणाऱ्या राधाकाकूंचा हा धडाका ऐकून बाबूराव चांगलेच वरमले. झाल्या प्रकारानं त्यांची बोबडी वळायची वेळ आली ! ...मुकाट्यानं खालीं जाऊन त्यांनीं काळाकुट्ट अंधार पडलेल्या घरांत खिशांतल्या काड्यांच्या पेटींतील काडी ओढून शिलगावीत दिवा लावला.

त्यावेळीं माजघरांतल्या एका कोपऱ्यांत एकमेकांना बिलगून गुपचूप

बसलेलीं आपलीं पोरं दिसतांच ओशाळून जाऊन त्यांनीं त्यांना तिथून उठवीत विचारलं, "कांहीं खाल्लं विल्लंत कीं नाहीं ? आणि असे अंधारांत का रे ?"

आईच्या काळजीनं काळवंडून गेलेला गोविंदा आपल्या अंगावरचा बाबूरावांचा हात झिडकारीत म्हणाला, "दूर व्हा अगोदर ! आई बरी झाल्याशिवाय कांहीं खायचं नाहीं आम्हांला...मीं खाऊ मागितला म्हणून तुम्ही तिला मारलंत नाहीं का ?..."

"कुणी सांगितलं तुला ?" असं बाबूरावांनीं घाबरून विचारतांच सखूला जवळ ओढून घेत गोविंदा म्हणाला, "कशाला पाहिजे कुणीं सांगायला ? तुम्ही मारल्याशिवाय आई अशी पडायचीच नाहीं..."

आईबद्दलच्या मुलांच्या या आत्मविश्वासानं बाबूरावांच्या डोक्यांत खाडकन् प्रकाश पडला...आत्तां कुठं केवळ मुलांना खाऊ हवा म्हणून पैसे मागतांच आपण भलतंच करून बसलों याची त्यांना पश्चात्ताप होईल एवढी जाणीव झाली !...माणुसकीच्या बीजांकुरानं त्यांच्या हृदयांत प्रवेश केला...त्यांच्या बापाच्या आंतड्याला अगदीं पिळवटून जाण्याइतकी जाग आली...

"थांबा हं खाऊ आणतों" असं मुलांना सांगून ते जेव्हां बाहेर निघाले, तेव्हां इतका वेळ गप्प होती ती सखू त्यांना निक्षून सांगावं तसं म्हणाली, "तुमच्या जवळचा खाऊ नकोच मुळीं. आई देईल तेव्हांच खाईन मी. होय ना रे दादा ?" गोविंदानंहि जेव्हां तिच्या तोंडावरचे केंस सावरीत तिला साथ दिली तेव्हां बाबूराव हतबुद्ध होऊन त्यांच्याकडे पहात राहिले !...पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करून सखू गोविंदाला म्हणाली, "दादा, बाळ झालं ना रे आईला ?"

आई होती त्या माडीकडे करुण दृष्टीनं पहात गोविंदा तिला म्हणाला, "हो."

"पण काय झालं रे ? मुलगा कीं मुलगी ?"

"गप ग ! मग बघूं तें. आधीं आई बोलायला हवी ग !..."

एवढं बोलून जेव्हां गोविंदा सखूला खालीं बसवीत पुन्हां म्हणाला, "थांब हं, मी बघून येतों" तेव्हां सखू त्याला मागें ओढीत म्हणाली,

" काकूबाई रागावतील !'

" रागवूं देत ग ! "

" नाहीं नाहीं, जाऊं नकोस. अरे त्या म्हणाल्यात कीं, मी बोलवीन तेव्हांच या वर ! "

शेवटीं आपापसांत तडजोड होऊन हीं बहीण भावंडं एकमेकांना बिलगून खालींच झोंपलीं. आणि मुलांची आपल्या आईबद्दलची ही निष्ठा बघून थोबाडीत मारल्याप्रमाणं मनस्ताप असह्य झालेले बाबूराव मुकाट्यानं भिंतीला टेकून स्वस्थ बसून राहिले.

त्याच वेळीं बराच वेळ झालेल्या श्रमानं आणि काळजीनं भारावलेलं आपलं अंग जमिनीवर टाकीत राधाकाकू लक्ष्मीला म्हणाल्या, "पड बाई आतां बिनघोरी...किती घाबरीबलं हुतंस काय सांगूं लक्ष्मी !... "

आपल्या आईप्रमाणं जिवापाड श्रम घेऊन वागणाऱ्या त्या प्रेमाच्या आणि मायेच्या चालत्या बोलत्या देवतेकडे, राधाकाकूंकडे, पहात लक्ष्मी म्हणाली, " तुम्ही होता म्हणूनच जगलें मी. नाहीं तर माझी पोरं आईविना पोरकीं झालीं असतीं आज..." आणि नुकत्याच जन्मलेल्या त्या नव्या चिरंजीवाकडे पहात ती पुन्हां म्हणाली, " आणि हा गुलाम..." पण तिला पुढं बोलूं न देतां राधाकाकू म्हणाल्या, " नीज आतां गुमान. खालीं पोरं पडल्यात चांगली जास्तानी...!"

आपल्या शेजारीच बाजल्यावर निजलेल्या बाळाकडे लक्ष्मीनं मान वळविली. त्याच्या लुसलुशीत आणि मऊ मऊ लागणाऱ्या एवढयाशा तोंडावरून तिनं हात फिरविला. समाधानानं झोपीं गेलेल्या त्याच्या तोंडाकडे पहात सारं दुःख, साऱ्या यातना, सारी काळजी, सारं सारं कांहीं विसरून आपल्या त्या चिमुकल्याला कुरवाळीत ती पुटपुटली, " माझा राजा गऽ तरी तो..."

● ● ●

## सुखाची हिरवळ— ३

" अफाट पसरलेल्या वाळवंटांतील हिरवळीच्या एखाद्याच चिमुकल्या जागेनं तिथून जाणाऱ्या वाटसरूला केवढा तरी आनंद वाटतो...'

आपल्या हातांतील भूगोलाचं पुस्तक नाकासमोर धरून गोविंदा मोठमोठ्यानं वाचीत होता. त्यावेळीं लक्ष्मी कमरेवर घागर आणि हातांत कासरा घेऊन आडावर पाणी आणायला चालली होती. तिच्या कानावर गोविंदाच्या तोंडचं वरील वाक्य जेव्हां पडलं तेव्हां ती पुढं न जातां दारांतच थबकली. तिनं गोविंदा वाचीत बसला होता तिकडे वळून पाहिलं. तोंडांत टाकलेली लेमनची गोळी खात गोविंदा मोठ्या गमतीनं अभ्यास करीत असलेला बघून लक्ष्मी गालांतल्या गालांत हंसली. क्षणभरानं त्याच्याकडे पहात आणि आडावर जात ती स्वतःशीच पुटपुटली, " माझ्या रुक्ष संसाराच्या प्रवासांत देखील माझीं हीं लाडकीं मुलं त्या वाळवंटांतील हिरवळीचाच आनंद मला देतात ! तेंच माझं खरं सुख... " आणि मग समाधानानं कमरेवरची घागर नीट सावरून धरीत ती सरळ आडावर निघून गेली.

लक्ष्मी रहात होती त्या घराच्या मालकानं आपल्या घरापाठीमागें एक सुंदर बाग तयार केली होती. ह्याच बागेच्यां मध्यावर तो आड होता. लक्ष्मीनं आडावरच्या रहाटाला बरोबर आणलेला कासरा गुंडाळला;

आणि त्याच्या कडेला असलेला गळफास घागरीच्या गळ्याशीं बसवीत असतांनाच, तिनं सहज त्या जवळच्या बागेकडे पाहिलं. तिथं त्रिकोणी तांबूस कौलांच्या भरगच्च तटबंदीनं नटलेलीं अशीं हिरवीगार अनेक फुलझाडं तिला दिसलीं. त्यांत तांबडा, पांढरा, पिवळा, गुलाबी असा विविध रंगाचा टपोरा गुलाब होता, सुवासिक व भरदार मोगरा होता, टवटवीत शेवंती होती, हंसरी सदाफुली होती, मोहक निशीगंध होता; आणि वाऱ्याच्या झुळकीसरशी स्वैरपणानं माना डोलावणारीं विलायती रोपट्यांवरचीं अनेक रंगीत फुलंहि होतीं.

फुलझाडांवरचीं तीं सुंदर टपोरीं फुलं पहातांच त्यांतलं एखादं फूल तोडून घ्यायचा मोह लक्ष्मीला अगदीं अनावर झाला. "बायकाची जात म्हणजे फुलं दिसलीं कीं, त्यावर सारं काम सोडून चटकन् झडप घालण्यांत पटाईत. त्याला तूं तरी कशी ग अपवाद ताई?" लहान असतांना केव्हां तरी लक्ष्मीच्या भावानं तिला असं म्हटल्याचं त्यावेळीं आठवतांच 'हो हो, मला पण आवडतात फुलं, काय म्हणणं आहे?' असं उत्तर आपल्या भावाला मनांतल्या मनांतच देत लक्ष्मी हातांतली घागर तशीच तिथं ठेवून त्या फुलांजवळ गेली. खालीं वाकून त्यांतल्या एका टपोऱ्या पण अर्धवट उमललेल्या सपर्ण तांबड्या गुलाबाला तिनं हात देखील घातला. पण तेवढ्यांत घरमालकाचं कांहीं बोलणं कानावर आल्यानं 'उगीच नको बाई खटखट' असं पुटपुटत आणि फुलाजवळचा हात मागें घेत ती नाइलाजानं आडावर आली.

लक्ष्मीनं गळफास बसवलेली घागर हळूच आडांत सोडली आणि खडाड्...खट्....खडाड्...असं रहाटाचं संगीत सुरू झालं.

आडांतील काळयाभोर स्वच्छ पाण्यांत डुबत असलेल्या घागरीला नीट बुडवावी म्हणून लक्ष्मी कासरा खेचणार तोंच 'आई ग ऽ हा पाहिलास का राजा किती वळवळतोय तो!' असं सखूचं बोलणं तिच्या कानावर आलं. त्यामुळं तिनं एक हात रहाटावर ठेवला आणि मागें वळून पाहिलं. सखू राजाला नीट उभा करीत विचारति होती, 'कोंबडा कसाऽ

करतो राजा ? ' आणि राजा आपले चिमुकले डोळे मिचकावून हंसत हंसत तिला मान डोलावून सांगत होता, "कोंबा, कुऽकूऽऽऽ कूऽऽऽ" आपल्या छोट्या राजाची ही कोंबड्याची नक्कल ऐकतांना नकळत लक्ष्मीचा दुसरा हातहि जागचा निसटल्यामुळं भिरर्...खडाड्...खट्...करीत रहाटानं अंग मोडून आंगाला आळोखे पिळोखे दिले. त्यामुळं बरेच दिवस वापरल्यामुळं निकामी होत चाललेल्या कासऱ्यानं त्या रहाटाला रामराम ठोकून एकदम आडांत उडी घेतली!

रहाटाचा खडखडाट एकदम झाल्याचा आवाज ऐकतांच लक्ष्मीनं छोट्या राजावर खिळलेली आपली नजर चटकन् मागें वळविली. त्यावेळीं गच्च पोट भरेल एवढं पाणी पिऊन सुस्त झालेली घागर आडाच्या तळाशीं आराम घेत असल्याचं ध्यानांत येतांच लक्ष्मीच्या काळजांत धस्स झालं..."अगबाई, आतां काय करायचं?" असं पुटपुटतच तिनं वाड्यांतील एका चांगल्या पोहणाऱ्या मुलाला बोलावलं आणि त्याच्याकडून ती घागर कशीबशी वर काढली...घागर समोर दिसली तेव्हां कुठं लक्ष्मीच्या जिवांत जीव आला. नाहींतर घागर आडांत पडली म्हणून ऐकाव्या लागणाऱ्या बाबूरावांच्या भरमसाट बडबडीशीं निकराचा सामना देण्यापर्यंत वेळ यायची! या कल्पनेनं तिचं धाबं दणाणून जाऊन छातींत चांगलीच धडधड सुरू झाली होती...

शाळेंत जाण्याची मुलांची वेळ होतां चलक्ष्मीनं आपल्या राजाला—हो राजाच नाहींतर काय ? त्याचं नांव कुणी ठेवलं होतं ? कसाबसा आईच्या कुशींतल्या उबीनं तो वाढला होता हेंच त्याचं नशीब. लक्ष्मीला त्याचं हें नशीब बलवत्तर ठरवायचं होतं. म्हणून तीच त्याला 'राजा', 'राजा' म्हणत होती...आणि तिच्या मागोमाग मग तो सर्वांचाच राजा झाला होता——अंगावर प्यायला घेत बसल्या बसल्याच मुलांना जेवायला वाढलं. त्यावेळीं राजा मन लावून आईला पीत होता. त्याच्या पिण्याचा घट्...घट्...असा अस्पष्ट येणारा आवाज ऐकून सखू आईला म्हणाली, "कांहीं नको जा त्याला प्यायला देऊस आई! माझे केंस ओढून ओढून किती बिसकटून टाकलेत पाहिलेस ?" आणि मग तिनं

आपल्या विसकटलेल्या केंसांच्या बटा डाव्या हातानं हळूंच कपाळावरून मागें सारल्या.

राजाच्या मऊ मऊ केंसावरून प्रेमानं हात फिरवीत लक्ष्मी सखूला म्हणाली, ‘ तूंच त्याची खोडी काढली असशील अगोदर ! होय ना रे राजा ? ’ आपल्या आईचं हें म्हणणं खरं वाटून कीं काय राजानं चटकन् आई जवळचं मं मं सोडून तिच्या पदराआडून आपलं तोंड बाहेर काढलं; आणि तो खुदकन् हंसला. तें बघून त्यानं केलेला गुन्हा पार विसरून जाऊन उलट त्याचं कौतुक करीतच सखू म्हणाली, “ अरे गुलामा ऽ ! ”

सखूचं हें बोलणं ऐकून लक्ष्मीहि मनापासून हंसली आणि ‘ आतां असं करायचं नाहीं हं तुझ्या आक्काताईला ! ’ असं राजाला बजावीत तिनं आपल्या पदरानं त्याच्या ओठावरचं दूध हळूच टिपून घेतलं. पोट भरल्यामुळं राजा खुषींत येतांच लक्ष्मीनं त्याला प्रेमानं कुरवाळीत खालीं झोपवला; आणि गोविंदाला हवा होता तेवढा भात वाढायला म्हणून ती तिथून उठली.

मुलं शाळेंत निघून गेल्यावर लक्ष्मीनं बराच वेळ घरांतलं काम आवरलं. एक वाजून गेला तरी बाबूरावांचा जेवायला पत्ता नव्हता ! अखेर त्यांची वाट पहात तिनं आपल्या राजाला त्याच्या इच्छेप्रमाणं मांडीवर घेऊन गोड जेवण भरवलं. चिमण्या राजाचं पोट चांगलं भरल्यामुळं त्याला गुंगी यायची चिन्हं दिसतांच लक्ष्मीनं त्याला पाळण्यांत नीट झोपवला; मग त्याच्या अंगावर मऊ पांघरुण घातलं. राजाला झोप लागावी म्हणून पाळण्याची दोरी हातांत धरून त्याला झोके देत ती गाऊं लागली—

**बाळ नवतिचा ऽ प्रेमाच्या ग चांदण्यांत**
**खेळतो सदा ऽ**
**बोबडी फुलें ऽ घोळवुनी अमृतांत**
**टाकि बाइ हा ऽ**
**नेत्र झाकुनी ऽ सांठवीत शिंपल्यांत**
**मोतिं सानुला**

आईच्या गोड गळ्यांतून ऐकूं येणारी अंगाई आणि तिच्या मायेच्या अत्यंतिक जिव्हाळ्यांतून ओसंडून बाहेर पडणारं वात्सल्य या दुहेरी उबेनं चिमणा राजा केव्हांच झोपीं गेला.

आपला आवाज प्रत्येक शब्दाशब्दाला कमी कमी करीत लक्ष्मीनं गाइलेलं हें अंगाई गीत बाबूराव दरवाजांत उभे राहून ऐकत होते. गाणं संपतांच ते सरळ आंत आले आणि लक्ष्मीला म्हणाले, " किती छान गाणं म्हणत होतीस ग ! "

अलीकडे बाबूराव बरेच निवळले होते खरे, पण कितीतरी दिवसांत त्यांनीं लक्ष्मीशीं असं सहानुभूतीचं बोलणं केलं नव्हतं. त्यामुळं लक्ष्मीला त्यांचे हे शब्द भारी मोलाचे वाटले. अशाच या प्रेमळ शब्दांची सावली आपल्या लेकीला कायमची मिळावी म्हणून लक्ष्मीच्या आईबापांनीं बाबूरावांना घरचं कुणी सुद्धां नाहीं हें माहीत होतं तरी त्यांना आपला जावई करून घेतलं होतं. चारचौघांकडून बाबूरावांची चौकशी केली होती तेव्हां सगळ्या बाजूंनीं हें स्थळ उत्तम आहे अशीच सर्वांनीं लक्ष्मीच्या वडिलांना माहिती दिली होती. नाहीं म्हणायला बाबूरावांना दुसरं कुणी नाहीं एवढाच दोष ठळकपणानं दिसला होता ! पण मुलगा स्वभावानं चांगला, शिकला सवरलेला, घरची शेतीभाती, पै पैसा भरपूर, हाडापेरानं मुलाचा बांधा सुबक आणि लक्ष्मीला शोभेल असा तिच्या मानानं उंचा पुरा वगैरे. त्यामुळं त्यांच्या इतर गुणापुढं हा दोष सहज झांकून गेला होता...पण लग्न झाल्यानंतर बाबूराव पूर्वीपेक्षां पुष्कळच बदलत गेले. कुणाची तरी संगत म्हणून म्हणा किंवा आपल्या श्रीमंतीची धुंदी त्यांच्या डोळ्यांवर चढली म्हणून म्हणा, बाबूरावांच्या स्वभावांत कल्पनेबाहेर फरक पडत गेला...आणि त्यामुळं मघांप्रमाणं सुखाचे शब्द कानावर पडण्याचं भाग्य दुर्दैवानं लक्ष्मीच्या वांट्याला क्वचितच येऊं लागलं...

" माझ्याशीं तुम्ही नेहमीं असं बोलाल तर... " असं कांहींतरी बाबूरावांना बोलून दाखवायची लक्ष्मीला बिलक्षण इच्छा झाली. त्यावेळीं पुन्हां पुन्हां तिच्या कानांत त्यांचं तें वाक्य घुमूं लागलं. पण उगाच

थोड्यानं देखील स्वारीचं मन फिसकटेल या कल्पनेनं आलेल्या संधीचा विरस न होऊं देतां ती कांहीं उत्तर देण्याऐवजीं फक्त गालांतल्या गालांत हंसली.

नाहींतरी नेहमींपेक्षां बाबूराव आज भलतेच खुषींत होते. लक्ष्मीनं वाढल्यानंतर जेवतां जेवतां शेवग्याची शेंग चोखून टाकीत ते गमतीनं हंसून लक्ष्मीला म्हणाले, " तूंहि घे ना लगेच जेवायला. जेवल्यावर मला एक गंमत दाखवायचीय तुला !..."

जेवायला बराच उशीर झाल्यामुळं आणि राजाला वेळेवर दूध यायला हवं म्हणून लक्ष्मीनं या पडत्या फळाची आज्ञा तेव्हांच मान्य केली. तिनं चटकन् आपलं पान तयार केलं. पण जेवायला सुरवात करण्यापूर्वी पुढ्यांतल्या भाकरीचा तुकडा मोडीत लक्ष्मीनं हळूच बाबूरावांना विचारलं, " कसली गंमत दाखवणार हो ? कळूं दे तरी ! "

कपांत ठेवलेलं ताक पिऊन टाकीत बाबूराव म्हणाले, " छे ! आत्तां नाहीं बुवा आपण सांगणार. जेवण झाल्यावर मात्र नक्की. "

" पण आतां थोडं तरी सांगितलं म्हणून..."

" छे छे ! मग त्यांतली सारी चव जाईल. "

" हो का ? असली कसली हो मग ही तुमची गंमत ?...काय बाई तरी हें यांचं ! असं हो काय ? सांगा ना ? "

" अग पण जेवीपर्यंतसुद्धां तुला दम नाहीं ना धरवत ? नाहींतरी तुम्ही बायका म्हणजे भारीच उतावळ्या बुवा ! जरा म्हणून दम धराल तर शपथ !...छे ! आतां तर मी जेवल्याशिवाय मुळींच सांगणार नाहीं ....एकदां ठरलं म्हणजे ठरलं. "

आतां यावर आणखी छेडलं तर बाबूराव उगाच एकदम भडकतील आणि कधीं नव्हे तो जमलेल्या खेळीमेळीचा हा डाव एका क्षणांत मोडला जाईल या विचारानं अखेर " बरं बाई, नका सांगूं मग तर झालं ! " असं म्हणून लक्ष्मीनं त्यांना हवं तें वाढलं; आणि तीहि जेवूं लागली. पण आपणाला बाबूराव काय सांगणार अशी नवी बातमी या गोष्टीकडेच तिचं सारं लक्ष वेधलं गेल्यामुळं तिला धड नीट जेवायलाहि जमेना !

तिची ती धांदल बघून बाबूरावच अखेर "खरंच, भारी बुवा उतावळी इं तूं" असं म्हणत पानावरून उठले. त्यामुळं घाइघाईनं लक्ष्मीनंहि आपलं जेवण उरकलं. त्यानंतर खरकटी उष्टी बाजूला सारायच्या भानगडींत न पडतां आपला ओला हात पदराला पुशीतच ती बाबूरावांकडे येत म्हणाली, " हं ! आतां जेवण झालंय. सांगा बघूं आतां तुमची कसली गंमत आहे ती ! "

हातांतील पानं धोतराला पुसून बाबूरावांनीं चुना लावला. सुपारी आडकित्त्यानं कातरून घेतली; आणि काताचा बारीकसा खडा त्यांत टाकून तयार झालेला विडा तोंडांत टाकला. विडा खातां खातां तंबाखूची बुकणी तोंडांत टाकून बाबूराव घरांतून फेऱ्या घालूं लागले. पण त्यांनीं लक्ष्मीला कांहींच सांगितलं नाहीं ! त्यामुळं चिडून ती म्हणाली, ' हें हो काय ? ' तेवढ्यांत कोटाच्या खिशांतील एक पाकीट वर काढून तिच्या हातावर ठेवीत बाबूराव म्हणाले, " हीच ती गंमत. एका माणसाला ही गंमत वाचली कीं किती आनंद होईल ठाऊक आहे ? "

लक्ष्मीनं मोठ्या उत्सुकतेनं तें पाकीट घेतलं आणि त्यावरचं अक्षर पाहिलं. फार दिवसांनीं डोळ्यासमोर दिसणारं तिच्या भावाचं तें अक्षर पहातांच लक्ष्मी चटकन् माजघरांत गेली. घाईघाईनं तिनं तें पत्र फोडलं आणि आधाशीपणानं वाचायला आरंभ केला. तिच्या भावानं तिला लिहिलं होतं——

" **ताई,**

आश्चर्य वाटेल नाहीं ग तुला माझं पत्र बघून ! तूं म्हणशीलसुद्धां कीं, भाऊला कशी काय आपली आठवण झाली म्हणून ! खरं ना ग ? पण थांब. तुझा राग काढायला मी उद्यांच तुझ्याकडे येत आहे. आणि बरं का, मी तुला न्यायला येणार आहे हं ! काय ग ताई, तुला हें खरं-सुद्धां वाटायचं नाहीं नाहीं ? तूं कांहीं म्हण. पण मी उद्यां येतोंय हें नक्की. आणि हें बघ, तसं म्हणशील तर विशेष असं कोणतंच कारण नाहीं. आईला आपलं वाटतंय कीं चार दिवस लेक यावी आपल्या घरीं

तेव्हां म्हटलं तिची इच्छा आहेच तर जावं नि आणावं तुला लगेच. अनायासेंच सर्वांची भेट होईल. पण काय ग ताई, येशील ना तूं? नाहीं-तर मी आपला तुला न्यायला म्हणून यायचा आणि तूं म्हणायचीस कीं, मला वेळ नाहीं! झालं का मग? सगळंच मुसळ केरांत जायचं!...

पण थांब. मी वेड्यासारखा तुझी परवानगी कशाला विचारीत बसलोंय हा! श्री. दाजीसाहेबांनाच विचारतो झालं आल्यावर. ते नाहीं म्हणायचे नाहींत असं वाटतं. आणि बरं का, तूं मात्र 'नाहीं, होय' असं कांहीं उलट टपालानं कळवायच्या भानगडींत पडूं नकोस. हो, खरं तें सांगतोंय. कारण तुझं पत्र मला येण्यापूर्वींच मी तुझ्या घरीं खुशाल येऊन बसायचा!

बरं आतां जास्त लिहीत नाहीं. किती लिहिलं तरी काय बोलल्या-सारखं सुख मिळणार आहे थोडंच? आणि सारंच लिहून बसलों तर मग समक्ष काय बोलायचं ग?

घरीं सर्व ठीक. चि. चिंगी आत्या येणार म्हणून मजेंत आहे. श्री. दाजीसाहेबांना नमस्कार. चि. राजाला केव्हां पाहीन असं झालय बघ. केवढासा होता नाहीं ग मी आलों तेव्हां? त्याला म्हणावं आलाच हं मामा. गोविंद, सखूला आशीर्वाद.

तुझाच—भाऊ."

लक्ष्मीनं हें एवढंसंच पत्र कितीदांतरी वाचलं. माहेरी जायला मिळणार म्हणून किती आनंद झाला तिला! त्या नादांत तिच्या डोळ्या-समोर माहेरच्या असंख्य आठवणींनीं भरलेलीं विविध दृश्यं नाचूं लागलीं ...पण तिला बिचारीला काय ठाउक कीं, पोष्टांत जाऊन बाबूरावांनीं तें पाकीट अगोदरच वाचून पुन्हां जसंच्या तसं चिकटवून आणलं होतं आणि कांहींतरी बेत मनांत आंखूनच तें पत्र त्यांनीं मुद्दाम माग-वलं होतं तें!...

माहेरचं पत्र आलं कीं, आपल्याला आनंद होतो हें ठाऊक असल्या-मुळं बाबूराव ही गंमत दाखवायचं सोंग आणीत होते अशी आपली

लक्ष्मीची समजूत. त्याप्रमाणं हंसतमुखानं तें पत्र हातांत धरून ती बाबूरावांकडे येत त्यांना म्हणाली, " ऐकलंत का ? भाऊ येतोय म्हटलं आज आपल्या घरीं. "

" अस्सं ! वा, वा ! फार छान. किती दिवसांत आले नाहींत नाहीं ? बर झालं. कितीच्या गाडीनं येतो वगैरे कांहीं म्हटलंय कां त्यांत ? "

असं हें विशेष खेळीमेळीचं उत्तर बाबूरावांकडून आल्यामुळं लक्ष्मीनं त्यांना आणखी सांगून टाकलं, " आणि बरं का, तो म्हणतोय कीं... "

" काय म्हणताहेत आणखी ? आं ! "

" तो म्हणतोय कीं, तुला न्यायलाच येतोय म्हणून ! "

" अरे वा ! मग तर फार सुंदर. छान छान. येऊं देत. बिघडलं कुठं न्यायलाच आले म्हणून ? हो, अनायासेंच चार दिवस हवापालट होईल. शिवाय मुलांनाहि आजोळीं रहायला मिळेल थोडे दिवस. तूं जा वेलाशक. माझी कांहीं ना नाहीं. "

उभ्या जन्मांत—लग्न झाल्यानंतरच अर्थात्—एवढ्या लौकर माहेरीं जायला परवानगी मिळालेली ऐकून लक्ष्मीला मात्र मोठं नवल वाटलं. कारण बरीचशी बाचाबाच झाल्याशिवाय तिला कधींच माहेरी जायला मिळालं नव्हतं. अलिकडे चारसहा वर्षांत तर तिला मुळींच जायचं नाहीं असं बाबूरावांनीं दम देऊन सांगितलं होतं !...त्यामुळं तिनं त्यांना आश्चर्यानं विचारलं, " अगदीं खोटं ! होय ना ? "

आपल्या डोळ्यावरचा चष्मा काढून शर्टला पुशीत बाबूराव तिला सहज बोलून गेले, " म्हणजे मी तुला माहेरीं कधीं धाडीतच नाहीं कीं काय, तेव्हां तुला एवढी शंका वाटते ती ? "

" तसं नव्हे हो. पण... "

" पण बिण कांहीं नाहीं. मलाहि उद्यां मुंबईला जायचंय. तेव्हां या तुम्हीहि चार दिवस जाऊन. "

त्यांचं असं बोलणं चाललं आहे तोंच मधली सुटी झाली म्हणून घरीं आलेल्या मलांना जवळ घेत बाबूराव म्हणाले, " बरं का सखू, तुमचा

मामा येणार आहे आज ! आणि बरं का रे गोविंदा, तो म्हणे तुम्हांला आजोळीं नेणार आहे ! काय, जाणार ना मग ? ”

गोविंदाला आणि सखूला वडिलांनीं सांगितलेली ही हकीकत ऐकून मनस्वीं आनंद झाला. पण त्यावर विश्वास न बसून त्या दोघांनीं एकदम विचारलं, “ खरं ना पण ? ” आणि आईला जाऊन बिलगत त्यांनीं मानेनं खुणावीत तिलाहि विचारलं, “ खरं का ग आई बाबा म्हणतात तें ?... ”

“ हो तर ! ” असं लक्ष्मी त्यांना जवळ घेऊन सांगत होती. तितक्यांत राजा झोपेंतून उठून रडूं लागल्यानं ‘ आलें हंऽ’ असं म्हणत ती चटकन् त्याला घ्यायला म्हणून आंत निघून गेली.

त्याच वेळीं गांवाहून आलेला लक्ष्मीचा भाऊ महादेव तिच्या घरांत आला. त्याला बघून सखू धांवत धांवत आईकडे जात म्हणाली, ‘ अग आईऽ मामा आला सुद्धां ! ” आणि गोविंदानं त्याच वेगानं जाऊन मामाला मिठी मारली.

महादेव आल्यामुळं घरांत सगळीकडे आनंदी आनंद झाला. लक्ष्मीला तर भारीच समाधान वाटलं. राजाला सखूकडे देत तिनं महादेवाला दारांत उभा केला आणि त्याच्या पायावर पाणी ओतून हातावर गुळाचा खडा देत म्हटलं, “ हं, आतां चल घरांत. ”

महादेवाला घरांत आणून सगळीजण त्याच्याशीं गप्पा मारण्यांत गुंतलीं असलेलीं बघून बाबूरावांनीं बाजूला जाऊन चटकन् आपल्या अंगावर बाहेर जायचा पोषाख चढवला. क्षणार्धांत ते जे गडबडीनं बाहेर पडले तें घरांत कुणाच्या देखील ध्यानांत आलं नाहीं ! कारण महादेवानं जेव्हां लक्ष्मीला, ‘ ताई, दाजीसाहेब कुठं आहेत ? ’ असं विचारलं तेव्हां ती ‘ थांब हं, बोलावतें त्यांनाच इकडे ’ असं म्हणून ‘ अहो, ऐकलंत कां, भाऊ आला देखील एवढ्यांत ’ असं म्हणतच बाबूरावांना बोलवायला म्हणून तिथून उठली....

● ● ●

## मीलन—  ४

माणसाची खरी धनदौलत जर कोणती असेल तर ती म्हणजे त्याचं स्वतःचं मन. क्षणाक्षणाला गरुडाला देखील खालीं मान घालायला लावील एवढी जोराची भरारी मारून माणसाचं मन पृथ्वीपर्यटनाची वारी तेंव्हांच करूं शकतं ! नाहींतर सुंदरीची इच्छा म्हणून पंढरपूरच्या प्रवासाला निघायची तयारी करीत असतांना बाबूरावांच्या डोळ्यासमोर लहानपणीं भूगोलांत वाचलेलीं विविध स्थळवर्णनं कशाला दिसूं लागलीं असतीं !...डाव्या हातांत सिगरेट धरून मधून मधून तिचा झुरका मारीत असतांना काश्मीरच्या नंदनवनांतून दिसणारीं हिमालयाची पांढरी शुभ्र शिखरं, आग्र्याचा सुप्रसिद्ध ताजमहाल, विजापूरचा गोलघुमट, गंगा यमुनांचा गोड संगम, कन्याकुमारीच्या समुद्रकिनाऱ्यावर असलेल्या चमकदार वाळूची दिसणारी अवर्णनीय अशी रंगीत शोभा, ऑस्ट्रेलियांतील शेतावरून पळणारीं गुबगुबीत आणि चपळ मेंढरं, जपानमध्यें होडीप्रमाणें पाण्यावर तरंगणारीं घरं, जर्मनींतल्या सुंदर इमारती, अमेरिकेंतील उंच उंच अशीं भव्य निवासस्थानं, रशियांतील नव्या युगाला शोभणारीं नाट्यगृहं, एडिंबरोमधील प्रिन्सेस स्ट्रीटवरचा मनोवेधक देखावा, स्वित्झरलंडमधील रम्य वनस्थळं, चीनची जगप्रसिद्ध तटबंदी, ग्लासगोची आर्ट गॅलरी, बडोद्याचं कीर्तिमंदिर, महाबळेश्वरावरून दिसणारी

सूर्योदयाची शोभा वगैरे अनेक धावतीं दृश्यं डोळयापुढून सरकतांना बाबूराव स्वतःशींच पुटपुटले, "छे बुवा! एकदां विमानानं चक्कर मारायला हवीच सगळीकडे..."

एरव्हीं रागीट दिसणारे बाबूराव आज भलतेच आनंदांत होते. अंतःकरणांतल्या समाधानाची छटा त्यांच्या चेहऱ्यावर पूर्णपणें उमटली होती. थोडी फार उरलेली वाडिलोपार्जित शेती विकायची कल्पना कित्येक दिवस त्यांच्या मनांत घोळत होती आणि आज तर ती प्रत्यक्ष अमलांत आणायचा त्यांनीं आपल्या मनाशीं हिय्याच केला होता. शेत विकायची वेळ आली कीं, एखादा माणूस निराशेनं वेडा होऊन जातो. पण बाबूरावांना तसं कांहींच होत नव्हतं. उलट ते समाधानानंच हा सौदा ठरविण्याचा विचार करीत होते...

प्रवासाला निघायची तयारी करण्यांत गुंग असतांना बाबूरावांना कशाचंच भान राहिलं नव्हतं. त्यांच्या हातांतील सिगारेट त्यांच्या हाताला चटका बसेल एवढी विझत चालली होती...त्यांच्या शर्टचं एकहि बटणं घातलेलं नव्हतं...नेहमीं डोळ्यांवर नीट बसणारा चष्मा आपली एक बाजू कानावर ठेवून दुसरीवर अधांतरींच लोंबकळत होता तरीसुद्धां त्यांना त्याची दाद नव्हती!...शेवटीं अगदींच संपत आलेल्या सिगारेटचा एक झुरका मारून त्यांनीं शू SSS करीत तो धूर तोंडांतून बाहेर सोडला आणि बसल्या जागेवरून उठून सामानाची हालवाहलव करायला सुरवात केली. इकडचं सामान तिकडं टाकतांना त्यांतलं आपणाला हवं होतं तेंच तेवढं नेमकं उचलून घ्यायचा त्यांनीं सपाटा लावला. खरं म्हणजे त्यावेळीं त्यांच्या डोळयासमोर सुंदरीची मूर्ति दिसत असल्या-मुळं सामानाच्या अशा हालचालीमुळं लक्ष्मीच्या संसाराचं स्वरूप आपण कांहींसं वेडंवाकडं करीत आहोंत याची कल्पनाहि त्यांच्या मनाला शिवली नव्हती. त्यामुळं त्यांचं काम अगदीं निर्धास्तपणानं सुरू होतं... आपल्या अशा वागण्यानं लक्ष्मीला काय वाटेल याचा विचार करायला त्यांना कुठं वेळ होता नाहींतरी!....

पाणी तापवायचा मोठा हंडा, पितळेची एक मोठी घागर,

फडताळांतील तांबेभांडीं आणि ताटवाट्या, देवाच्या देव्हाऱ्यांत पिढान्-पिढ्या आपलं बस्तान मांडून बसलेलीं थोडीफार लहान लहान चांदीचीं भांडीं, चुलीजवळच्या कपाटांत फोडणीच्या सामानासाठीं असलेल्या बोळक्यांतून निघालेले आठ दहा आणे आणि एक चांगल्या स्थितींत असलेली तांब्याची परात वगैरे सारं कांहीं माजघरांत मध्यभागीं जमा केल्यावर 'हं, आतां आणखी काय काय बरं ?' असं म्हणत बाबूरावांनीं सारं घर पुन्हां एकदां धुंडाळायला आरंभ केला.

घरांत जोंधळ्याचीं एकदोन पोतीं होतीं तीं सुद्धां त्या सामानाजवळ बाबूरावांनीं ओढत आणलीं ! त्यांत त्यांना कांहींसुद्धां वाटलं नाहीं ! उलट तसं करतांना ते स्वतःशींच समाधानानं हंसत होते... सामानाच्या या उलथापालथींत चुकून एका कोपऱ्याला एक मोडकीशीं ट्रंक हाताला लागतांच 'अरेच्या, हें राहिलं कसं ?' असं म्हणत बाबूरावांनीं ती फरफटत उजेडांत आणली. त्या ट्रंकेचं कुलूप फोडून त्यांनीं ती एकदम उघडली ! आंत बरेच जिन्नस त्यांना आढळले.

चारसहा दिवसच माहेरीं रहायचं असं ठरल्यामुळं लक्ष्मीनं आपल्या बरोबर विशेष कांहीं नेलं नव्हतं. त्यामुळं त्या ट्रंकेंत तिच्या वडिलांनीं तिच्यासाठीं लग्नांत दिलेली एक वज्रटीक होती. सखूच्या पायाला घट्ट होतात म्हणून नुकत्याच काढून ठेवलेल्या तोरड्या होत्या. राजाच्या कमरेला ढिली होणारी एक चांदीची सांखळी होती आणि तिच्या लग्नाच्यावेळीं वरातीला म्हणून घेतलेलं एक जरीकाठी रेशमी लुगडंहि होतं. भरदिशीं बाबूरावांनीं ती ट्रंक पालथी घातली, आंतलं सामान गोळा करून घेतलं आणि मग बाजूला फेकून दिली.

बाबूरावांनीं फेकलेल्या ट्रंकेचा आवाज एवढ्या मोठ्यानं झाला कीं, तो ऐकून राधाकाकू तिथं येत त्यांना म्हणाल्या, "आज काय हाय तरी काय ? कवापसनं नुसता धुमाकूळ घातलायास घरांत त्यो ? घरांत ती माउली न्हाई म्हनून लई च्वाच करून घिऊं नगस जिवाचं..."

ही दुपारची वेळ असल्यामुळं आपणाला अशा स्थितींत कुणी पहाणार नाहीं अशी बाबूरावांची कल्पना. पण जमवलेल्या सामानाकडे

ते समाधानानं पहात खिशांतली एक सिगरेट शिलगावणार तोंच राधाकाकूंचं हें बोलणं कानावर आल्यानं ताडकन् ते उठून उभे राहिले. एकाएकीं त्यांच्या नाडीचे ठोके जलद पडूं लागले...खालीं केलेली मान वर होईना कीं तोंडांतून एकहि शब्द बाहेर पडेना!...तेव्हां राधाकाकूच सामानाकडे पहात म्हणाल्या, 'हें कशाला गोळा केलंय असं?' त्यामुळं एखाद्या धांदरटासारखे इकडे तिकडे पहात बाबूराव चटकन् बोलून गेले, "नवी जागा पाहिलीय तिकडे नेतोंय."

"नवी जागा? कसली नवी जागा? आन् कुनाला?"

"आम्हांलाच रहायला."

"तुमास्नी ऱ्हायाला! ही कशापाई! हाइ ती लई बंगाळ हाई न्हाई!"

"थोडी स्वस्तांत मिळतेय मग का सोडा!..."

"असंं काय? आलं ध्येनांत!...त्या बापडीच्या नशिबांत देवानं काय काय लिवून ठेवलंय तें त्येचं त्येलाच टावं..." एवढं बोलून राधाकाकू तिथून फणकाऱ्यानं निघून गेल्यानं बाबूरावांचा जीव भांड्यांत पडला. सुटकेचा निःश्वास सोडून ते म्हणाले देखील, "बरं झालं ब्याद गेली. नाहीं तर फुकटचा त्रास व्हायचा मध्येंच नि गाडी चुकायची..."

आतां आणखी कुणी यायला नको म्हणून बाबूरावांनीं शेजारच्या घरांतील घड्याळाचे चारचे ठोके कानावर येतांच थोडी गडबड केली. हमालाला बोलवून सामान हातगाडीवर चढवलं. अंगांत कोट घातला आणि एका लहानशा बॅगेंत आपले कांहीं कपडे घेऊन घराला कुलूप ठोकलं!

एखादी हक्काची खाणावळ नाहीं तर निवाऱ्याची जागा या पलीकडे बाबूरावांना आपल्या घराची कधींच पर्वा वाटली नाहीं. त्यामुळं घरांत आहे नाहीं तें सारं गोळा करून आपण घरापासून दूर जात आहोंत याचं त्यांना लवमात्रहि दुःख झालं नाहीं. उलट अगदीं बेपर्वाईनं सुंदरीच्या समोर आपला खिसा गरम आहे याची चुणूक दाखविण्यासाठीं म्हणून

त्यांनीं घरांतून आणलेलं सारं सामान विकून टाकायला सुरवात केली... छोटया राजाचे दागिने सराफासमोर टाकल्यावर त्याला देखील थोडी दया येऊन तो म्हणाला, " मुलाचं डाग कशापायी मोडीला काढलेत !" पण तिकडे दुर्लक्ष करून बाबूराव म्हणाले, " त्याची तुम्हाला पंचाईत ! चटकन् सौदा उरकून टाका... "

एक प्रकारची विलक्षण धुंदी बाबूरावांच्या डोळयावर चढली होती. त्यावेळीं त्यांना घरांतलीं मुलंबाळं, लक्ष्मी, गणगोत शेजारीपाजारी, इष्टमित्र अगदीं कुण्णी कुण्णी दिसत नव्हतं. जगाची त्यांना पर्वा नव्हती. त्यांना फक्त सुंदरी, तिचा लाडीक नखरा, तिचा मोहक नाच, तिचे धुंद डोळे आणि तिच्या घरांतील व्हिस्कीची बाटली यापलीकडे कांहींदेखील दिसत नव्हतं कीं सुचत नव्हतं...त्या नादांतच विकलेल्या सामानाचे मिळतील तेवढे पैसे खिशांत टाकून बाबूरावांनीं सुंदरीच्या घराचा रस्ता धरला. जातां जातां रस्त्याच्या एका कडेला असलेल्या जवाहिऱ्याच्या दुकानांतून आपणाला कुणीतरी हांक मारल्याचं त्यांनीं ऐकलं म्हणून ते सरळ त्या दुकानांत शिरले. वास्तविक ' बाबूराव ' अशी त्या दुकानदारानं दुसऱ्याच कुणातरी इसमाला उद्देशून हांक मारली होती पण हे बाबूराव मात्र ती आपल्यालाच उद्देशून आहे असं समजून सरळ दुकानांत शिरले होते ! गिऱ्हाईक थोडं बऱ्यापैकीं दिसल्यामुळं दुकानदारानंहि त्या संधीचा फायदा घेऊन एक पाऊणशें रुपये किंमतीची खड्याची सुंदर अंगठी त्यांच्या गळयांत टाकली. ती अंगठी सुंदरीच्या नाजुक बोटांत शोभून दिसेल या कल्पनेनं बाबूरावहि खुषींत येऊन ती घेऊन गेले.

पंधरावीस मिनिटांच्या आंत बाबूरावांनीं सुंदरीचं घर गांठलं. आपण कांहींतरी दिग्विजय गाजवून आल्याचा आनंद त्यांच्या तोंडावर ओसंडत होता. जलदीनं आल्यामुळं आलेला घाम पुशीत त्यांनीं सुंदरीला दारांतूनच हाक मारली, ' सुंदऽऽर '

बाबूरावांची नेहमींची परिचयाची हांक कानावर येताक्षणींच सुंदरीनं गडबडीनं अंगावरचं पातळ आणि सैल झालेले केंस नीट केले. तोंडावर पॉवडरचा हात फिरवला. डोळयांत चटकन् सुरमा घातला. कपाळावर

चंद्रकोर कोरली आणि अंगावर सेंट टाकून ती हंसत हंसत बाहेर येऊन म्हणाली, " अय्या ! किती लौकर आलांत हो आज ! "

" का ? लौकर आलों म्हणून बिघडलं नाहींना ? "

" छे छे ! उलट बरं झालं " असं म्हणत सुंदरीनं जेव्हां बाबूरावना घरांत येऊन बसायची डोळ्यांनीच खूण केली तेव्हां आंत येऊन लोडाला टेकून बसत बाबूराव म्हणाले, " बस्स ! ठरलं. " त्यावर त्यांच्यासमोर पान तंबाखूचं तबक सारून ठेवीत सुंदरीनं आश्चर्यानं विचारलं,

" ठरलं ? "

" हो, ठरलं. "

" अहो पण काय ? "

" आतां रात्रीच्या गाडीनं, अगदीं आजच्या आज आपण पंढरपूरला जायचं. "

सुंदरीची पंढरपूरला जायची इच्छा फार दिवसांची होती. त्यामुळं आयती चालून आलेली ही संधि साधून घ्यावी म्हणून ती म्हणाली,

" खरं म्हणतां ? "

" म्हणजे ? अजूनहि तुला खोटंच वाटतं ! "

" पण...याचं काय ? " असं म्हणून जेव्हां सुंदरीनं डोळ्यांनीं आणि हातांनीं खूण करीत खिशांत पैसे आहेत कां म्हणून विचारलं, तेव्हां त्यांनीं तिच्यापुढं शंभराच्या दोन नोटा टाकून तिला जवळ ओढली. त्यामुळं सुंदरी म्हणाली, "अगबाई, आतां मात्र खरंच जायचं हं !..." आणि जेव्हां बाबूरावांनीं तिच्या हातांत ती अंगठी हळूच सरकावली तेव्हां तर त्यांच्यापासून दूर जात ती एखाद्या मुलाप्रमाणं आनंदून नाचूं लागली. तिला आनंद झाला म्हणून बाबूरावांनाहि आनंद झाला.

थोड्या वेळानं सुंदरी चटकन् आंत जाऊन आली. तेवढ्या घाईघाईत तिनं आपलं पातळ बदललं, अंगावर रोजचे दागिने चढवले; आणि बोटांतली अंगठी नीट सरकवून बसवीत बाहेर येऊन ती म्हणाली, "कित्ती छान आहे नाहीं ? "

" आवडली तुला ? "

"हो...पण आतां नको गडे पंढरपूरला जायला. आपण कीं नाहीं इथेंच मजा करूया."

सुंदरीच्या या अनपेक्षित उत्तरानं बाबूराव चमकले, क्षणार्धात त्यांचा चेहरा एकदम फटफटीत झाला...शेवटीं आश्चर्यानं सुंदरीकडे पहात त्यांनीं तिला विचारलं,

"काय म्हणतेस ! एवढ्यांत तुझा बेत फिरला अं !" त्यावर "आज मी तुम्हाला एक गंमत दाखवीन. गाईन, नाचेन, अगदीं मज्जा करीन मग तर झालं ?" असं म्हणत जेव्हां सुंदरी बाबूरावांच्या जवळ येऊन बसली आणि त्यांना बिलगली तेव्हां त्यांचा पंढरपूरला जायचा बेत कुठल्याकुठं पार पळून गेला...त्यावेळीं सुंदरीनं त्यांच्या ओठाला लावलेल्या व्हिस्कीच्या प्याल्यानं त्यांचं स्वतःचं देखील भान त्यांना राहिलं नाहीं...

• • •

त्याचवेळीं आपल्या वडिलांच्या शेतांतील जोंधळ्यांतून लक्ष्मी निघाली होती. डोक्याच्यावर हातभर उंच वाढलेल्या त्या जोंधळ्यांतून लक्ष्मी मोठ्या आनंदानं जात होती. जोंधळ्याच्या ताटावरचं एकेक कणीस एवढं भरगोंस झालं होतं कीं, त्याकडे पहाणाराची नजर एका जाग्यावर ठरूंच नये ! गड्यानं काढून दिलेला बांड चघळीत आणि जातांना आडवं येणारं ताट बाजूला सारीत लक्ष्मी स्वतःशींच म्हणत होती " आज हे आले असते तर त्यांना देखील आनंद झाला असता ही रानची लक्ष्मी बघून ! ...पण..."

जोंधळ्याचं सगळं वावर ओलांडून जेव्हां लक्ष्मी तंबाखूच्या रानांत आली तेव्हां तिथं खुडा करीत बसलेला तिच्या वडिलांचा गडी रामू तिला म्हणाला, " कशी काय मजा हाई रानची ?" जोंधळ्यांतून येतांना जोंधळ्याच्या पानानं अंगावर किंचितसं कापून निघालेले ओरखडे पुशीत लक्ष्मीनं सभोंवार पाहिलं आणि म्हटलं, " फार छान. " समोर दुतर्फा एका ओळींत असलेला टवटवीत जोंधळा, त्याच्या डाव्या बाजूला मध्या

वर काळ्याभोर रानांत टोकलेला हरबरा, जवळच्याच तुकड्यांत हिरव्या मिरच्यांनीं लहडलेलीं भरदार झाडं, त्याच्या समोरच्या तुक-ड्यांत फोंफावून वर आले ले भुइमुगाचे वेल, वगैरे हें सारं बघून लक्ष्मीला फार आनंद झाला. वाऱ्याच्या झुळकीमुळं तोंडावर आलेले केंस पदरांत नीट बसवून तिनं रामूला विचारलं, " आणि मुलं कुठं आहेत रामू ? "

" तीं नव्हं कां ततं धाववर खेळत्यातीं " असं म्हणत रामूनं जेव्हां तिथूनच लक्ष्मीला हात उंचावीत सांगितलं, तेव्हां ती पळत पळत धावे-कडे निघाली. कारण रांगत रांगत जाऊन एखादेवेळीं राजा विहिरींत पडे-बिडेल या कल्पनेनं तिच्या काळजानं आतां ठाव सोडला होता...पण तिला पळतांना बघून एका लिंबाच्या उंच झाडावर बसलेला वांटेकऱ्याचा मुलगा ओरडला, ' आवऽ ताईसाब, तुमचा राजा तिकडं छपरांत बेस खेळतुया बंऽऽ " पळतां पळतांच हें ऐकून लक्ष्मीनं आवाजाच्या रोखानं वळून पाहिलं; आणि लुगड्याचा घोळ आवरीत " बरं बरं " असं त्या मुलाला हातानंच खुणावून ती धावेवर आली. तिथं तिचा गोविंदा वांटेकऱ्याच्या मुलाशीं विटी दांडू खेळीत असतांना म्हणत होता—' एरा पाव...दोरा चिठी, मेरा मिठी, पारि गाय, डोळा कीं झूल...... '

मुलांचा हा खेळ बघून क्षणभर लक्ष्मीला वाटलं कीं आपण पण खेळावं. पण आपण तसं खेळलों तर आश्पासचे शेतकरी हंसतील म्हणून तिनं नाइलाजानं तो मोह आवरला आणि गोविंदाला विचारलं, " सखू कुठं आहे ? "

तेवढ्यांत चिंचेच्या झाडाखालीं पडलेली एक बारीकशी चिंच हातांत घेऊन पळत पळत सखू तिथं आली. धांवत आल्यामुळं दम छातीतच तिनं लक्ष्मीला म्हटलं, " किती ग शोधायचं तुला आई ? "

" गेलें होतें अशीच तुझ्यासारखी भटकत लांब लांब " असं म्हणत लक्ष्मीनं सखूला जवळ घेतली आणि पुन्हां विचारलं, " राजाला कुठं सोडलास ? "

" मोठ्या मामांच्या मांडीवर खेळतोय कीं खुशाल ! कां ग ? "

राजाला अंगावर प्यायला घेऊन बराच वेळ झाला होता. त्यामुळं

लक्ष्मीचे स्तन अगदीं रसरसून गेले होते. म्हणून ती स्वतःशींच पुटपुटली, " माझ्या राजाच्या आठवणीनं देखील पानेव आलाय ग ! पण तुला काय सांगूं..." आणि मग सखूला हाताला धरून नेत तिनं पुन्हां म्हटलं, " चल आपण जाऊंया तिकडेच. "

लक्ष्मी छपरांत आलेली पहातांच आपल्या मांडीवरचा राजा तिच्या हवालीं करीत तिचा मोठा भाऊ किसन तिला म्हणाला, " ते ताई, घे बघूं तुझी ही पिडा ! "

" छान हं दादा ! थोडा वेळ सांभाळलंस तर पिडा नाहीं का ? आणि मला कसं होत असेल मग ? "

" मग ! तुझं मूलच आहे तें. आईला कधीं कंटाळा येतो वाटतं मुलाचा ? "

" हं ! आणि बापाला येतो नाहीं का ? जसा कांहीं तुझ्या मुलाला तूं कधीं हातच लावीत नाहींस नाहीं ! "

" तसं नाहीं ग ताई मी म्हणत. अग, पण हा राहीनाच कांहीं केल्या तर काय करूं मग ! एकदां तर रांगतां रांगतां ह्याच्या पायाला खडा बोचला तर अस्सं त्यानं भोकाड पसरलंय म्हणतेस ! अरे बापरे ! छे छे ! मला नाहीं बुवा जमत तें..."

छपरांतल्या मातीच्या घागरींतील पाणी लोटक्यांत ओतून घेत त्यांच्या वांटेकऱ्याच्या बायकोनं, विठानं, हें बोलणं ऐकलं. म्हणून ती म्हणाली, " ज्येचं त्येनंच करू जानं. आन् ताईसाब, पोराला सोडून तुमीबी काय म्हन हिंडाया गेलासा वंऽ ? " त्यावर राजाच्या अंगावर नीट पदर घालीत लक्ष्मी म्हणाली, " अग दादाच म्हणाला मी त्याला सांभाळतों म्हणून ! विचार हवं तर. काय दादा खरं ना ? "

" असूं दे. लगींच जबानी कशाला व्हवी. तुमी तिकडं गेलायसा आन् ह्या तुमच्या सखूबाईनं माजं डोस्कं उठीवलं चिंचा पाईजित्या म्हनून. म्यां चारदोन खडं मारून बगितलं पर येकबी चिंच पडऽल तर शप्पत अक्षी !..."

" असं होय. काय ग सखू चिंच हवीय होय तुला ? "

" हं ! तूं देशील पाडून ? "

सखूनं असं विचारतांच लक्ष्मी आनंदानं म्हणाली, " हो हो, " तेव्हां तिच्याकडे कौतुकानं पहात विठाबाईनं सखूला सांगितलं, " तुझी आई मातुर दील बाई ! तुज्या एवडी व्हती तवा कशी सरासरां चडायची बग झाडावर. "

पण सखूला तें खरंच वाटेना. म्हणून तिनं आईकडे आश्चर्यानं पहात म्हटलं, " हो ग आई ? "

" हो हो, पण उद्यां देईन हं ! आतां दिवस मावळायची वेळ झाली. घरीं जायला हवं. नाहींतर आई म्हणेल कीं, हिला अगदींच कसं कळत नाहीं म्हणून ! "

" पण उद्यां नक्की हं ! "

" जरूर. तोंवर एक गंमत दाखवतें चल. "

असं म्हणून लक्ष्मीनं राजाच्या तोंडावरचा पदर बाजूला केला. पोटभर दूध मिळाल्यामुळं राजानं समाधानानं हुंकार टाकला. त्यामुळं लक्ष्मीनं चटकन् त्याला मांडीवरून खालीं ठेवला; अंगांतील चोळी नीट बसविली आणि मग छपराबाहेर येत तिनं सखूला सांगितलं, " चल त्या तिथं जाऊं या. "

छपराजवळच्या विहिरीवर एक भलं मोठं वडाचं झाड होतं. त्याच्या कितीतरी पारंब्या खालीं लोंबत होत्या. लक्ष्मी त्या झाडाजवळ गेली आणि पारंबीला धरून झोका घ्यायच्या तयारींत सखूला म्हणाली, " आतां नीट बघ हं ! "

झर्‌दिशीं लक्ष्मीचा झोका पुढं गेलेला पहातांच सखू ओरडली, "अग आई पडशील ना ! "

पुढं गेलेला झोका मागें येऊन ठेपतांच लक्ष्मीनं जमिनीवर पाय टेकला आणि पुन्हां जोरानं झोका घेत म्हटलं, " पडतेंय कशाला ? तू भिऊं नको. गंमत तर बघ. "

लक्ष्मीचे झोके बघून सखूला फार आश्चर्य वाटलं. त्यामुळं गडबडीनं

तिनं गोविंदाला हांक मारीत म्हटलं, " अरे दादा, पळ पळ लौकर. ही आई बघ ! अरे पळ. "

सखूच्या हांकेनं गोविंदा धांवत आला. त्याला वाटलं त्याची आई कुठं पडली बिडली कीं काय ? पण त्यानं जेव्हां आपल्या आईचे झोके पाहिले तेव्हां त्यानंहि आश्चर्यानं तोंडांत बोट घालीत लक्ष्मीला म्हटलं, " अरे बा ! आई, तुला पण छान खेळायला येतंय कीं ग ! "

त्या दिवशीं लक्ष्मी त्या निसर्गाच्या रमणीय राज्यांत इतकी गुंगून गेली कीं, घरीं जाण्यासाठीं म्हणून तयार असलेल्या गाडींत बसत तिनं गोविंदाला विचारलं, " इथंच राहूंया का रे आपण ? "

कसलींहि बंधनं न पाळतां मन मानेल तसं आल्यापासून तिथं हुदडायला मिळाल्यामुळं गोविंदा चटकन् म्हणाला, " अगदीं जरूर. "

" आणि तुमची शाळा ? "

" हं ! इथं नाहीं होय ग आई शाळा ? "

" हो हो. आई ग, कशाला जायचं तरी आपण बिहागला. इथंच किती किती मजा आहे. "

सखूच्या या बोलण्यानं हंसूं येऊन लक्ष्मीला क्षणभर वाटलं, 'सखू म्हणते तसं झालं तर बरंच !... ' पण थोड्या वेळानं घुंगरांच्या मंजुळ नादांत वेगानं धांवणाऱ्या गाडींतून आसपास दिसणारीं शेतं पहात ती सखूला म्हणाली, " आजोबांना विचार हं पण अगोदर ! "

" अगदीं गेल्याबरोबर. " असं गोविंदानं आश्वासन देतांच बैलांचा कासरा थोडा ओढून धरीत किसननं म्हटलं, " तुम्हांला जा म्हणतंय कीं, काय कोण तेव्हां चौकशी चालवलीत ती ? " त्यावर सगळींच एकमेकांकडे पहात मनापासून हंसलीं. राजानं देखील 'आ' वासून हंसून टाळ्या वाजवल्या...

संध्याकाळीं आजोबांचं जेवण होतांच गोविंदा त्यांना म्हणाला, " आजोबा, आतां आम्ही इथंच रहाणार बरं का ! "

गोविंदाच्या आजोबांना विलक्षण हंसूं आलं हें ऐकून. समोरच्या

कंदिलाची वात थोडी वर करून ते म्हणाले, " अरे बाबा, खुशाल रहा. माझ्याभोंवतीं तुम्ही असला, कीं मला त्यांत आनंदच आहे. "

आजोबांची संमति मिळतांच रोजच्या प्रमाणं त्यांना गोष्ट सांगा म्हणून न सतावतां गोविंदा आणि सखू आनंदानं झोपी गेलीं. लक्ष्मीनं राजाला पाळण्यांत झोपवला, आपल्या बहिनीशीं गप्पा मारल्या आणि मग ती आपली आई झोपली होती तिथं येऊन तिच्या कुशींत शिरली.

लेकीच्या तोंडावरून हात फिरवीत लक्ष्मीची आई तिला म्हणाली, " चार दिवस घर कसं किष्णाच्या गोकुळावानी वाटतंया." आणि तिनं तिला लहान पोरासारखी जवळ ओढून घेतली.

आईच्या या मायेनं, क्षणभर आपण तीन चार मुलांच्या आई असून मोठ्या आहोंत याचा देखील लक्ष्मीला विसर पडला. त्यावेळीं साऱ्या दुःखाचा विसर पडत चाललेला तिचा जीव आईच्या कुशींतल्या उबीनं विसावला. समाधानानं ती आपल्या आईला बिलगली आणि तिनं आईच्या लुगड्याच्या पदरांत आपलं अंग झाकून घेतलं. त्या पदराच्या वरचा भाग तिनं तोंडावरहि ओढून घेतला...मायलेकीचं तें अपूर्व मीलन बघून त्यावेळीं तिथं आलेला महादेव म्हणाला," आई, आतां लहान कां आहे ताई ?" त्यावर त्याची आई कौतुकानं लक्ष्मीकडे पहात म्हणाली, " असूं दे बाबा. तुला काय कळतंय त्यांतलं..."



## दूर कुठं तरी— ५

बरोबर एक वाजतां बिहाग स्टेशन जवळ गाडी आली. सिग्नल मिळतांक्षणींच आपण आलों आहोंत याची खूण म्हणून गाडीनं शीळ घातली. स्टेशनाच्या आवारांत शिरण्यापूर्वी लागणारीं दोन वळणं ओलांडून तिनं आपला वेग मंदावला. मोठ्या दिमाखानं तिसऱ्या नंबरच्या फलाटाजवळ येतांक्षणींच प्रवासानं आलेला शीण घालवावा म्हणून तिनं जेव्हां वाफेचा भपकारा सोडायला सुरवात केली तेव्हां तिथं जमलेलीं माणसं बघून छोटा राजा ओरडला, "आबा....आबा..."

"हमाऽल...साहेब हमाल पाहिजे ?...हमाऽऽल ! "..." च्याय्, गरमा गरम च्याय् "..." थंडागार सोडा लेमन "..." मसालेदार बटाटा भाजी पुरीऽऽ "...वगैरे विविध प्रकारच्या पुकारांनीं स्टेशनचं आवार दुमदुमून गेलं होतं...

लक्ष्मीनं राजाला नीट सावरून धरून डब्याच्या खिडकींतून डोकावून पाहिलं. बाहेर माणसांची बरीच गर्दी होती. गांवाहून आलेलीं माणसं आपलं सामान हमालांच्या स्वाधीन करीत स्टेशनाबाहेर पडायच्या धांदलींत होतीं. त्यांना भेटायला म्हणून स्टेशनवर आलेलीं त्यांची मित्रमंडळीं आणि घरची माणसं त्यांच्याशीं हास्यविनोद करून 'कुशल' विचारीत होतीं...कुणी दुसरीकडे पुढं जाणाऱ्या गाडीच्या शोधांत

होते आणि कुणी भूक लागल्यामुळं कांहींतरी खायला घेऊन दुपारची वेळ भागविण्याची वाटाघाट करीत इकडून तिकडे फिरत होते...

त्या सगळया गर्दीत लक्ष्मीला तिचे बाबूराव कुठंच दिसेनात! येण्यापूर्वी अमूक एका गाडीनं येतें असं तिनं त्यांना कार्ड पाठवून कळविलं होतं. त्यामुळं ते स्टेशनवर निश्चित येतील असा तिचा विश्वास होता; आणि तेवढ्यासाठींच तिनं माहेराहून निघतांना कुणाला बरोबरहि घेतलं नव्हतं...

बाबूराव आले नाहींत म्हणून लक्ष्मीचा चेहरा बराच काळवंडला. निराशेनं तिनं मुलांना गाडींतून खालीं उतरून घेऊन हमालाला सामान बाहेर काढायला सांगितलं. त्यावेळीं मामानं घेऊन दिलेला उन्हाळी चष्मा डोळयांवरून बाजूला करीत गोविंदा म्हणाला, "आई, आबा आले नाहींत वाटतं? तूं नक्की कळवलं होतंस ना पण?"

"कळवलं होतं तर!...काय म्हणावं बाई यांना! वेळेवर माणसानं येऊं नये म्हणजे काय? कळवलं नसतं तर एक असो. पण..." असं बोलत असतांनाच जेव्हां बाबूरावांच्या नेहमींच्या पद्धतीनुसार हें कांहीं वावगं नव्हतं असं लक्ष्मीच्या ध्यानांत आलं तेव्हां तिनं सरळ टांगा केला आणि घर गाठलं.

ऐन उन्हाची वेळ. घरांत गेल्याबरोबर मुलांना खाऊ घालतां येईल ही लक्ष्मीची कल्पना. म्हणून तिनं मुलं स्टेशनवर पाणी दे म्हणत होतीं तरी तें देखील "आत्तां जाऊं आपण घरीं" या समजुतीवर रहित केलं होतं!...घरासमोर येऊन टांगा थांबतांच सखू आणि गोविंदा उड्या मारून टांग्यांतून उतरलीं. त्यांच्या जवळ राजाला देत लक्ष्मीनं 'नीट धर हं' असं म्हटलं आणि घराकडे पाहिलं तों दाराला कुलूप! त्यामुळं ती म्हणाली, 'अगबाई, हे स्टेशनवरच गेलेत वाटतं! गोविंदा, काकूबाईंना विचार बरं किल्ली ठेवलीय का ती?'

'आई ग, मीच विचारतें हं नाहींतर!' असं म्हणून सखू जेव्हां काकूबाईकडे पळत गेली तेव्हां टांग्यांतील सामान उतरून घेत गोविंदा म्हणाला, "आपली नि आबांची चुकामूक तर झाली नसेल ना ग आई!"

"असेल बाबा तसंहि!...येतील वाट बघून परत. आणि मग आपणाला घरीं आलेले बघून म्हणतील..."

लक्ष्मी असं कांहीं म्हणते आहे तितक्यांत राधाकाकू सखूला बोटाशीं धरून तिथं आल्या. त्यामुळं लक्ष्मीनं त्यांच्याजवळ राजाला देऊन त्यांना वांकून नमस्कार केला. "सीता सावित्री हो" असा आशीर्वाद राधाकाकूंनीं तिला दिला खरा. पण त्यांच्या आवाजांत थोडा फरक वाटल्यामुळं लक्ष्मी म्हणाली, "बरं आहे ना सगळं!"

"होईकीं. तुझ्या तिकडची बेस होईत सारीं?"

"छान आहेत. चारसहा दिवस फार छान गेले बघा."

"व्हय का? बरं झालं!"

"आणि हे कुठं गेले? स्टेशनवर तर दिसले नाहींत! चुकामूक झाली कीं काय कुणाला ठाऊक बाई! किल्लीतरी ठेवलीय कां?"

लक्ष्मीच्या या प्रश्नांनीं राधाकाकू दचकल्या! त्यांनीं लक्ष्मीच्या घराकडे पाहिलं आणि डोळ्यांत तरारणारीं आसवं पदरानं पुशींत त्या क्षीण आवाजांत पुटपुटल्या, "काय सांगू लक्ष्मी!..."

"म्हणजे?" लक्ष्मीनं मोठ्या आश्चर्यानं असं म्हणतांच राधाकाकू मन आवरून म्हणाल्या,

"अग, तुमीं घर बदलंल व्हय?"

"घर बदललं? कुणाचं? आमचं? तें कशासाठीं? कुणीं सांगितलं तुम्हाला?"

"लक्ष्मी!..."

राधाकाकू धीरगंभीर झालेल्या बघून, लक्ष्मी बावचळून गेली. बाबूरावांचं कांहीं बरं वाईट तर झालं नसेल या शंकेनं तिचा धीर खचून गेला. दारावरील कुलुपाकडे टक लावून पहात तिनं विचारलं, "अहो, काय झालंय तरी काय?"

"दुसरं काय हुयाचं हाय!" राधाकाकू कठोरपणानं असं बोलल्या तेव्हां लक्ष्मी आणखी गोंधळून जाऊन म्हणाली, "म्हणजे? स्पष्ट सांगा कीं काकूबाई काय झालंय तें!"

" लक्ष्मी, तूं गांवाला गेलीस त्यावर दोन दिसांनीं बाबूराव जे घर लावून गेल्याती, त्येंचा अजून पत्ता न्हाई !.... "

" आणि ते मुंबईला जाणार होते ते आले कां जाऊन ? "

" कसली कर्माची म्हमई धिऊन बसलीस पोरी ! तुला खरंच वाटलं न्हाई ग तें ?... " असं सूतवाक्य करून राधाकाकूंनीं घडलेला सारा प्रकार लक्ष्मीला सांगून टाकला.

' नशीब माझं ! ' असं पुटपुटून लक्ष्मीनं कपाळावर जोरानं हात मारला आणि ती मटकन् खालीं बसली. त्यामुळं भुकेनं व्याकूळ झालेलीं गोविंदा आणि सखू झाल्या प्रकाराचा नीट समज न आल्यानं, मुकाट्यानं दाराला टेकून बसलीं. ' भूक लागलीय ' म्हणून त्यांनीं मुळींच बोलून दाखवलं नाहीं !

चार आठ दिवस माहेरीं मिळालेल्या सुखाचा प्रत्येक क्षण त्यावेळीं लक्ष्मीच्या मनांत डोकावूं लागला. त्यांतल्या त्यांत माहेराहून निघते वेळीं मोटारींत पाऊल टाकतांना तिच्या आईनं मिठी मारून तिला पोटाशीं धरलेला क्षण तर तिच्या मनांत थैमान घालूं लागला.

लक्ष्मीनं झाला प्रकार तेव्हांच ओळखला. संसाराच्या भेसूर चित्रानं तिच्या डोळ्यांना अंधेरी आणली. दाही दिशा फाटून जाऊन आपण कुठं तरी खोलवर जाऊन पडल्यासारखं तिला वाटूं लागलं....

क्षणभर लक्ष्मी या अनपेक्षित प्रसंगानं भांबावून गेली खरी. पण थोड्या वेळानं तिनं आपल्या भावनांना बांध घातला. खचलेला धीर पुन्हां मिळविला....आळीपाळीनं तिनं राधाकाकू, घर आणि मुलं यांच्याकडे पाहिलं आणि खालच्या ओठावर दांत घट्ट आवळून तिनं मनाचा निर्धार केला...अंगणांतला दगड घेऊन तिनं घराचं कुलूप फोडलं !

धाडकन् दार उघडून लक्ष्मी घरांत शिरली. आठ दिवसांपूर्वी जिथल्या तिथं लावून ठेवलेल्या तिच्या घरांत आतां नुसता उकीरडा दिसत होता. ती गेल्यापासून घर झाडलं गेलं नसल्यानं भरपूर धूळ साचली होती. त्या धुळीच्या आणि सामानाच्या हालचालीमुळं झालेल्या

केराच्या ढिगाऱ्यांत किरकोळ सामान पडलेलं होतं. त्यांत राजाचा मोडका लाकडी पोपट होता. लक्ष्मीनं पटकन् तो उचलून पोटाशीं धरला आणि डोळे फाडफाडून साऱ्या घरभर नजर टाकली....तिच्या पश्चात् घराची झालेली ती अवस्था बघून तिचं अंग शहारलं. तेवढ्यांत दाराच्या फटींत अडकलेलं कार्ड आणून दाखवीत सखू ओरडली, 'आई, हें बघ तूं आबांना टाकलेलं कार्ड!'

लक्ष्मीनं अधाशीपणानं तें कार्ड सखूच्या हातांतून हिसकावून घेतलं. त्या कार्डावरचा पोष्टाचा शिक्का तिनं पाहिला आणि मग त्याचवेळीं तिची खात्री झाली कीं, तिला अशी माहेरीं पाठविण्यांत बाबूरावांचा खास कांहींतरी डाव असला पाहिजे! आणि ही शंका तिच्या मनांत येतांक्षणींच ती अशी चमकली कीं, तें बघून गोविंदानं तिला विचारलं, "काय झालं ग?"

"तुझं कर्म!" असं उत्तर लक्ष्मीच्या अगदीं ओठावर आलं पण पण मन आवरून ती म्हणाली, "कांहीं नाहीं. चल, घरांतून फिरून तर येऊं या."

साशंक मनानंच लक्ष्मीनं सारं घर धुंडाळलं. घरांतल्या किडुक-मिडुकासह सारं नाहींसं झालेलं बघून तिला हुंदका आला. नाहीं म्हणायला बाबुरावांचे कांहीं कपडे तेवढे त्यांच्या बसायच्या खोलींत चुकून राहिलेले होते एवढंच! लक्ष्मीनं भरल्या मनानंच साऱ्या घराचा कानाकोपरा धुंडाळून पाहिला. पण कुठंच कांहीं सांपडलं नसल्यानं बाबूराव चटकन् माहेरीं जा असं कां म्हणाले या विचारानं पुन्हां तिच्या मनाला घेरलं...एरव्हीं बरीचशी घासाघीस झाल्याशिवाय तिला कधींच माहेरीं जातां आलं नव्हतं! आणि मग बाबूराव आतांच एवढे कसे काय खुशीनं पाठवूं शकले? ह्या प्रश्नाचं कांहीं केल्या तिला उत्तर मिळेना... आपल्या संसाराची राखरांगोळी झालेली बघून भर दिवसां आपण अंधारांतून जात असल्याचा तिला भास झाला. मनाच्या त्या विकल अवस्थेंतच तिनं आपल्या पोरांना जवळ घेतलं, त्यांच्या अंगा-खांद्यावरून हात फिरवला आणि त्यांच्यावर प्रेमाश्रूंचा अभिषेक सुरू केला....

राधाकाकूंनीं ' कांहीं झालं तरी पोरांना दुखवूं नकोस ' अशी शब्दांनीं लक्ष्मीची समजूत घातली. अखेर तें ध्यानांत घेऊनच तिनं सारं घर झाडून काढलं आणि मुलांना बरोबर आणलेल्या दशम्या सोडून खायला दिल्या. किती केलं तरी गोविंदा आणि सखू लहानच होतीं. परिस्थितीनं एवढा वेळ भांबावून गेलेलीं त्यांचीं बालमनं; सारं विसरून खेळीमेळीनं जेवूं लागलीं. राधाकाकूंनीं आपल्या घरचंहि कांहीं आणून त्यांना खाऊं घातलं.

जेवण होतांच आपल्या बालमित्रांना शोधीत खेळायला म्हणून मुलं निघून गेलीं. सखूनं राजालाहि बरोबर नेल्यामुळं लक्ष्मीनं लहान मुलाप्रमाणं राधाकाकूंच्या अंगावर झेप घेतली. त्यांना घट्ट मिठी मारून तिनं विचारलं, "कसं करूं हो आतां काकूबाई ? '

राधाकाकू आपल्या परीनं लक्ष्मीची समजूत घालीत होत्या. पण लक्ष्मीच्या अंतःकरणांतून उफाळून वर येणाऱ्या भावनांना त्या तरी कशा थांबवूं शकणार ? तिच्या डोळ्यांतून घळघळणाऱ्या अश्रूंना त्यांनीं आपल्या पदरावर झेललं, तिच्या पाठीवरून मायेनं हात फिरवीत तिला धीर दिला आणि तिला चूल भरायला लावून घासभर खाण्याचाहि आग्रह केला. पण लक्ष्मीला एक घास देखील खायची इच्छा नाहीं हें बघून त्या थोड्या रागानंच तिला म्हणाल्या, "असं हातपाय गाळून कुटं सरतंया व्हय ! देव ठेवील तस ऱ्हाया नगो ? असं कां म्हनतीस बाई माजे ? तूंच अशी गळाटून गेल्यावर पोरांनीं कुनाच्या तोंडाकडं बगावं मग ?...आदींच काय म्हनत्यात तशातली गत आन् तूंबी अशी कर मजी..." आणि मग लक्ष्मीची स्थिति त्यांनाहि असह्य झाल्यानं त्यांनीं आपल्या डोळ्याला पदर लावला.

आलेल्या परिस्थितीवर लक्ष्मीनं बराच वेळ विचार केला. ती जसजशी विचार करूं लागे, कांहीं मार्ग शोधूं लागे, तसतशी तिची खात्री होत चालली कीं, कांहीं झालं तरी माणसाची सुखदुःखं हीं दुसऱ्यांनीं अनुभवायची नसतात. त्यांची खरी झळ ज्याची त्यालाच सोसावी

लागते....आणि त्यामुळं उत्पन्न होणाऱ्या बऱ्यावाईट परिणामाचा खराखुरा वाटेकरी देखील ज्याचा तोच असतो...

पुष्कळ वेळ विचार केल्यानंतर लक्ष्मीची अशी ठाम समजूत झाली कीं, आजवर आपल्या संसाराचा झाला तेवढा खेळखंडोबा आतां बस्स झाला !...बाबूरावांचं हें घर सोडून दूर कुठं तरी निघून जावं अशी तिच्या मनानं एकाएकीं उचल खाल्ली !...

वास्तविक एखादी गोष्ट मनांत आली कीं, ती पार पडलीच पाहिजे, मग त्यासाठीं वाटल तें करावं लागलं तरी हरकत नाहीं अशी लक्ष्मीची नेहमींची पद्धत. पण या घर सोडून जाण्याच्या कल्पनेनं मात्र तिला एकाएकीं धीर येईना. कारण मुलं आतां चांगली कळती सवरती होत चालल्यावर त्यांच्यादेखत असं वागणं तिच्या मनाला पटेना ! आणि दुसरं म्हणजे ‘ नवऱ्याचं घर सोडून गेली ’ म्हणून गांवभर तिच्याविषयीं चर्चा केली जाईल, ही कल्पनाच तिच्या मनाला तितकीशी सहन होईना !

पण हें सारं खरं असलं तरी मुलांविषयींचं आपलं कर्तव्य पार पाडण्यासाठीं म्हणून तिनं बिहाग सोडून दूर दूर कुठं तरी जायचंच असा निर्णय घेतला. अशावेळीं लोक काय म्हणतील यापेक्षां आपल्या एकंदर जीवनाविषयीं आपली मनोदेवता देईल तो कौल घेणंच अधिक श्रेयस्कर अशी तिची समजूत तिला पटली. राधाकाकूंनींहि तिला हाच निर्णय दिला होता हें विशेष ! कारण मुलांना आतां चांगलं कळायला लागायची अवस्था प्राप्त झाली असतांना अशावेळीं त्यांच्या मनावर आपल्या आई वडिलांविषयीं भलता ठसा उमटणं बरं नव्हे; शिवाय बापानं सारं घर पार उधळून दिलं तें दिलं आणि वर पोरांनाहि भिकेला लावलं ही कल्पना त्यांच्या बालमनाला शिवतांहि कामा नये याची लक्ष्मीला विशेष जरुरी वाटूं लागली. नाहींतरी आतां मुलांना व्यवस्थित वाढविणं हा एकच प्रश्न तिच्या आयुष्याचं जीवित सर्वस्व होऊन बसला नव्हता कां ? आणि ‘ माझ्या पोरांसाठीं मी माझा प्राण देखील पणाला लावीन ’ असं तिनं स्वतःच बाबूरावांना सांगितलं होतं तें आतां सिद्ध करून दाखवायची तिच्यावर वेळ आली होती ! त्यासाठीं तिनं आपल्या

मनाची पूर्ण तयारी केली आणि म्हणूनच जिथं आपल्या ओळखीचं कुणी भेटणार नाहीं अशा दूरच्या जागी कुठंतरी जायचा बेत तिनं आपल्या मनाशीं पक्का केला.

लक्ष्मीनं नवऱ्याचं घर सोडून जायचं ठरवलं खरं, पण त्याबरोबरच तसं करणं म्हणजे लोकनिंदेची पर्वा न करतां देखील एक प्रकारचं विलक्षण साहस पत्करण्यासारखं होतं, याचीहि तिला जाणीव नव्हती असं नाहीं. तें तर ती पूर्ण जाणून होती; आणि तेवढ्यासाठीं तिनं त्यादिवशीं रात्रींच आपल्या घरमालकाला आपण घर खालीं करीत असल्याचं सांगून टाकलं !...

आपण हें घर सोडणार या कल्पनेनं रात्रभर लक्ष्मीला बेचैन करून सोडलं. त्या घराचा कानाकोपरा देखील तिच्याशीं बोलूं लागला... पूर्वींच्या साऱ्या आठवणी तिच्या मनाभोंवतीं घुटमळूं लागल्या...लक्ष्मी अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागली.

अशावेळीं आपली आई जवळ हवी होती अशी कल्पना मनांत येतांच 'माहेरींच परत गेलं तर !' असाहि एक विचार तिच्या मनांत डोकावला. क्षणभर त्या कल्पनेनं तिला समाधान झालं. पण तें क्षणभरच ! कारण दुसऱ्याच क्षणाला 'नवऱ्याला सोडून माहेरीं राहते' अशा लोकांच्या बडबडीला बळी न पडण्याचा मोह तिनं पुन्हां आवरला आणि आपल्या बेताला पुन्हां बळकटी आणली...शिवाय माहेरीं जाऊन आपल्या आयुष्याची कड लागणार नाहीं ह्याचीहि तिला पूर्ण जाणीव होती...

स्वतःच्या पायावर उभं राहून मुलांना सांभाळायचा निर्धार करूनच लक्ष्मीनं दूर कुठं तरी जाण्यासाठीं आपलं घर सोडलं. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा आणि विशेषतः राधाकाकूंचा सहवास आतां आपणाला मिळणार नाहीं म्हणून तिला भारी जड वाटलं. पण तें सारं गिळून दुसऱ्या दिवशीं सकाळींच तिनं आपल्या माहेराहून येतांना आणलेल्या सामानासह पुन्हां स्टेशनचा रस्ता धरला. त्यावेळीं गोविंदा आणि सखू तिला पुन्हां पुन्हां आश्चर्यानं विचारीत होतीं, "कुठं ग जायचं आई ?" आणि कडेवरच्या राजाला सावरीत लक्ष्मी सांगत होती, "कुठं तरी लांब लांब..."

● ● ●

## प्रवास

## ६

" दोन तिकीटं द्या " असं म्हणून लक्ष्मीनं स्टेशनमास्तरांच्या समोर दहा रुपयांची एक नोट ठेवली.

आपणाला कुठं जायचंय, कोणत्या गाडीनं निघायचंय, अमुक एक गाडी किती वाजतां निघणार आहे, लहान मुलांना देखील सगळा चार्ज द्यावा लागेल कीं काय किंवा अमूक एक नोट परत देण्याऐवजीं थोडी मोडच द्या, अशासारखे नेहमींच्या परिचयांतील कांहीं एक प्रश्न न विचारतां लक्ष्मीनं जेव्हां नुसतंच ' दोन तिकीट द्या ' असं म्हटलं तेव्हां स्टेशनमास्तर थोडे चपापले. त्यांनीं तिच्याकडे थोडं निरखून पाहिलं आणि मग एका क्षणापूर्वी ' ही बाई कुणी हेर वगैरे आहे कीं काय ? ' अशी त्यांच्या मनांत उगाचच डोकावलेली शंका नाहींशी झाली. त्यांनीं तिला विचारलं, " कुठलीं तिकीटं पाहिजेत तुम्हांला ? "

आपण कुठं जाणार आहोंत हें खरं म्हणजे लक्ष्मीला देखील अजून माहीत नव्हतं ! आणि दुसरं म्हणजे तिची अशी मनापासूनची इच्छा होती कीं, हा प्रश्न तिला कुणींच विचारूं नये ! म्हणून थोड्याशा तिरस्कारानंच तिनं उत्तर दिलं, " त्याच्याशीं काय करायचंय तुम्हाला ? तुम्ही आपलीं तिकीटं द्या दोन म्हणजे झालं. "

" अहो, तें सगळं खरं. पण तुम्ही कुठं जाणार अहांत हें

कळल्याशिवाय तिकीट कसं देणार मी ? तें सांगा म्हणजे देतों. हो, मला काय ?"

स्टेशनमास्तरांनीं थोडं दटावून असं विचारतांच लक्ष्मीनं आपली जीभ चावली. क्षणभर कोणत्या गांवाचं नांव सांगावं म्हणून तिच्या मनांत गोंधळ उडून गेला !... अखेर 'थांबा हं !' असं सांगून ती तिकीट कचेरीपासून थोडी बाजूला गेली. कोणती गाडी कुठं जाणार आहे या बाबतचं माहितीपत्रक नीट पाहून त्यावेळीं आपणाला कुठं जातां येईल याचा ती मनाशीं विचार करूं लागली. कारण त्यावेळीं सकाळचे सात वाजायला आले होते आणि तिची तर अशी इच्छा होती कीं, त्याचक्षणाला तिला गाडी मिळेल तर बरं. मग ती कुठं कां जाणारी असेना !...'बाबूराव आपणाला भेटण्यापूर्वी जायला मिळालं म्हणजे झालं !' याच एका गोष्टीविषयीं तिला विलक्षण आतुरता वाटत होती...

शेवटीं लक्ष्मीनं स्टेशनमास्तरांनाच विचारलं, "आतां तीन नंबरच्या फलाटाला गाडी लागलीय ती कुठं जाणार आहे ? बरीच गर्दी दिसतीय !"

"ती गाडी जाते पाटीलमळ्यापर्यंत. तिथून पुढं जायचं असेल तर गाडी बदलावी लागते."

"आणि किती वाजतां निघेल ती आतां ?"

"आतां दहा बारा मिनिटांत !"

हातांतील घड्याळाकडे पहात स्टेशन मास्तरांनीं असं सांगतांच लक्ष्मीनं पाटीलमळ्याचीं दोन तिकीटं काढलीं; आणि त्यापुढं जायचं असेल तर पुढचं पुढं पहातां येईल या कल्पनेनं तिनं मुलांना घेऊन गाडी पकडली.

'पाटीलमळ्या'ला देवीचा फार मोठा उत्सव होता म्हणून गाडीला बरीच गर्दी झाली होती. तरीपण लक्ष्मीनं एका माणसाची कां होईना कशीबशी जागा मिळविली आणि तिथं बाकाखालीं सामान ठेवून सखूला व गोविंदाला बसवलं. जागा थोडी असल्यामुळं तीं दोघं एकमेकांना

खेटून पण अंग चोरून बसलीं. त्यांच्या मांडीवर लक्ष्मीनं राजाला बसवलं आणि ती स्वतः त्यांच्याशेजारी उभी राहिली.

त्यावेळीं चारपांच स्टेशनं मार्गे टाकून ही गाडी एका उंचशा डोंगरामधून नागमोडी वळणं घेत चालली होती. खिडकींतून बाहेर दिसणारी रम्य वनश्री पहाण्यासाठीं सखूचे आणि गोविंदाचे डोळे आतुर झाले होते. त्यामुळं बसल्याजागेवरूनच ती आळीपाळीनं आपल्या माना उंचावून बाहेर पहात होतीं. गाडीच्या पाळण्यासारख्या वाटणाऱ्या हालचालीनं बिचारा राजा त्यांच्या मांडीवर झोपी गेला होता. त्याच्या अंगावर एक टॉवेल घालून लक्ष्मी उभ्याउभ्याच कसला तरी गूढ विचार करीत असावी असा तिचा चेहरा सांगत होता.

आपण अगदीं अनोळखी अशा गांवीं जायचं म्हणजे कुठं जायचं, तिथं आपली कुठं सोय होईल, आपणाला कुठं उतरावं लागेल, कुणा कुणाशीं बोलावं लागेल, कसलं कसलं काम करावं लागेल, काय काय खाऊन दिवस काढावे लागतील, मुलांना आपण घर सोडून, गांव सोडून, त्यांच्या वडिलांना सोडून कां आलों हें कसं कसं सांगावं लागेल आणि...आणि नवऱ्याचं घर सोडून तूं का आलीस असं कुणी विचारलंच तर !...

अशा एक नि दोन, हजारों प्रश्नांचीं उत्तरं मनाशीं पडताळीत लक्ष्मी उभी होती. त्यामुळं तिच्या डोळ्यांच्या पापण्या देखील क्वचितच खालींवर होत ! मग गाडींत इतर लोक एकमेकांविषयीं काय म्हणताहेत, आपापसांत काय बोलताहेत इकडे तिचं लक्ष कुठलं असायला ?... आणि तिला ह्या गोष्टीची पर्वा तरी त्यावेळीं कुठं होती म्हणा ! ती आणि तिचीं हीं तीन मुलं या पलीकडे दुसरं जग निदान त्या क्षणाला तरी तिला बिलकूल दिसत नव्हतं. आणि म्हणूनच ती आपल्या या जगाचाच एकसारखा विचार करीत होती.

इतक्यांत त्या गाडींतल्या एका उमद्या तरुणानं लक्ष्मीची मनःस्थिति थोड्या फार प्रमाणांत ओळखली आणि तिच्या मुलांची त्या टीचभर जागेंत बसून बाहेर पहाण्यासाठीं चाललेली धडपडहि जाणली. त्यामुळें

तो आपल्या खिडकीजवळच्या जागेवरून उठला आणि तिथं गोविंदाला आणि सखूला बसायला सांगून त्यानं त्यांच्या जागीं लक्ष्मीला 'बसा' म्हणून सांगितलं.

स्त्रीदाक्षिण्य म्हणून त्या तरुणानं दिलेली ही सवलत पत्करायला लक्ष्मी तयार होईना. 'आपणाला कुणाची देखील थोडीसुद्धां मेहेरबानगी नको' अशी तिनं घरांतून निघतेवेळींच मनाशीं खूणगांठ बांधलेली होती. त्यामुळं तिचं मन ही गोष्ट करायला निदान त्यावेळीं तरी कबुली देईना! पण दुसऱ्याला आपला बेत सांगून काय फायदा म्हणून तिनं त्या तरुणाला म्हटलं, "नको नको. मला संवय आहे अशी उभी रहायची."

"अहो, पण अशा किती वेळ उभ्या रहाणार तुम्ही? थोडं बसून घ्या. अजून खूप लांबचा पल्ला गाठायचाय!... हो, पण तुम्हांला जायचंय कुठं?"

पुन्हां तोच प्रश्न!...लक्ष्मीला नको होता तोच प्रश्न पुन्हां विचारला गेल्यामुळं ती पुन्हां गोंधळली. पण आतां 'पाटीलमळया'चं तिकीट तिनं काढलं असल्यानं त्या आधारावर कांहीं एक न बोलतां तिनं आपल्या दंडावरच्या चोळींत मुडपून ठेवलेलीं तिकीटं काढून त्याच्या समोर धरलीं!

लक्ष्मीला पाटीलमळयाला जायचंय हें ध्यानांत येतांच तो तरुण म्हणाला, 'बा! मग तर तुम्हाला बसलंच पाहिजे. अजून आठ तास गाडींत काढावे लागतील!"

"असेनात का!"

"थोडा वेळ तुम्ही बसलात तर..."

आणि त्यावर लक्ष्मी कांहीं उत्तर देणार इतक्यांत राजानं उठून जोरजोरानं रडायला सुरवात केली. गाडींतील ती गर्दी बघून आधींच तो भांबावून गेलेला आणि तशांत तो रडतो म्हणून गोविंदानं त्याला आवळून धरलेलं! त्यामुळं तो अगदीं मोठ्यानं रडूं लागला. लक्ष्मीनं त्याला घ्यायसाठीं हात पुढं करतांच तिच्याकडे तो झेप टाकून आला. त्याला प्यायचं होतं म्हणून रडतां रडतां त्यानं हसून आईला मिठी

मारली. पण उभं राहून लक्ष्मीला त्याला अंगावर घेतां येईना. तेव्हां त्या तरुणानं सखूला आणि गोविंदाला आपल्या जागेवर बसायला सांगून लक्ष्मीला जागा करून दिली. स्वतःसाठीं नव्हे, पण राजासाठीं लक्ष्मीला आतां ती जागा पत्करणं भाग पडलं.

डोंगरकटारीवरून जातांना दिसणारीं गाडीचीं नागमोडीं वळणं पहात गोविंदा व सखू कितीतरी वेळ मजेंत बसलीं होतीं. माथ्यावरचं पांढऱ्या ढगांच्या वेलबुट्टीन सुशोभित झालेलं निळं आभाळ, सभोंवतालची दाट आणि गर्द वनराजी, मधून मधून खोल दिसणारीं दरीखोरीं, तिथं कुठं कुठं चरत फिरणाऱ्या गाई, फुटलेल्या बांगडीच्या आकारासारखी बाकदार दिसणारी गाडीची अंगलट आणि चकचकीत दिसणारे दूरवरचे गाडीचे रूळ, शेजारून पळत जाताहेत असा भास निर्माण करणारे तारेचे खांब, त्यावरच्या असंख्य चिमण्या आणि प्रत्येक डब्यांतून डोकावणारीं लहानमोठीं माणसं...वगैरे हें सारं बघत असतांना बराच वेळ सखू बाहेर डोकावून पहात होती. लक्ष्मीनं तिला कितीदां 'बाहेर मान काढूं नको' असं सांगितलं असेल पण तिनं तें ऐकलं नाहीं. अखेर वाऱ्याच्या झुळकीबरोबर डोळ्यावर येणारे कैंस मागें सारण्यासाठीं म्हणून तिनं जेव्हां कानामागें हात नेला तेव्हां तिच्या ध्यानांत आलं कीं, त्या कानांतला तिचा डूल पडून गेला होता !...आणि त्याची खात्री जेव्हां तिला पटली तेव्हां ती कावरीबावरी झाली. एकदां सोडून दहादां जागची उठून तिनं आपला डूल शोधला. पण डूल कांहीं सांपडेना ! तेव्हां आई रागावेल या भीतीनं तिनं गोविंदाला हळूच सांगितलं, "दादा, डूल पडला !..." आणि मग हुंदका न आवरल्यानं ती मुसमुसून रडूं लागली.

सखूला अशी एकाएकीं रडतांना बघून लक्ष्मीच्या काळजांत धस्स झालं ! कुठं तरी सखूचा हात नाहीं तर पाय अडकला आहे कीं काय या कल्पनेनं तिनं राजाला आपल्या जागेवर बसवला आणि ती एकदम सखूकडे धांवली. त्याबरोबर तिच्या पदराला आपल्या चिमुकल्या मिठींत घट्ट धरून बसलेला राजा नकळत बाकावरून खालीं ओढला गेला...

त्याचं नाक ठेचलं, आणि सगळं अंग धाप्‌दिशीं खालीं आपटल्यानं त्यानं जोरानं भोकाड पसरलं....

सखूकडे धांवलेली लक्ष्मी राजाच्या ओरडण्यानं क्षणार्धात मागें वळली तों त्या मधांच्या तरुणानं राजाला हृदयाशीं कवटाळीत गप्प बसवायचा चालवलेला प्रयत्न तिला पहायला मिळाला...तिनं गडबडीनं राजाला जवळ घेतांच तो तरुण सखूजवळ येऊन तिला म्हणाला, " काय ग झालं ? "

—आणि या सगळ्या गडबडीनं त्या डब्यांतील सगळेच लोक जेव्हां सखूकडे बघूं लागले तेव्हां ती हुंदके देऊं लागली. त्यामुळं त्या तरुणानं तिला जवळ घेत पुन्हां विचारलं, " अग पण रडतेस कां तें तर सांगशील ? "

तेव्हां गोविंदा म्हणाला, " तिचा डूल हरवला." आणि मग " खिडकींतून वाकून पहातांना..." असं सखूनंहि पुढचं सांगून टाकलं.

" हं ! हरवला तर हरवला ! अशी बायकासारखी रडतेस होय तेवढ्यासाठीं ? "

असं म्हणत जेव्हां त्या तरुणानं सखूची समजूत घातली तेव्हां रडत असलेल्या राजाला गोविंदाच्या हवालीं करून लक्ष्मी तिथं आली. तिनं सखूला जवळ घेतली. तिच्या केंसावरून हात फिरवला आणि म्हटलं, " तरी मी म्हटलं होतं बाहेर मान काढूं नको !... जाऊं दे आतां आपण नवा डूल आणूं हं ! पूस बघूं डोळे. "

" खरंच ? " असं म्हणून सखू जेव्हां हंसली तेव्हां लक्ष्मीच्या मनांत झर्‌दिशी एक विचार येऊन गेला कीं, आपल्या बाबूरावांनीं देखील मुलांची जर अशीच समजूत घातली असती आणि...

पण तेवढ्यांत एक स्टेशन जवळ आल्यामुळं गाडी थांबतांच गोविंदानं राजाला लक्ष्मीच्या हवालीं केला. खिशांत ठेवलेली आपली बासरी त्यानं वर काढली आणि राजाला खेळवावं म्हणून आतां तो ती वाजवणार इतक्यांत त्या तरुणानं सखूला विचारलं, " चहा घ्यायला येतां तूं आणि

तुझा दादा ? " पण लक्ष्मीला हें मुळींच आवडलं नाहीं. म्हणून तिनंच त्या तरुणाला सांगून टाकलं, " तीं दोघंहि येणार नाहींत ! "

" कां ? "

" कां म्हणजे ? नाहीं म्हटलं ना मी एकदां ! मग पुन्हां 'कां' म्हणून काय विचारतां ? "

खरं म्हणजे लक्ष्मीला त्या तरुणानं आपल्याशीं आणि आपल्या मुलांशीं इतक्या सलगीनं वागावं हें मुळींच खपत नव्हतं. तिला तें लघळपणाचं वाटत होतं. पण तसं एकदम बोलून दाखवणं व्यवहाराला धरून बरं नसल्यामुळं तिच्या चेहऱ्यावर मात्र यावेळीं तीव्र नापसंती दिसूं लागली. त्यामुळं तो तरुण थोड्या धिटाईनंच तिच्याजवळ येऊन म्हणाला, " मला तुम्ही एखादा मवाली तर समजत नाहीं ? " आणि त्यानं लगेच आपल्या शर्टच्या खिशाच्या आंतल्या बाजूला असलेला बालवीराचा बिल्ला तिच्या समोर धरला.

बालवीराचा बिल्ला पहातांच लक्ष्मीनं चमकून त्याच्याकडे पाहिलं आणि सौम्यपणानं विचारलं,

" आपलं नांव ? "

" माझं नांव ? "

" हो. "

" सदानंद. "

" तुमचं गांव, म्हणजे तुम्ही नेहमीं कुठं असतां ? "

" तुमच्याच गांवचा आहे मी ! "

लक्ष्मीनं हें ऐकलं मात्र आणि ती विलक्षण गोंधळून गेली. कारण तिच्या गांवचा, निदान तिच्या समजुतीप्रमाणं तरी, असा एकहि माणूस नव्हता कीं ज्याला बाबूरावांविषयीं माहिती नव्हती !...त्यामुळं आपण कुठं जाणार, काय करणार हें जर ह्या गृहस्थानं बाबूरावांना सांगितलं तर साराच बेत निकालांत निघेल आणि जें घरांत चुकावयाचा प्रयत्न करून आपण घराबाहेर पडलों, तेंच नेमकं परक्या गांवीं देखील होणार ! आणि...

लक्ष्मीच्या मनांतील ही बेचैनता ओळखून सदानंद म्हणाला, " ताई, तुम्ही अगदीं निर्धास्त असा. तुमची सगळी माहिती मला असली तरी मी त्याचा अंशतःहि कुठं स्फोट होऊं देणार नाहीं. "

" सदानंद !... खरं म्हणतां हें ? " असं जेव्हां लक्ष्मीनं सदानंदला अधीरतेनं विचारलं, तेव्हां तो म्हणाला, " बालवीराचं वचन नेहमीं सत्यावर आधारलेलं असतं ताई ! "

" पण... "

" छे ! कसलीच शंका मनांत आणूं नका. मी तुम्हाला हवी ती मदत देईन. "

मदत !... छे ! लक्ष्मीला आतां कुणाच्याच मदतीची आवश्यकता वाटत नव्हती. स्वतःच्या पायावर उभं राहून तिला जगायला हवं होतं. म्हणून ती सदानंदला म्हणाली, " मी आपली फार आभारी आहें. "

" छे छे ! हें काय ताई ? आभार कशाबद्दल ? ज्यांना मदतीची ज़रूर असेल त्यांना मदत करणं हेंच तर बालवीराचं कर्तव्य ! "

"पण मला कुणाच्या मदतीची जरूर नाहीं" असं बोलून टाकावं असं क्षणभर लक्ष्मीच्या मनांत आलं पण ओठावर आलेले हे शब्द तिनं मागें घेतले. कारण तिला बालवीराबद्दल थोडीफार माहिती होती. लहानपणीं अशाच एका बालवीर मास्तरांनीं तिला शाळेंत शिकविलं होतं तें तिला त्यावेळीं आठवलं; आणि म्हणून हा माणूस आपणाला फसवणार नाहीं या कल्पनेनं ती म्हणली," आतां तुम्ही मुलांना न्या चहा प्यायला. पैसे मात्र मी देईन हं ! "



## —आणि नंतर

## ७

"आतां आपल्याला कुठं जायचं ग आई ? ...कुणाच्या घरीं उतरायचं आपण ?"

देवीच्या उत्सवानिमित्त 'पाटीलमळया'च्या स्टेशनवर चिक्कार गर्दी झाली होती. त्या गर्दीतून वाट काढीत लक्ष्मी कशीबशी फलाटाच्या एका कोपऱ्यावर आली आणि तिथं आल्याबरोबर गोविंदानं हा प्रश्न तिला विचारला.

त्यावेळीं रात्रींचे नऊ वाजलेले. बाहेर काळोख पडलेला. पाण्याच्या लोंढ्याप्रमाणं माणसांची स्टेशनबाहेर पडण्यासाठीं रीघ लागलेली. जो तो आपापलं सामान आणि बरोबर आणलेलीं लहानमोठीं माणसं सांभाळित पुढं सरकत असलेला...जिकडे तिकडे नुसती धांदल उडालेली...लक्ष्मीनं भिरभिरत्या नजरेनं त्या गर्दीकडे पाहिलं. स्टेशनावरच्या विजेच्या दिव्यांच्या लखलखटांत माणसांच्या तोंडावर ओसंडणारा आनंद तिला स्पष्ट दिसला...तीं माणसं कुठं जात होतीं तें लक्ष्मीनं मान उंचावीत सभोंवार पाहिलं. तेव्हां सखूनं लक्ष्मीला बिलगत विचारलं, "आतां आपल्याला कुठं जायचंय ?"

'पाटीलमळा' लक्ष्मीला अगदींच नवखा. तिथली तिला कांहीं एक माहिती नव्हती ! मग ती काय सांगणार ? भांबावलेल्या मनानं

स्टेशनवरच्या सर्व हालचालींकडे दृष्टि टाकीत ती म्हणाली, "जाऊंया हं आतां. ही गर्दी कमी झाली ना, म्हणजे मग जाऊंया."

"पण कुठं जायचं आपल्याला? तुझ्या ओळखीचं आहे इथं कुणी?"

आपल्याला आतां कुठं जायचंय म्हणून गोविंदाला भलती उत्सुकता होती. म्हणून त्यानं त्याच अधीरतेनं लक्ष्मीला पुन्हां तोच प्रश्न विचारला. त्यामुळं कांहींतरी बोलावं म्हणून लक्ष्मी म्हणाली, "एवढी घाई कारे जायची? थोडी गर्दी कमी झाली म्हणजे बघूं मग."

"अग पण असंच आपण थांबलों तर उशीर नाहीं का व्हायचा? ते बघ त्या मोठ्या घड्याळांत साडेनऊ वाजून गेले!"

"जाऊं देत रे, मी आहे ना बरोबर! मग तुला कसली काळजी?"

खरं म्हणजे आपण इथं आलों पण आतां पुढं कुठं जाणार, कुठं रहाणार, काय करणार याची लक्ष्मीला तरी कुठं कल्पना होती नाहीं कां? जिथं कुणी आपल्या ओळखीचं नाहीं अशा दूरदूरच्या गांवीं जायचं एवढंच तिनं निघतांना ठरविलेलं! पण त्यानंतर उद्भवणाऱ्या इतर प्रश्नांचा कुठं तिनं विचार केला होता? पुढचं पुढं पहातां येईल याच एका विश्वासाच्या जोरावर तिनं घर सोडलेलं! पण आतां जेव्हां 'कुठं जायचं?' म्हणून गोविंदानं तिला एकसारखं विचारायला सुरुवात केली तेव्हां मात्र ती गोंधळून गेली. मानेवर झोपवलेल्या राजाला सावरून धरीत ती उगाचच इकडे तिकडे पहात होती. तें बघून तिथून जाणाऱ्या एका बाईनं तिला सहज विचारावं म्हणून म्हटलं, "कुठं जायचं बाई तुम्हाला?"...पुन्हां तोच प्रश्न!

कांहींतरी उत्तर द्यायचं म्हणून लक्ष्मी म्हणाली, "उत्सवालाच आलोंय आम्ही. पण देवीच्या देवळाकडे कुठून जायचं तो रस्ता माहीत नसल्यानं थांबलेंय. तिकडे जाणार कुणी भेटलं कीं जाईन."

"मी पण तिकडेच निघालें. चला येत असाल तर!"

"थोडा अवकाश आहे. माझा भाऊ एवढ्यांत आला कीं जाऊं आम्ही..." असं बोलून लक्ष्मीनं त्या बाईला वाटेला लावली. तेव्हां गोविंदा म्हणाला, "किती खोटं बोलतेस ग आई?"

"मग ! कुणीहि चल म्हटलं कीं जायचं हो वाटेल तिकडे उगाचच... आणि कुणी फसवलं म्हणजे मग ?"

"तुला इथलं कांहीं ठाऊक नाहीं तर मग आपण इथं आलोंच कशाला ग ?"

कांहींसं चिडून गोविंदा असं बोलल्यामुळं लक्ष्मी चपापली. क्षणभर तिनं आणखी एकदां इकडे तिकडे पाहिलं आणि मग ती म्हणाली, "आतां आपण वेटिंग रूममध्यें जाऊंया. चला."

"आणि मग तिथंच रहायचं ?"एवढा वेळ शांत असलेल्या सखूनं असं विचारतांच लक्ष्मी म्हणाली, "आजची रात्र काढूं तिथं. मग बघूं सकाळीं कुठं जायचं तें !..."

लक्ष्मीबरोबर सामान फारसं नव्हतंच. एक ट्रंक आणि दोन मोठालीं गांठोडीं ! बस्स तेवढंच ! त्यामुळं लक्ष्मीनं राजाला सखूजवळ दिला आणि आपल्या डोक्यावर ती ट्रंक आणि एक गाठोडं घेऊन ती पुढं चालली. गोविंदानं दुसरं गाठोडं उचललं आणि सखूच्या हाताला धरून तोहि लक्ष्मीच्या मागोमाग निघाला.

वेटिंग रूममध्यें बरेच प्रवासी अंथरूण पसरून झोपायच्या तयारींत होते. तिथं उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत दोन अडीच फूट जागा तेवढी रिकामी होती. पण तिथं सारा केर होता ! लक्ष्मीला तिथं बसायचं म्हणून कससंच वाटलं. पण नाइलाजानं तिला त्या जागेचा आसरा घेणं भाग पडलं....तेव्हां आपणाला पदोपदीं असंच कां सोसावं लागणार ? अशी कल्पना तिच्या मनाला झर्‌दिशी चाटून गेली...त्या क्षणाला तिनं एक दीर्घ उसासा टाकला आणि एका फडक्यानं ती जागा कशीबशी झाडली, नंतर मुलांना तिथं बसवून तिनं बरोबर आणलेल्या दशम्या त्यांना खायला दिल्या...

चार घास खावून होतांच मुलं झोपीं गेलीं. दिवसभरच्या प्रवासानं त्यांना बराच शीण आला होता. म्हणून त्यांना अगदीं गाढ झोप लागली. त्यांच्या अंगावर एक पातळ पांघरुण घालून लक्ष्मी त्यांच्या शेजारीं बसून राहिली. राजा तिच्या मांडीवर होताच. त्यामुळं मुलं झोपून

उरलेल्या टीचभर जागेत अंग चोरून बसणं देखील तिला मोठ्या जिकीरीचं वाटलं !...पण लक्ष्मी तो त्रास सोसून अगदीं गप्प बसली होती ! आल्या परिस्थितीला तोंड देणं तिला भाग होतं...

तास दोन तास असेच गेल्यावर लक्ष्मीलाहि गुंगी येऊं लागली. त्यामुळं तिनं राजाच्या अंगावर खालीं मान वाकवून डोळे मिटून घेतले... आणि थोड्याच वेळांत जेव्हां सखू 'आईऽऽ' करीत किंचाळून उठली तेव्हां लक्ष्मीनं दचकून समोर पाहिलं. सपाटून घाबरलेली सखू आईकडे धांव घेत होती !... गोविंदा कुणाच्या तरी मागें धांवला होता !... लक्ष्मीच्या काळजांत धस्स झालं तें बघून. बराच वेळ पाय अवघडल्यामुळं तिला चटकन् उठायला देखील येईना !...

कुणीतरी चोरानं सखूच्या पायांतील तोडे खसकन् काढून नेले होते आणि त्याची चाहूल लागतांच गोविंदा त्याच्या मागें धांवला होता !... क्षणार्धांत साऱ्या उतारूंमध्यें ही बातमी पसरली आणि जो तो 'चोर, चोर' करीत आपलं सामान उराशीं कवटाळीत सैरावैरा धावूं लागला !

झाल्या प्रकारानं लक्ष्मीच्या छातींत धडकी भरली. तिनं भेदरलेल्या नजरेनं सखूला जवळ ओढली आणि ती 'गोविंदा ऽऽ गोविंदा ऽऽऽ' करून गोविंदाला मोठ्यानं हांका मारूं लागली. पण गोविंदाकडून बराच वेळ उत्तर येईना ! तेव्हां तिच्या मनाचा धीर सुटला...भीतीनं तिच्या अंतःकरणाचा ठाव सोडला...तिची बोबडी वळून गेली...

राजाला आणि सखूला पोटाशीं घट्ट धरून लक्ष्मी वाट दिसेल तिकडे 'गोविंदा ऽऽ' करीत निघाली.

स्टेशनाबाहेरच्या आवारांत अंधार मी म्हणत होता. काजवे लकाकत होते. रातकिडे किरकिरत होते...आभाळ भरून आलं होतं आणि मधून मधून विजा कडाडत होत्या !... धीर धरून पोरांना आवळून धरीत लक्ष्मी गोविंदाचा शोध करीत होती... ओरडून ओरडून तिचा घसा कोरडा पडायची वेळ आली. तेवढ्यांत त्या गडबडीनं जागा आलेला पोलीस तिथं धांवून आला. त्याला बघून लक्ष्मीनं कसा-बसा झाला प्रकार सांगितला आणि ती पुन्हां गोविंदाच्या शोधासाठीं

धावूं लागली. त्यामुळं नकळत राजा तिच्या खाकेंतून निसटून खालीं पडला !...अंधारांत चाचपडत लक्ष्मी मागून निघालेली सखू ओडरली, ' आई S राजा SS....'.

विजेच्या वेगानं मागें वळून रडत असलेल्या राजाला लक्ष्मीनं उचलला तों त्याच्या कपाळाला खोंक पडून तें रक्तबंबाळ झालं होतं !...स्वतःचं भान विसरून लक्ष्मीनं राजाला उराशीं कवटाळला आणि पुन्हां गोविंदाला हांक दिली, " बाSळ, कुठं आहेस रे तूं ? "

इतक्यांत कुणीतरी एक माणूस वेगानं धांवत येतांना सखूनं पाहिला. तो त्यांच्याच दिशेनं येत असलेला बघून ती घाबरून ओरडली, " आई, कोण आल !..."

लक्ष्मीनं सखूला जवळ ओढली आणि धीर धरीत त्या माणसाला विचारलं, " कोण ? "

तो सदानंद होता. स्टेशनवरची गडबड ऐकून शेजारच्या विश्रांति गृहांतून त्यानं इकडे धांव घेतली होती. लक्ष्मीचा आवाज ऐकतांच तो घाबरून म्हणाला, " कोण ताई ? "

एखाद्या उन्मळून पडत असलेल्या वृक्षाला आधार मिळावा तसं लक्ष्मीला वाटलं. सदानंदाचा आवाज तिनं ओळखला. म्हणून खात्री करून घेण्यासाठीं तिनं विचारलं " कोण सदानंद ? "

" होय मीच. काय भानगड ताई ? "

झालेली हकीकत समजतांच सदानंदनं आपल्या खिशांतील शीट काढून जोरानं वाजवली आणि लक्ष्मीला व तिच्या दोन मुलांना घेऊन तो स्टेशनवर आला. तिथं आल्याबरोबर त्यानं वेटिंगरूममध्यें डोकावून पाहिलं तो गोविंदा ' आईS, आईSS ' म्हणून हांका मारीत सामानाजवळ बसलेला !... " बाSळ " म्हणून त्याला हांक मारीत लक्ष्मी त्याच्याकडे धांवली तों तिथं पळत पळत आलेला पोलीस तिला म्हणाला, " तुम्ही गेला नि हा तुमचा मुलगा इथं आला. भीतीनं तो अर्धमेला होऊन ' आईS ' करून ओरडत होता. त्याला समजावतां समजावतां पुरेवाट झाली माझी...आणि माझे कांहीं इतर साथीदार चोराच्या मागें

लागल्यामुळं आणि कांहीं अचानक निर्माण झालेला इथला घबराट कमी करण्यांत गुंतल्यामुळं मला ह्याच्याजवळ थांबावं लागलं...त्यामुळं तुम्हाला शोधून काढणं म्हणजे...तोंवर तुम्ही आलाच ! "

पोलीस आपल्यापरीनं आपल्या कामगिरीचं वर्णन करीत होता. पण लक्ष्मीचं तिकडे मुळीच लक्ष नव्हतं. ती गोविंदाला जवळ ओढून त्याला धीर देत होती...त्याला पोटाशीं धरून कवटाळीत होती...

थोड्या वेळानं सदानंदनं राजाच्या कपाळावर पट्टी बांधली आणि त्याला लक्ष्मीच्या स्वाधीन केला. रडून रडून राजा दमला होता. बरंचसं रक्त गेल्यानं त्याला बराच थकवाहि आला होता. त्यामुळं त्याला घ्यायला घेत लक्ष्मीनं सदानंदकडे मोठ्या करुणदृष्टीनं पाहिलं.

राजाची नाडी वगैरे व्यवस्थित होती म्हणून सदानंद म्हणाला, " काळजीसारखं कांहीं नाहीं. "

तेवढ्या वेळांत पांचसहा बालवीर तिथं धावून आले. त्यांना पहातांच सदानंदानं त्यांना आपली ओळख पटविली आणि झाला प्रकार सांगितला.

एका बालवीरानं एक बग्गी आणून स्टेशनसमोरच्या आवारांत उभी केली. तेव्हां सदानंद म्हणाला, " चला, " त्यामुळं लक्ष्मीनं आश्चर्यानं त्याला विचारलं, " कुठं ? "

" बालवीर मंदिरांत जाऊं आपण. तिथं कसलाच धोका नाहीं. "

लक्ष्मी भांबावून गेली होती. कुठं तरी निवाऱ्याची जागा तिला हवी होती. पण तिथं जाण्यासाठीं ती चटकन् तयार होईना ! तेव्हां सदानंद तिची अडचण ओळखून तिला म्हणाला, "आतां चटकन् चला, राजाला कांहीं उपचार करायला हवा. उठा. तुम्हाला आत्तां माझं ऐकलंच पाहिजे... "

" पण... "

" चला चला लौकर. बाहेर विजा जोरानं व्हायला लागल्यात ! पाऊस यायच्या आंत जायला हवं...ताई, एवढा अविश्वास माझ्यावर ? " त्यावेळीं लक्ष्मीनं कुणावर तरी विश्वास ठेवायला हवाच होता...पण ती

बाबूरावांच्या आठवणीनं एवढी बेचैन झाली होती कीं, तिच्या तोंडून शब्द देखील फुटेना...तथापि 'ते आज जवळ असते तर !, असं मात्र तिला राहून राहून वाटूं लागलं...

बालवीर मंदिरांत जाण्यांत धोका नाहीं याची लक्ष्मीला खात्री पटली, तेव्हां ती मुलांना घेऊन बग्गींत बसली. इतर बालवीरांनीं लक्ष्मीचं सामान बग्गींत टाकतांच सदानंद सखूला आणि गोविंदाला घेऊन वर चढला; आणि बग्गी निघाली.

ऐन रात्रीची वेळ असल्यानं रस्त्यावर शुकशुकाट होता. कुणी येत नव्हतं, जात नव्हतं. गार वारा सुटलेला-आभाळांत गडबड उडालेली. मधून मधून टपोरा पाण्याचा थेंब पडूं लागलेला...येऊन जाऊन लक्ष्मी बसली होती त्या बग्गीचाच आवाज काय तो भयाण शांततेचा भंग करीत होता... त्यामुळं ती सारी परिस्थिति असह्य झाली. तेव्हां लक्ष्मी सदानंदाला म्हणाली, "आज तुम्ही भेटला म्हणून...पण तुम्ही एकदम कसे इथं आलांत ?"

• • •

# नवी ओळख

८

सदानंदाच्या हाताला धरून आलेली एक मुलगी बघून गोविंदाला आणि सखूला फार आश्चर्य वाटलं. लक्ष्मीनं देखील कांहींशा आश्चर्यानंच तिच्याकडे पाहिलं. त्यामुळं ती मुलगी थोडीशी गोंधळली आणि तिनं सदानंदाच्या हातांत असलेला आपला हात सोडवून घेतला. त्यानंतर सदानंदाच्या मागें जाऊन जेव्हां ती लपली तेव्हां लक्ष्मीनं त्याला विचारलं, " कुणाची मुलगी ? तुमची ? "

त्या मुलीला पुढं ओढून उभी करीत सदानंदनं सांगितलं, " अहं ! ही आमच्या नानासाहेबांची मुलगी. "

" नानासाहेबांची ? कोण नानासाहेब ? "

" आमच्या ह्या बालवीरमंदिराचे प्रमुख चालक. "

" असं का ?... "

लक्ष्मीनं असं म्हटलं तेव्हां ती मुलगी चटकन् हंसून म्हणाली, "आमचे नानासाहेब आतां इथं येणार आहेत ! "

" इथं ? "

" हो. आत्तां येतील नाहीं सदानंद ? "

" हो, येतील. पण तुझं नांव सांग ना यांना अगोदर. "

सदानंद असं म्हणाला त्यावेळीं सखूनं आणि गोविंदानं त्या मुलीकडे

कुतूहलानं पाहिलं. ती मुलगी सात आठ वर्षांचीच असेल पण भारी चलाख होती. दिसायला गोरी आणि नाकडोळ्यांनीं नीटस. अंगांत एक अबोली रंगाचा जाळीदार कापडाचा फ्रॉक, केस भुरे आणि कुरळे, कानांत सूर्यफुलं अडकवलेलीं, हातांत मोगऱ्याच्या फुलांच्या जाडजूड माळा बांधलेल्या आणि केंसावरून मागें एक तसलीच भपकेदार माळ माळलेली !...हंसणं अगदीं मोहक आणि बोलणं तर त्याहूनहि गोड... अशा त्या मुलीनं गोविंदाकडे आणि सखूकडे पहात म्हटलं, " माझं नांव होय ! माझं नांव माधुरी. "

" छान आहे नाहीं नांव ?" गोविंदानं सखूला डिवचून विचारतांच ती माधुरीला म्हणाली,

" तुला लेझीमचा खेळ येतो ? "

माधुरी खुदकन हंसली आणि म्हणाली,

" येतोय का म्हणून काय विचारतेस ?...हो, पण तुझं नांव काय?"

" सखू ! आणि दादाचं गोविंदा. "

" अय्या !...असलीं नांव आवडतात तुम्हांला ? " माधुरी असं म्हणायला आणि नानासाहेबांनीं तिथं प्रवेश करायला एकच गांठ पडली ! त्यामुळं ते माधुरीला म्हणाले, "काय चाललंय? नांवं विचारतेस होय ह्या मुलांचीं ? "

बालवीराच्या पोषाखांत नानासाहेब आले होते. त्यांच्या अंगावरचा तो खाकी पोशाख, गळ्याभोंवतालचा हिरवा स्कार्फ, डोक्यावरचा हिरवा फेटा आणि त्यावरचा चकाकणारा मुख्य बालवीर शिक्षकाचा बिल्ला, पायांतील हिरवट रंगावरचे पायमोजे आणि सर्वांत मुख्य म्हणजे त्यांच्या तोंडावर चमकणारं हास्य बघून लक्ष्मी बसली होती ती उठून उभी राहिली, सखूला राजाला घ्यायला सांगितलं आणि डोक्यावरचा पदर थोडा पुढं ओढला.

एका खिडकीशेजारीं टेकून उभं रहात नानासाहेब लक्ष्मीला म्हणाले, " बसाना. सदानंदनं मला सारं सांगितलंय...तुम्ही निःसंकोच मनानं इथं रहा..."

अगदीं अनोळखी अशा माणसापुढं उभं रहायची लक्ष्मीला तितकीशी संवय नसल्यामुळं तिनं संकोचानं मान खालीं घातली होती. नानासाहेबांच्या त्या बोलण्यानं तिला किंचितसा धीर आला म्हणून वर मान करायचा प्रयत्न करीत तिनं म्हटलं,

" असूं दे, एवढा वेळ बसलेंच होतें...."

" आणि सदानंद, यांना कांहीं खायला वगैरे दिलंस कीं नाहीं अजून ? "

" मी तुमच्या पुढंच आलों आत्तां. आतां आणतो हं ! "

सदानंदनं असं म्हणतांच नानासाहेब म्हणाले,

" काय माधुरी, पाहुण्यांची अशीच कां व्यवस्था करायची ? जा, घरीं जा आणि तुझ्या आईला म्हणावं कीं, ह्या मंडळींना कांहीं ताजं खायला पाठव. मुलांना भूक लागली असेल. जा बघूं..."

सदानंद आणि माधुरी क्षणार्धांत " आणतों हं ! " असं सांगून निघून गेल्यावर नानासाहेब म्हणाले, " ताई, रात्रीं बरीच गडबड उडाली म्हणे ? तुमच्या मुलाला लागलंय ना ? " आणि त्यांनीं राजाच्या कपाळावरची पट्टी बघून त्याला जवळ घेण्यासाठीं हात पुढं केले. पण राजानं कांहीं आपले हात वर उचलून त्यांच्याकडे जायला झेप टाकली नाहीं ! तो नानासाहेबांच्याकडे टक लावून पहात होता. तें बघून नानासाहेब म्हणाले,

" बराच लुच्चा दिसतोय हं ! पहातोय कसा पाहिलांत का माझ्याकडे ? "

" नवीन दिसताय ना ? म्हणून..." असं म्हणत लक्ष्मीनं राजाला जवळ घेतला आणि त्याच्या कपाळावरची पट्टी सोडली. त्यामुळं राजाला बऱ्याच वेदना झाल्या असाव्यात. कारण एवढा वेळ तो जो शांत होता तो पट्टी सोडतांक्षणींच जोरजोरानं रडूं लागला. त्याची समजूत घालावी म्हणून लक्ष्मीनं त्याला पदराखालीं घेतलं तेव्हां नानासाहेब म्हणाले, " थोड्या वेळानं दवाखान्यांतच पाठवा त्याला मी बघतों मग..."

नानासाहेब लक्ष्मीला अगदीं नवखेच होते. त्यामुळं कुठला दवाखाना, कुठं आहे, कुणाबरोबर पाठवूं ?...वगैरे कांहीं एक न विचारतां ती खालीं मान घालून आणि डोक्यावरचा पदर थोडा पुढं ओढून म्हणाली, " पाठवीन. "

" ठीक आहे. आणि या मुलांचीं नांवं काय ? हं, तूं काय शिकतोस बाळ ? "

गोविंदाला उद्देशून नानासाहेब असं म्हणाले तेव्हां गोविंदा म्हणाला, " माझं नांव गोविंदा."

" आणि हिचं ? "

" माझं सखू ! "

" असं कां ! छान. आणि ह्या बाळाचं ? "

" राजा. "

" वा ! राजा म्हणजे राजाराम का ? "

" अं हं ! नुसतंच राजा."

" हो का ? आणि सखू, तुझं सगळं नांव सांग बघूं ! "

" सखू बाबूराव शिंदे."

सखूनं आपलं नांव सांगतांच नानासाहेब बाबूरावांबद्दल कांहीं विचारतील म्हणून लक्ष्मी गडबडीनं म्हणाली,

" आमची सखू गाणं छान म्हणते हं ! "

लक्ष्मीनं विषय बदलला हें नानासाहेबांनीं ओळखलं. म्हणून ते म्हणाले, " आतां मी बाहेर जाऊन येतों हं !...आलोंच "...आणि तिथून ते चटकन् निघून गेले.

नानासाहेब तिथं थोडा वेळच होते. पण त्यांनीं बऱ्याच आपुलकीनं लक्ष्मीची चौकशी केली होती. त्यामुळं लक्ष्मीला बराच धीर आला. तिनं राजाला उगाचच पोटाशीं आवळून धरला...त्यावेळीं तिच्या मनांत आपल्या आईवडिलांच्या आठवणीनं कालवाकालव झाली होती.... तिचे आई वडील ज्या जिव्हाळयानं, ज्या आपुलकीनं तिच्याशीं वागत होते तोच जिव्हाळा आणि तीच आपुलकी बालवीर मंदिरांत

आल्यापासून तिला अनुभवायला मिळाली होती. अर्थात् हें सारं खरं असलं तरी आईबडिलांची तुलना कुणाशीच होऊं शकणार नाहीं, हीहि जाणीव तिच्या मनाला असल्यामुळं ती बेचैन झाली होती. त्याच क्षणाला पांखराप्रमाणं त्यांच्याकडे भुर्‌दिशीं उडून जातां आलं तर किती बरं होईल ! असं तिच्या मायेला भुकेल्या मनाला वाटल्यावाचून राहिलं नाहीं. पण बाबूरावांची आठवण दुसऱ्याच क्षणाला झाल्याबरोबर तिला एकदम हुंदका आला. त्याचवेळीं तिनं ठरवून टाकलं कीं, काय वाटेल तें झालं तरी आतां परत जायचं नाहीं !

वास्तविक लक्ष्मी माहेरीं गेली तर तिला कशाचीच काळजी राहिली नसती. मुलांचं शिक्षण झालं असतं, तीं गोडधड खाऊन गुटगुटीत झालीं असतीं, आणि मुख्य म्हणजे आईवडिलांच्या सावलींत ती स्वतः अगदीं निर्धास्तपणें राहूं शकली असती...पण असा हा विचार मनांतून सरकत असतांना लक्ष्मीच्या डोळ्यांतून आंसवं घळाळूं लागलीं....आणि त्याचवेळीं बरोबर आणलेला डबा घेऊन सदानंदानं तिथं प्रवेश केला. लक्ष्मीच्या डोळ्यांतील अश्रू बघून तो आश्चर्यानं म्हणाला, "काय झालं ?" त्यामुळं लक्ष्मी चटकन् बोलून गेली, " झालं असतं तर फार बरं झालं असतं ! "...आणि तिला पुन्हां जोराचा हुंदका आला...

सदानंद बरोबर माधुरी आली होतीच. तिनं तो डबा उघडला आणि त्यांतून आणलेला चिवडा आणि रव्याचे लाडू बाहेर काढले. तिनं चहाहि बरोबर आणला होताच. त्यामुळं ती गोविंदाला आणि सखूला म्हणाली,

" आधीं हें खाणार कीं चहा ? "

जवळ जवळ गोविंदा, सखू आणि माधुरी एकाच वयाचीं असल्यानं त्यांची गट्टी तेव्हांच जमली. फार तर चार दोन वर्षांचं अंतर असेल एकमेकांत इतकंच !...माधुरीच्या हातांतील फुलांच्या माळेकडे पहात सखूनं तिला विचारलं, " बांगड्या नाहीं घालत ? "

" अंहं ! हेंच आवडतं मला. "

" अगबाई ! दररोज हेंच ? "

" हो. आमच्या घरीं छान बाग आहे. तिथं खूप फुलं आहेत. तुला पण देईन हं ! घेशील ? "

" आणखी कोण कोण आहे तुमच्या घरीं ? " गोविंदाची जिज्ञासा जागृत झाली. त्यानं असं विचारतांच माधुरी म्हणाली, " तुझ्यापेक्षां थोडा मोठा असा दादा आहे. आई, नानासाहेब आणि मी. "

" दादा ? मग तो आला नाहीं ? "

" तो होय ?...तो...तो गेलाय् घोड्यावर बसून फिरायला ! त्याला घोड्यावर बसायला फार आवडतं. "

" असं का ? तुमच्या घरीं घोडा पण आहे ? "

" हं ! त्या दिवशीं आम्ही सर्कस बघून आलों ना, तेव्हांपासून दादाला ही संवय लागलीय. आमच्या बग्गीचा घोडा आहे ना, त्याच्या-वरच बसतो अरे तो ! "

" इथं सर्कस आहे ? "

" हो, देवींचा उत्सव आहे ना ! म्हणून सर्कस आलीय्. छान असते नाहीं सर्कस ? पांचसहा महिने झाले आम्ही आमच्या आजोळीं गेलों होतों ना, तेव्हां पण पाहिली. मला फार आवडते सर्कस. "

" मग आज नाहीं तर उद्यां जाऊंया आपण ? " सखूनं मोठ्या उत्सुकतेनं गोविंदाला असं विचारलं. तेव्हां गोविंदा म्हणाला, "आईला विचारायला हवं ! ती जा म्हटली तर जाऊंया. "

फराळाचं खात खात त्यांचं हें बोलणं चाललं होतं. त्यामुळं घोटभर पाणी पिऊन माधुरी म्हणाली, " मी नेईन ना पण तुम्हांला. अरे, किती छान छान गंमत आहे तिथं ! "

" काय काय आहे ? विदूषक आहे ना ग ? "

" हो एक का चांगले चार पांच आहेत. फार मजा करतात रे ते ! पडद्याच्या आंतल्या बाजूला झक्कासपैकीं बँड वाजतो आणि त्या तालावर वाटेल तशा उड्या मारीत नाचतात हे विदूषक ! मग अशी गंमत वाटते..."

एवढं बोलून माधुरी थांबली. तिनं लांबवर पाहिलं...त्यावेळीं चंदेरी

टिकल्या लावल्यामुळं चमचमणाऱ्या सॅटणीच्या चड्ड्या घालून झोक्यावर काम करणाऱ्या सर्केशींतल्या मुली तिच्यासमोर तिला दिसत होत्या ! एक-मेकींच्या हातांत हात घालून सायकलवर बसून आणि स्टुलावर उभं राहून त्या करणारे विविध खेळ तिला आठवत होते...भल्या मोठ्या फुग्याच्या मागें धांवणारा विदूषक आणि त्याच्या पाठोपाठ पळत येण्याचा प्रयत्न करणारा भला मोठा हत्ती, ते मोठ्यानं डरकाळी फोडणारे वाघसिंह, छान छान खेळ खेळणारीं लहानमोटीं माकडं, तंबूच्या छताजवळ उंचावर चकाकणाऱ्या दिव्यांच्या झगझगाटांत इकडून तिकडे झोक्यांवर उड्या टाकणाऱ्या चिनी मुली, त्यांच्याकडे कुतुहलानं माना उंचावून बघणारे प्रेक्षक, सिंहाच्या पाठीवर बसून ' नमस्ते ' म्हणणारा चार पांच वर्षांचा रिंगमास्टरचा मुलगा, हातांत लांब दोरीचा चाबूक घेऊन ऐटींत प्रवेश करणारा रिंगमास्टर, कपाळावर दिवा ठेवून नाच करणारी एक झगझगीत पोषाखाची मुलगी, वगैरे वगैरे...दिव्यांच्या झगझगाटींत, चमकणाऱ्या पोषाखांच्या दिमाखांत आणि मधुर गाण्याच्या तालांत क्षणाक्षणाला आपल्या अद्भुतरम्यतेनं प्रेक्षकांचं भान हिरावून घेणारी ती भव्य नि दिव्य दुनिया कांहीं केल्या माधुरी समोरून हलेना...ह्या अजब दुनियेंतील एकेक भाग तिच्या नजरेसमोरून सरकत होता. माधुरी तीं एकामागून एक सरकणारीं दृश्यें टक लावून बघत होती...

माधुरीचा स्तब्धपणा गोविंदाला आवडला नाहीं म्हणून त्यानं तिला डिवचून विचारलं, " आणखी काय काय आहे तें सांग ना ! '

" आणखी ? आणखी पुष्कळ ! फार मज्जा आहे रे तिथं...थांब हं, मी आमच्या नानासाहेबांना विचारूनच येतें हं एवढ्यांत ! "

माधुरी मोठ्या उत्साहानं नानासाहेबांकडे धांवली. सखूनं आणि गोविंदानं एकमेकांकडे पहात एकदम म्हटलं, " किती छान आहे नाहीं माधुरी ? ".

मुलांचं आणि मोठ्या माणसांचं जग एकच असतं तर किती छान झालं असतं नाहीं का ? आपल्या भोंवतालच्या परिस्थितीचं सारं सारं विस्मरण घडलेलीं सखू आणि गोविंदा माधुरीशीं जेवढ्या आनंदानं हितगुज

करीत होतीं. तेवढ्याच विषण्ण मनानं लक्ष्मी सदानंदाशीं बोलत होती.

त्यावेळीं सकाळचे नऊ वाजून गेले होते. खिडकींतून आंत येणारा सूर्य प्रकाशाचा झोत आणि त्यांतून असंख्य कलाकृति निर्माण करीत मनमुराद बागडणारे हजारों धूलिकण पहात सदानंद सांगत होता,

" ताई एवढ्या दुःखानं तुम्ही अशा धीर सोडायला लागलांत तर माझ्यासारखं कसं निभावं तुम्हांला ? "

" स्त्री आणि पुरूष यांत फार फरक असतो !...बाईच्या यातना तुम्हांला कशा कळाव्यात सदानंद ? "

बाबूरावांच्या आठवणीनं भारावलेलं मन हलकं करीत लक्ष्मी असं म्हणाली तेव्हां सदानंद कांहींशा त्वेषानं म्हणाला, " हेंच तें ! तुम्हां बायकांना आमचीं मनं अजून ठाऊक नाहींत असंच आम्हीं कां म्हणूं नये ? तुम्हांला ठाऊक आहे, माझी बायको परवां दिवशींच वारली हें !"

" काय म्हणतां ? "

" आणि म्हणून तर कालच्या प्रवासांत मी तुमच्याशीं फारसं बोलूं शकलों नाहीं..."

" मग त्यावेळींच कां हें बोललां नाहींत ? "

" तुम्हांला बोलून काय उपयोग होता ? "

" कां ? "

" अगोदरच तुमचं तुम्हांला पुरेसं झालेलं नि त्यांत...शिवाय माझं आपलं ठाम मत झालंय कीं..."

" काय ? कसलं मत म्हणतां ? आपलं दुःख दुसऱ्या कुणाला सांगूंच नये ? "

" होय. नाहींतरी ज्याचीं त्याचीं वैयक्तिक सुखदुःखं हीं ज्याचीं त्यांनींच नसतात कां अनुभवायचीं ? "

" पण एकमेकांना एकमेकांनीं अशावेळीं सांगायचं नाहींतर कधीं मग ? "

" खरं आहे ! "

" आणि एवढं झालं तरी तुमच्या तोंडावर कसा फरक नव्हता हो ? तुमच्या जागीं दुसरा कुणी असता तर..."

"झालं तें झालं! त्याबद्दल वैतागून किंवा डोक्यांत राख कालवून घेऊन कुठं भागत ?...नानासाहेबांचा शिष्य आहें मी. वाटेल ती आपत्ति येऊं दे. मी माझं तोंड कधींच हिरमुसलं होऊं देणार नाहीं..."

बोलतां बोलतां नानासाहेबांचा उल्लेख झाला तेव्हां लक्ष्मी चटकन् म्हणाली,

" मघां त्यांनीं राजाला दवाखान्यांत पाठवायला सांगितलंय ! कुणाच्या दवाखान्यांत हो ? "

" नानासाहेबांच्याच ! डॉक्टर आहेत ते चांगल्यापैकीं ! आणा, मी नेतों राजाला. बाकी रात्रीं माझ्या जवळच्या पिशवींतल्या तात्पुरत्या औषधांचा उपयोग मीं केलाच होता म्हणा. आतां जखम चांगली स्वच्छ करून पट्टी बांधून आणायला हवी...पण तुम्ही चहा घेताय ना आधीं ?"

लक्ष्मीनं सदानंदकडे चमकून पाहिलं. एवढा मोठा दुःखाचा डोंगर त्याच्यावर कोसळला असतांना देखील तो शांत होता ! आणि याच गोष्टीचं तिला मोठं नवल वाटलं ! म्हणून ती म्हणाली, " चहाचं बघूं मग...पण तुम्हांला हें असं जमतं कसं हो ? "

लक्ष्मीचा हा प्रश्न ऐकून सदानंदला हसूं आलं. आजवर त्याला अनेकांनीं हाच प्रश्न विचारला होता आणि त्यावेळींहि तो असाच हंसला होता ! कारण त्याच्यावर अशी ही दुसऱ्यांदां पाळी आली होती. त्याची पहिली बायको पहिल्या बाळंतपणांतच गेल्यामुळं त्या दुःखाचा भार हलका करीत त्यानं आपला एक दिवसाचा श्रीधर हाताच्या झोपाळयांत निजवून वाढवला होता ! एखाद्या आईसारख्या खस्ता काढून त्यानं त्याला आईची उणीव भासूं दिली नव्हती ! आणि ते कष्ट, ते हाल, फार दिवस सोसायला नकोत म्हणून त्यानं पुन्हां लग्न केलं होतं...आणि दुर्दैवानं ह्यावेळीं देखील अगदीं तीच वेळ त्याच्यावर येऊन ठेपली होती...

सदानंद नाहींतरी मोठा धीराचाच माणूस यांत शंका नाहीं. एरव्हीं साध्या माणसाला हें जमणं शक्य नव्हतं ! एकतर नोकरी सांभाळून घरचा

सैंपाक आणि रात्रंदिवस मुलाचं संगोपन करणं हें पुरुषाच्या अवांक्या बाहेरचं काम ! पण सदानंदानं तें हंसतमुखानं केलं होतं आणि दुसरं म्हणजे आवडत्या माणसाच्या वियोगानं व्याकुळ झालेल्या मनाला विरंगुळा म्हणून त्यानं आजवर अनेकदां आपल्या कामाची दिशाहि बदललेली होती. पहिल्यांदा पोस्टखात्यांत असलेली नोकरी सोडून त्यानं टोप्यांचा धंदा सुरू केला होता...त्यानंतर त्यानं औषधाचं दुकान उघडलं होतं... आणि आतां तो शिलाईचं काम करून पोट भरीत नानासाहेबांच्या बालवीराच्या कार्याला स्वतःला वाहून घ्यायचा बेत मनाशी आंखीत होता ! ...

नानासाहेबांचा आणि त्याचा बऱ्याच दिवसांचा गुरुजी या नात्यानं स्नेह असला तरी या तीन चार वर्षांतच तो त्यांच्याकडे विशेष जाऊन येऊन होता. खुद्द पाटीलमळ्यालाच रहायला लागून त्याला नुकतं वर्ष झालेलं. पण तेवढ्या मुदतींत तो अधिक उत्साही झाला होता एवढं खरं. नानासाहेबांच्या सहवासामुळं हंसतमुखानं आलेल्या आपत्तींना तो तोंड द्यायला शिकला होता...त्याच्या मनाची पातळी आतांशीं बरीच वाढलेली असल्यामुळं आयुष्यांत येणाऱ्या दुःखांतून देखील त्यानं सुखाचा शोध लावायचा क्रम सुरू केला होता !...

त्यामुळं सदानंद राजाला घेऊन दवाखान्यांत जाण्यासाठीं म्हणून उठला आणि म्हणाला, " ताई, वाटेल तसल्या आपत्तीशीं टकरा देऊन जगायचं असंच जर एकदां आपण ठरवलं, तर मग हंसतमुखानं जगण्यांतच अधिक आनंद नाहीं का?...आणि मला वाटतं परिस्थितीवर मात करण्याचं सामर्थ्य जितकं कमावितां येईल तितकं कमावण्याचं तुम्ही देखील ठरवायला नको आतां?...बरं मी जाऊं मग ! का तुम्हींहि येतां ?"

त्यावर लक्ष्मी कांहीं बोलणार तोंच माधुरी धांवत धांवत तिथं येत म्हणाली, " गोविंदा, सखूSS अरे चला ! ठरलं बरं काSSS '

• • •

# भावनांचा खेळ

१

त्यावेळीं सूर्यास्ताला अगदीं थोडा वेळ उरलेला होता. पश्चिमेकडील आभाळांत बराच लालसरपणा दिसत होता. अनेक लहान मोठे ढग मावळत्या सूर्याशीं दंगामस्ती करीत असावेत असा दिसणारा तो देखावा खरोखरच भारी मजेदार होता. क्षणाक्षणाला निळया पार्श्वभूमीवर बदलत्या स्वरूपांत दिसणारा ढगांभोंवतालचा तांबूस रंग, मिनिटा-मिनिटाला बदलणारे ढगांचे चित्तवेधक आकार, वाऱ्याच्या दिशेप्रमाणं त्यांचा चाललेला धावपळीचा खेळ, मावळत्या सूर्याला क्षितिजाच्या कुशींत दडी मारायला घाईनं न जाऊं देतां पदोपदीं त्याचं तेज जगाला दिसावं म्हणून बाजूला होतांना उडणारी त्यांची विलक्षण धांदल...वगैरे सारंच कसं मनाभोंवतीं मोहजाळ निर्माण करणारं होतं. विशेषतः क्षणार्धांत हत्तीप्रमाणं तर क्षणार्धांत उंटाप्रमाणं बदलणारा ढगांचा आकार आणि त्या आकाराला उठाव यावा म्हणून कीं काय गडद लालसर रंगाची त्यांना लाभणारी झालर राजेंद्राच्या, माधुरीच्या भावाच्या, दृष्टीला मिनिटामिनिटाला सुखावत होती. त्यामुळं सूर्यास्त झाला तरी एका भल्या मोठ्या शिडीवरच जणुं धांवणारी असंख्य ढगांची रांग बघण्यांत गुंगून गेलेला राजेंद्र जागचा उठेना. तेव्हां माधुरी म्हणाली, " अरे दादा, आज खेळायला नाहीं का जायचं ? मंदिरांतील मुलं आपली वाट पहात असतील ना ? "

" अग पण, हें बघायचं सोडून नाहीं बुवा उठवत आज ! "

खरोखरच त्या निसर्गाच्या अलौकिक रंगरंगोटीनं राजेंद्राला विलक्षण भुरळ पाडली होती. तिथून उठायचं त्याच्या अगदीं जिवावर आलं म्हणून तो असं म्हणाला, तेव्हां माधुरी थोडी रागावली. तिनं त्याच्या दंडाला धरून त्याला तिथून उठवलं. तेव्हां तो म्हणाला, " थांब म्हणतोंय ना थोडं ? "

" आणि तीं आलेलीं मुलं आपली वाट बघत असतील त्याचं काय ? "

" अरे हो, विसरलोंच कीं ! छे, मी तर त्या गोविंदाला फिरायला नेईन म्हणालों होतों ! चलचल. तो बासरी किती छान वाजवतो नाहीं ग ? "

" अगबाई, हो का ? मला रे काय माहीत ? चल आपण त्याला वाजवायला सांगूंया. चल... "

हातांत हात घालून ही बहीण भावंडं देवीच्या देवळाच्या टेकडीवरून खालीं उतरायला आणि गोविंदा आणि सखू त्यांना शोधीत तिथं यायला एकच गांठ पडली. एकमेकांना बघून तीं सगळींजणंच मनमुराद हंसत खेळत मंदिराकडे यायला निघाली. तेव्हां राजेंद्र म्हणाला, " आणि तुमचा राजा ! त्याला आणलं नाहीं तें ! "

" तो बसलाय सदानंद मामांकडे खेळत. " खरं होतं तें गोविंदानं सांगितलं. त्यामुळं कांहींतरी आठवल्यासारखं करून राजेंद्र म्हणाला, " आणि काय रे, तुमचे वडील आले नाहींत ते तुमच्या बरोबर ? कुठं असतात ते ? "

" आमच्या गांवीं. "

" मग तुमच्याबरोबर कां आले नाहींत ? "

" मला काय ठाऊक ! "

" म्हणजे ? तुम्ही त्यांना चला म्हणाला नाहीं ? "

" अंहं ! "

" कां ? आम्ही आमच्या नानासाहेबांना घेतल्याशिवाय कुठंच जात नाहीं."

" हं !..."

" का रे, असा उसासा कां टाकलास ?"

" आमच्याबरोबर ते कधींच येत नाहींत ! " गोविंदा असं बोलून गेला. पण तसं बोलतांना त्याच्या मनाला बऱ्याच यातना होत असल्याचं त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसत होतं...माधुरीला त्याच्या तोंडावरचा हा फरक जाणवला तेव्हां ती म्हणाली, " कां म्हणून येत नाहींत ?"

" आम्हांला काय ठाऊक ?"

" बरं तुम्ही काय म्हणतां सखू त्यांना ? "

" आबा. "

" आणि ते काय करतात तिथं ? "

" मला काय माहीत ? ..."

सखूच्या आणि गोविंदाच्या आपल्या वडिलांबद्दलच्या या अस्पष्ट उल्लेखानं राजेंद्राला फार चमत्कारिक वाटलं, म्हणून तो पुन्हां म्हणाला,

" म्हणजे तुम्ही सगळीं एकाच घरांत रहातानां ? "

" हो ! "

गोविंदानं असं म्हटलं तेव्हां माधुरी म्हणाली, " मग कसं रे तुम्हांला कांहींच माहीत नाहीं ?..."

त्यावर गोविंदानं आणि सखूनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. दोघंहि गुपचुप होतीं....तें ओळखून राजेंद्रानं विषय बदलला. रस्त्यावरचा एक मोठा खडा उचलून आभाळांत उंच टाकीत तो म्हणाला, " आज आपण पत्ते खेळूं या का ? "

खेळाचं नांव निघतांच थोड्यावेळापूर्वी गंभीर झालेला गोविंदा म्हणाला, " हो हो ! पण कशानं खेळायचं ? "

" कशानं म्हणजे ? "

" म्हणजे पांच तीन दोन, लाडिस कीं..."

" हां हां ! असं म्हणतोस होय ? सात हाती खेळूं या. "

राजेंद्राचा हा निर्णय माधुरीला पसंत पडला नाहीं. म्हणून तिनं चटकन् सांगून टाकलं,

" पांच तीन दोनांनींच खेळायचं !...पण...गोविंदा, आधीं तुझी बासरी ऐकवली पाहिजेस ! अंऽ ! मला नाहीं ना बाजवून दाखवलसि ?"

" एवढंच ना ! त्यांत काय? ही घे आत्तां वाजवतों."

खिशांत नेहमींच बासरी ठेवायची गोविंदाला सवय होती. त्यामुळं त्यानं ती चटकन् बाहेर काढून चालतां चालतांच वाजवायला आरंभ केला...बासरीच्या मधुर आवाजांत तल्लीन झालेलीं हीं मुलं जेव्हां बालवीर मंदिरांत येऊन पोहोंचलीं तेंव्हां नानासाहेबांनीं त्यांना विचारलं " कुठं होता एवढा वेळ ? "

दररोज निदान तासभर तरी मुलांनीं खेळलंच पाहिजे असा नानासाहेबांचा शिरस्ता. त्यामुळं खेळायला जायची तयारी दाखवीत माधुरी म्हणाली, " आम्ही खेळून येतों हं ! "

" पण अंधार झालाय ना आता ? "

" मग ? आतां पळापळी खेळतों...नाहींतर दादा, लपंडाव खेळूंया रे पळाऽऽ "

माधुरी खेळायला जायला म्हणून पळाली आणि तिच्या पाठोपाठ गोविंदा आणि सखूहि दौडत निघून गेली. राजेंद्र नानासाहेबांना म्हणाला, " नाना, ह्या मुलांचे वडील कुठं असतात हो ? "

आज ना उद्यां आपलीं मुलं गोविंदाला किंवा सखूला हा प्रश्न विचारतील अशी नानासाहेबांना पक्की खात्री होती. म्हणून ते म्हणाले, " का ? तूं विचारलंस त्या मुलांना तसं ? "

" हो. "

" मग ? "

" पण त्यांनीं प्रत्येक वेळीं आम्हांला काय ठाऊक ? असंच उत्तर दिलं. "

" अस्सं ! बरं पहातों हं मी, सांगेन तुला पुन्हां कधीं तरी. जा खेळ जा आतां..."

नानासाहेबांनीं राजेंद्राची कशीबशी समजूत केली आणि तोहि तिथून निघून गेला. पण त्यांच्या मनाला कांहीं तें पटेना ! कारण मुलांची समजूत पटेपर्यंत मुलांना खरं सांगायचं असा त्यांचा नेहमींचा स्वभाव. पण आज त्यांना तें जमलं नाहीं !...एखादी लग्नाची मिरवणूक रस्त्यावरून निघाली कीं, ती फुलांनीं श्रृंगारलेली मोटर, त्यांत झगझगींत कपडे घालून बसलेली नवरी मुलगी, एकसारखा पोषाख केलेल्या मुलांनीं छान छान गाणीं म्हणत वाजवलेला बँड, दिव्यांच्या उजेडांत पायीं चालणारीं माणसं...वगैरे पाहिलं कीं लहानपणीं माधुरी आपल्या आईला हटकून म्हणायची, “ आई तुझं लग्न कधीं ? ” आणि तें ऐकून पोटभर हंसणारी तिची आई, “ इश्श ! ” करीत तिला चापट मारून बाजूला झाली कीं, नानासाहेब म्हणत, “ आईचं लग्न झालंय बाळ !...हा बघ फोटो ” आणि मग त्यांचा लग्नांतला फोटो दाखवून तिची समजूत ते घालीत ! तेव्हां कुठं ती गप्प बसे...नानासाहेब प्रत्येक प्रश्नाचं उत्तर मुलांना पटेल असंच देण्याबद्दल काळजी घेत. त्यामुळं त्यांचीं मुलंहि खुषींत असत...आणि ही संवय त्यांच्या मनाला लागल्यामुळं नानासाहेबांनीं आज असं कां उत्तर द्यावं हें राजेंद्राला कळेना !...कांहींशा शंकाग्रस्त मनानंच तो तिथून निघून गेला होता. त्यामुळं नानासाहेबांना उगीचच चुटपूट लागून राहिली होती.

नवऱ्याचं घरांत लक्ष नाहीं आणि त्यानं आपल्या मनाला येईल तसं वागतांना सारं घरदार धुऊन टाकलं, या सबबीवर लक्ष्मीनं घर सोडून यायचं धाडस कसं काय केलं, याचं नानासाहेबांना राहून राहून आश्चर्य वाटत होतं. म्हणून त्यांनीं सदानंदला हांक मारून विचारलं, “ केवळ तेवढ्यासाठीं त्यांनीं घर सोडलं म्हणतोस ? ”

“होय,” लक्ष्मीच्या घरची स्थिति नजरेसमोर आणीत सदानंदनं असं उत्तर दिलं. पण नानासाहेबांना सविस्तर माहिती हवी होती म्हणून ते म्हणाले, “मला वाटतं बायकांनीं इतक्या घाईनं असा निर्णय घेणं बरं नव्हे ! संसारांत राहून नवऱ्याला ताळ्यावर आणायचं हा खरा मार्ग.

अशा घर सोडण्यानं मला वाटतं कीं, कुटुंबसंस्थेचं भवितव्य फार धोक्यांत येतंय ! "

" शक्य आहे ! "

" काय ? "

" तुम्ही म्हणतां तें. "

" म्हणजे तुला हा मार्ग पसंत आहे तर ? "

" तसं नव्हे, ताईची एकंदर स्थिति ध्यानांत घेतली म्हणजे त्यांनीं केलं तें योग्यच वाटतं मला !

" म्हणजे कसं म्हणतोस ? "

" मला जें माहीत आहे त्यावरून मी असं म्हणेन कीं, नवऱ्याचा बेसुमार मार खात आणि उघड्या डोळ्यांनीं संसाराचं वरचेवर दिसणारं वेडंवाकडं स्वरूप पहात बसून, पोटासाठीं हातांत झोळी घ्यायची वेळ आली तरीसुद्धां हा मार्ग पत्करूं नये ? मुलाबाळांचं संगोपन करणं हेंच तर आईचं काम नव्हे का ? मग......चुकलं कां ताईचं असं वागण्यांत ? "

सदानंद तरी वयानं असा कुठं फार मोठा होता ? सत्तावीस अठ्ठावीस वर्षांचं त्याचं वय ! त्यामुळं त्याला जो जगाचा अनुभव आला होता तेवढ्यावर त्यानं केलेली ही मीमांसा ऐकून नानासाहेब म्हणाले, " बच्चा आहेस तूं अजून ! सदानंद, बाईनं असं एकटं दुकटं मुलं घेऊन रस्ता दिसेल तिकडे जाणं खरं नव्हे...उद्यां कांहीं भलताच प्रसंग आला तर त्याला कोण जबाबदार ? "

तेवढ्यांत फिरत फिरत लक्ष्मीच तिथवर आल्यामुळं नानासाहेबांनीं त्या विषयाला मुरड घातली. तोंडावरचा गंभीरपणा कमी करून ते हंसले आणि लक्ष्मीला म्हणाले, "ठीक आहे ना राजाचं आज ? "

" पुष्कळ बरं आहे. दुपारीं चांगला झोपला होता. "

" ठीक. आतां एकदोन दिवसांत जखम चांगली बरी होईल... तुमच्या घरीं पत्र टाकलंत ? "

" हो मघांशींच टाकलं. पण..."

" काय ? "

" माझ्या माहेरींच टाकलं मी पत्र. आणि तेंहि केवळ मी कुठंतरी सुखरूप आहे हें आईला कळावं म्हणून ! ...कांहीं झालं तरी ह्यांना माझा पत्ता लागतां कामा नये असं वाटतं नि मग..."

" हें पहा, खुद्द बाबूराव जरी इथं आले तरी त्यांना तिथल्यासारखं वागून चालणार नाहीं ! तेव्हां त्या बाबतींत तुम्ही निर्धास्त असा. "

" तें मला कळतं. पण त्यांना जर कां मी घर सोडून आल्याचं कळलं आणि त्यांनीं मला इथं पाहिली तर मात्र माझं एक हाड देखील ठिकाणावर रहायचं नाहीं !...शिवाय तुमच्या या गेस्ट हाऊसमध्यें राहून तुम्हांला माझ्यापासून कसलाहि त्रास होऊं नये अशी माझी मनापासूनची इच्छा आहे. "

" छे छे ! हें काय भलतंच ! आम्हांला कसला त्रास आलाय त्यांत? तसं तुम्ही बिलकुल मनांत आणूं नका. "

घरीं जाण्यापूर्वी एका रोग्याला पाहायचं होतं म्हणून नानासाहेब असं म्हणत गडबडीनं तिथून निघून गेले. त्यामुळं लक्ष्मी सदानंदाला म्हणाली,

" माझ्यासाठीं एक खोली पहायला हवी आतां. "

बालवीर मंदिरांत एक खोली पाहुण्यासाठीं म्हणून कायमची ठेवण्यांत आली होती. तिथं गेले चारसहा दिवस लक्ष्मीनं काढले होते. पण आतां मात्र तिला तिथं रहायचं जिवावर आलं होतं...कुणाचाहि आधार न घेतां स्वतःच्या पायावर उभं राहून तिला जगायला हवं होतं, आणि त्यासाठीं तूर्त कशीदा काढून चार पैसे मिळवितां आले तर ती पहाणार होती...लक्ष्मीला लहानपणापासून कशीदा चांगला येत असे. त्याच गोष्टीचा तिला आतां फायदा घ्यायचा होता...

लक्ष्मीनं एवढ्यांत कुठं एकटीनं राहूं नये अशी सदानंदची इच्छा होती. म्हणून तो म्हणाला, " बघूं उद्यां परवा. नानासाहेबांना विचारीन मी....पण इथं कांहीं अडचण तर वाटत नाहीं ना ? मग कां घाई ? "

त्यावेळीं बराच अंधार पडला असल्यामुळं सदानंदानं तो विषय तिथंच संपवला. राजा खोलींत एकटाच झोपला होता म्हणून लक्ष्मीहि चटकन् खोलीकडे वळली.

रात्रीं झोपतेवेळीं अंगावरचं पांघरुण नीट घेत गोविंदा लक्ष्मीला म्हणाला, " आई, राजेंद्रानं मला दोन चारदां विचारलं कीं, तुझे वडील कां आले नाहींत ? ते काय करतात ? कुठं असतात ?..."

लक्ष्मीला मनापासून नको होता तो प्रसंग एवढ्या लौकर उद्भवल्यामुळं ती कमालीची अस्वस्थ झाली. त्यामुळं तिच्या सर्वांगांतून एक जोराची चमक निघाल्याचा तिला भास झाला...तिचं सर्वांग घामानं थबथबून गेलं...छातींत उगाचच लकलकूं लागलं...घसा कोरडा झाला...गोविंदानं त्या मुलांना काय काय सांगितलं असेल या भीतीनं तिनं साशंकतेनंच आपल्या ओठावरून जीभ फिरविली; आणि जीव मुठींत धरून एखाद्या भयंकर प्रसंगाला तोंड द्यावं त्याप्रमाणं श्वास रोखून तिनं त्याला विचारलं, " मग तूं काय म्हणालास ? "

● ● ●

# दोन ध्रुव १०

" तुमचं हें सैंपाकघर बाकी फारच छान आहे हं निर्मलाताई. "

नानासाहेबांच्या घरांतील सैंपाकघराकडे कुतुहलानं पहात लक्ष्मीनं जेव्हां नानासाहेबांच्या पत्नि निर्मलाबाई यांना असं म्हटलं तेव्हां त्या हंसून म्हणाल्या, " तुम्हीच तेवढ्या भेटल्या हं असं म्हणणाऱ्या ! "

" कां खोटं का म्हणतेंय मी तसं ? "

" अंहं ! आमचे हे ज्याला त्याला सांगतात कीं, हिचा सारा वेळ सैंपाकघरांतच जातो म्हणून. संसाराचा हिला भारी आटाट ! कांहीं लिहावं, वाचावं, कुठं जावं, यावं, तें कांहीं नाहीं ! जेव्हां बघावं तेव्हां चुलीशीं ! जसं कांहीं सैंपाकघराशींच हिचं लग्न लागलंय !...विचारा हवं तर त्यांना तोंडावर. काय हो, खरं आहे ना मी सांगतेय तें ? "

दुपारचं जेवण आटोपून नानासाहेब नुकतेंच वर्तमानपत्र चाळीत बसले होते. त्यांनीं निर्मलाबाईचं बोलणं ऐकूनं न ऐकल्यासारखंच केलं. त्यामुळं त्यांनीं नानासाहेबांना पुन्हां हांक मारून म्हटलं, " ऐकलंत का? तेव्हां सैंपाकघराकडे वळून नानासाहेब म्हणाले, " काय ?...तुझ्या सैंपाकघराचं कौतुक चालवलं असशील !...हेंच कीं नाहीं ? "

" घ्या ! ऐका तुम्हीच म्हणजे झालं...आणि तसंच पाहिलं तर तुमचं तरी त्या बालवीर मंदिरांत एकसारखं काय हो ठेवलेलं असतं ? "

बालवीरमंदिर म्हणजे नानासाहेबांचा जीव कीं प्राण होऊन बसलेलं! आपल्या अंगांत असेल नसेल तें सारं त्या कार्याला खर्ची पडावं अशीच त्यांची इच्छा. त्यामुळं बालवीरमंदिराचं नांव निघतांच ते उठून सैंपाघरांत आले आणि म्हणाले, " तिथं काय नाहीं तें सांग, म्हणजे काय असतं तें सांगतों. "

" आणि इथं जेवल्याशिवाय तिथं काहींच करायचा जोर येत नाहीं त्याचं कांहींच कां नाहीं ? अहो, आधीं जेवाल तरच काम करायला ताकद येईल ना ?...मी वेळेवर खायला घातलं नाहींतर बघूंया बरं कसं होतंय तें ? "

" ओहोहो ! आमचा आम्हांला सैंपाक येतोय म्हणून बरं ! नाहींतर ही किती बोलली असती..."

" आणि तें तुम्ही ऐकून घेणार !...मग उजाडलंच ! "

एवढं म्हणून निर्मलाबाई जेव्हां हंसल्या तेव्हां नानासाहेब त्यांना म्हणाले, " बरं का ग, आतांशीं आमची बाग फारच छान झालीय हं ! अगदीं जिथल्या तिथं ए वन् आहे सारं..."

" म्हणजे ? कुणी नवीन माळी आणलात कीं काय ? "

" अंहं ! हें सारं यांचं काम. "

नानासाहेबांनीं लक्ष्मीच्या कामाचा असा उल्लेख करतांच ती खालीं मान घालून म्हणाली,

" नाहीं हो निर्मलताई ! त्यांचं काय ऐकताय. "

" नाहीं कसं ? मारे रोज उठल्याबरोबर उजाडायच्या आंत सगळ्या बागेंतील केरकचरा साफसूफ झालेला, तणाचं कुठं नांव नाहीं, सगळीं फुलझाडं पाणी घातल्यानं अगदीं टवटवीत ! ...हें काय आपोआप होतंय असं तुमचं म्हणणं ? "

आपण कांहीं तरी उद्योग केल्याशिवाय कुणाचं फुकटचं खायचं नाहीं असं लक्ष्मीनं मनाशीं पक्कं ठरवलं होतं. म्हणून कुणाला न कळत ती बालवीर मंदिरांतील हें काम करीत होती. नानासाहेबांच्या तें ध्यानांत आलं होतं. पण त्याबद्दल अजून ते तिला बोलले नव्हते. म्हणून

लक्ष्मीच म्हणाली, "मग काय नुसतं बसून राहूं कीं काय? मला नाहीं बाई चैन पडत...शिवाय लहानपणापासून मला हें बागेचं नि फुलांचं भारी वेड आहे. पण मला दुर्दैवानं तशी संधि कधींच मिळाली नाहीं."

"छान! असलं वेड कांहीं वाईट नाहीं. पण तें तुम्ही आमच्या बागेंत मात्र आतां एथून पुढं उपयोगांत आणतां कामा नये."

"कां?"

"तुम्ही आमच्या पाहुण्या! पाहुणे कुठं काम करतात वाटतं?"

"अहो पण तें किती दिवस? ऊस गोड लागला म्हणून मुळासकट का खायचा?"

लक्ष्मीनं असं म्हटलं तेव्हां नानासाहेबांना पुष्टि द्यावी म्हणून निर्मलाबाई म्हणाल्या, "अहो ह्या इथं घरीं आल्या ना तरी कुठं भाजी निवड, तांदूळ निवड, पोळया लाट असं कांहीं ना कांहीं त्यांचं चालूंच असतं बघा...पण..." आणि एकदम त्या बोलतां बोलतां थांबल्या. लक्ष्मीला संसाराची, टापटिपीची, विशेष हौस आहे असं कांहीं तरी त्या आतां यापुढं बोलणार हें ओळखतांच नानासाहेबांनीं तसं त्यांनीं बोलूं नये म्हणून डोळ्यांनीं खूण केली. त्यामुळं त्या थांबल्या. पण लक्ष्मीच्या तें नेमकं असं ध्यानांत आलं नाहीं. म्हणून ती म्हणाली, "आतां उद्यांपासून मी नव्या जागीं जाईन रहायला. सदानंदांनीं कालच खोली पाहिलीय म्हणे. सकाळीं ते म्हणाले तसं. तुम्हांला बोलले असतीलच."

खोलीचं नांव उच्चारलं जातांक्षणींच लक्ष्मीनं पुन्हां सैंपाकघरांत नजर टाकली. ती सारी खोली लखलख दिसत होती...भिंतीवरील खुंट्यावर ठेवलेल्या सागवानी फळ्यांवर मोठमोठीं भांडीं पालथीं घातलेलीं दिसत होतीं. भिंतींतल्या कपाटांत पितळेचे डबे रांगेंत बसले होते. चुली शेजारच्या जाळीच्या कपाटांत लहानमोठया पण स्वच्छ अशा दुधा तुपाच्या बरण्या होत्या. त्यांच्या शेजारीं एका सिमेंटच्या उंच कट्टयावर शेगड्या रोवल्या होत्या आणि तिथं उभं राहून सैंपाक करायची त्यांची पद्धत

होती. कोळसा किंवा सरपण ठेवायची व्यवस्था देखील त्या कट्टयाच्या मध्यावर पोकळी ठेवून करण्यांत आली होती; आणि शिवाय सैंपाक करतेवेळीं सांडणारं पाणी जाण्याची व्यवस्थाहि त्या कट्टयावरच अगदीं छानपैकीं केलेली दिसत होती. त्याच्या उजव्या बाजूला एक छोटं देवघर होतं. त्यांत देवांच्या आसपास चकचकीत भांडीं दिसत होतीं... देवघराच्या उजव्या बाजूला दहाबारा रंगीत पाट एका ओळींत उभे केले होते; आणि त्याच्या वरच्या बाजूच्या शेल्फमध्यें स्वच्छ घासून ठेवलेलीं सैंपाकाला लागणारीं भांडीं होतीं. शिवाय ताटं, वाट्या, पाणी प्यायचीं भांडीं हीं देखील जिथल्या तिथं अगदीं थाटांत बसावींत तशीं दिसत होतीं. सैंपाकाच्या कट्टयाशेजारीं डाव्या बाजूला असलेली मोरी आणि पाण्याचं पीपदेखील अगदीं स्वच्छ दिसत होतं...पोळपाटाच्या आकराचा गोल पाटा नि त्यावरचा जाडजूड वरवंटा, लोखंडाचा छानसा खलबत्ता, पोळपाट लाटणं, पिठाचे डबे वगैरे सर्व अगदीं काळजीपूर्वक ठेवलेलं होतं...आणि मुख्य म्हणजे सैंपाकघरांतील पायाखालची फरशी रोजच्या रोज धुतली गेल्यानं आरशासारखी लख्ख दिसत होती...

तिथं वावरणाऱ्या प्रत्येक माणसाचं मन प्रसन्न राहील अशी ही सैंपाकघराची मांडणी बघून आपलंहि सैंपाकघर असंच असावं असा मोह लक्ष्मीला होणं अगदीं स्वाभाविक होतं. पण त्या मोहाला मुरड घालून ती जेव्हां नानासाहेबांना म्हणाली, " आतां मात्र कांहीं तरी उद्योग खरंच करायला हवा मला. त्याशिवाय..." तेव्हां निर्मलाबाई म्हणाल्या, " मला वाटतं तुम्ही तें तुमचं कशीद्याचंच काम चालू ठेवा. त्यांत तुम्हाला काहीं मिळेल अशी मी व्यवस्था करीन. उगाच नसतं कांहीं करायला जाल तर..."

त्यावर नानासाहेब हंसले आणि म्हणाले, " मला वाटलं तूं आतां कांहीं..."

" सैंपाकघराचंच बोलीन नाहीं का ? "

" हो. त्यांतच तुझा सारा उत्साह तूं खपवून टाकतेस म्हणून शंका आली ! "

" चला, कांहींतरीच तुमचं ! "

तेवढ्यांत दारावरची घंटा वाजवल्यामुळं नानासाहेब निघून गेले.

सैपाकघरांतील सारी आवराआवर करून निर्मलाबाई म्हणाल्या, " ह्यांचं हें असंच !...घरांतलं कांहीं बघायला त्यांना वेळच नसतो बघा. चोवीस तास बाहेर असतात म्हटलं तरी चालेल...पण त्यांचं सारं पाहिलं म्हणजे मग मात्र मन शांत होतं बघा. घरचं मेलं न का बघेनात ! मागें त्या ॲनीबेझंट येऊन गेल्या ना, तेव्हां त्यांना फार आवडलं ह्यांचं काम. चांगलीं बारा तेराशें मुलं एकत्र येऊन त्यांनीं वेगवेगळे खेळ केले. त्यांची ती सांघिक कवाईत, गाणीं, खेळ, रात्रीं आगटीच्या भोंवतालच्या गप्पा, निरोप पोंचविणं...आणि हें सारं करतांना रोमारोमांतून उठून दिसणारा त्या सर्वांचा उत्साह बघून त्या बाईनीं अक्षरशः यांची पाठ थोपटली बघा...तेव्हां काय वाटलं तें काय सांगू !...त्यावेळचं तें त्यांचं वैभव बघून आत्ताच्या आत्तां डोळे झाकले तर सुखानं जीव जाईल एवढा आनंद झाला मनाला...आणि काय हो त्या बाई तरी ! खालीं खाकी साडी, हातांत छत्री आणि डोक्यावर सुंदर फेटा बांधलेला !...छे छे ! फारच सुंदर दिसायच्या त्या..."

निर्मलाबाई नानासाहेबांचं कौतुक करीत होत्या. त्यांच्या कामाचं त्या उत्साहानं वर्णन करीत होत्या. पण लक्ष्मीचं तिकडे लक्ष नव्हतं, बाबूरावांची ती मारहाण आणि तें तुसडेपणाचं वागणं आठवल्यानं तिचं सर्वांग शहारून गेलं होतं. विशेषतः राजाच्यावेळीं ती गरोदर असतांना बाबूरावांनीं तिच्या अंगावर स्टूल फेकलेला तो प्रसंग आठवतांक्षणींच तर तिला भोंवळ आल्यासारखी झाली...त्यावेळीं बाबूरावांच्या संतापामुळं अकस्मात् उद्भवलेला तो प्रसंग ! प्रत्यक्ष मृत्यूशीं झुंज खेळायला तयार झालेली त्यावेळची ती लक्ष्मी !...त्यावेळीं तिला सोसाव्या लागणाऱ्या त्या यातना, ती भयंकर हालअपेष्टा, मुलांचीं तीं केविलवाणीं तोंडं, राधाकाकूंची ती ऐनवेळची माया...आणि तें तिचं येते वेळचं घर...

आपल्या घरचं तें आयुष्य आठवून लक्ष्मीचं तोंड उतरलं. कडक थंडीमुळं पाणी गोठावं तशी तिची अवस्था झाली. नानासाहेबांचा

खेळीमेळीचा संसार आणि आपला संसार...छे, संसार कसला तो! लक्ष्मीला तर ती कल्पना देखील सहन करवेना...दोन्ही हातांची घट्ट मिठी तोंडाभोंवती घालून ती खालीं वांकणार इतक्यांत बाहेरच्या खोलींतून चाळांचा आवाज आला.

लक्ष्मीनं मोठया उत्सुकतेनं बाहेर डोकावून पाहिलं तेव्हां निर्मलाबाई म्हणाल्या, " माधुरी नाचून दाखवतेय वाटतं मुलांना. चला बघूंया आपण पण. "

लक्ष्मी निर्मलाबाईच्या बरोबर बाहेरच्या खोलींत आली. त्यावेळीं पायांत चाळ बांधलेल्या माधुरीच्या पायांतून " ता थै थैतत्, आ थै थैतत् " हा सुरवातीचा तत्कार उमटत होता. राजेंद्र तिला तबल्याची सांथ करीत होता आणि गोविंदा व सखू चंबूसारखं तोंड करून त्या दोघांकडं पहात होतीं! सखूच्या मांडीवरचा राजा त्या सर्वांकडे आळीपाळीनं पहात उगाच्च टाळया वाजवीत होता.

क्षणाक्षणाला तालबद्ध नृत्य करीत असतांना माधुरीच्या अंगाची होणारी हालचाल बघून तिच्याकडे कौतुकानं पहात निर्मलाबाई म्हणाल्या, "हिच्या शाळेंतल्या बाईनीं बक्षीस समारंभासाठीं हिला हे शिकवलं होतं. तेव्हांपासून केव्हां केव्हां दाखवते करून...आतां की नाहीं जमलं तर तिला मी दिलरुबा वाजवायला शिकविणार आहें. मुलांच्या अंगांत कोणती तरी कला हवीच कीं! "

बिचारी लक्ष्मी यावर काय बोलणार! चार आण्यांचा खाऊ देखील जिला मुलांना देतां आला नाहीं ती असली कला कोठून शिकविणार? आणि तिच्या डोक्यांत ते विचार तरी यावेत कुठून?...लग्नानंतरचं तिचं आयुष्य म्हणजे मीठभाकर खाऊ घालून मुलांना वाढविण्यांत गेलेलं!...तिच्या जीवनांत कलेची फारकतच झाली होती म्हणायला हरकत नाहीं. पण कांहीं झालं तरी आपल्या घरची स्थिति मुलांनीं, प्रसंगानं जाणवली तरी कुणाला बोलून दाखवूं नये असं तिला मनापासून वाटे...बाकी लक्ष्मीला स्वतःला मात्र लहानपणीं पुष्कळसं शिकायला मिळालं होतं. अर्थात् खेड्याच्या मानानं तिच्या शिक्षणाकडे

पाहिलं म्हणजे कशीदा काढणं, चोळीपरकर शिवणं, बिहिरींत पोहणं, वळणदार मोडी अक्षर काढणं, निरनिराळीं लोकगीतं सुरेल चालीवर तोंडपाठ म्हणणं वगैरे तिला पुष्कळच येत होतं असं म्हणायला हरकत नाहीं.

माधुरीचं नृत्य संपल्याबरोबर निर्मलाबाई पुन्हां म्हणाल्या, "आमच्या ह्यांनाच भारी हौस आहे. मुलं म्हणतील तें शिकवायला ते तयार असतात. परवां हिनं नवा खेळ पाहिजे म्हणून हट्ट धरला ना तेव्हां पुष्कळसे रंगीत ठोकळे ह्यांनीं आणून दिले. त्याच्याबरोबर एक चित्रहि आणलंय. आतां त्या चित्राप्रमाणं वेगवेगळी डिझाईन्स करतात हीं दोघं. फार छान दिसतं बघा तें... "

निर्मलाबाईचं बोलणं संपतांच गोविंदा हिरमुसलं तोंड करीत म्हणाला, "आमच्या घरांत असलं कांहींच नसतं! ...आपला माझा मीच बासरी शिकलों. पण आमच्या आबांना त्याचं कांहींच वाटलं नाहीं! आई मात्र सारखी धडपडते... "

हें ऐकून विजेचा झटका बसावा तशी लक्ष्मी चमकली. आपल्या आणि निर्मलाबाईच्या घरांतील ही दोन ध्रुवांइतकी तफावत जाणवून गोविंदानं उच्चारलेले हे शब्द तिच्या काळजाला जाऊन भिडले. तिला जें नको होतं तेंच नेमकं पुढ्यांत आल्यामुळं ती भांबावून गेली. त्यामुळं आणखी कांहीं मुलांच्या तोंडचं ऐकण्यापेक्षां तिथून उठलेलं बरं म्हणून काबऱ्या बावऱ्या नजरेनं इकडे तिकडे पहात ती गोविंदाला गडबडीनं म्हणाली, "चला जाऊं या. झोपूं दे यांना आतां. "



## —कां झालं असं ? ११

" कुहूऽऽऽ " कोकिळेनं साद घातला. दाही दिशा उजळल्या गेल्या. उंच उंच वृक्षांनीं आपल्या माना उंचावून उगवत्या सूर्यनारायणाला प्रणाम केला. बागेंतल्या फुलांनीं हंसतमुखानं एकमेकांकडे पहात आपला सुगंध दरवळला. आडावरचे रहाट खडाड्...खट्...करून कामाला लागले. धुराड्यांतला धूर हवेंत पसरूं लागला...सारी सृष्टि आळस झाडून टाकून कामाला लागली.

नुकत्याच उगवलेल्या सूर्यनारायणाला राधाकाकूंनीं तुळशीवृंदावना-पासूनच नमस्कार केला. आणि पूजेचं सामान घेऊन त्या घरांत निघाल्या. एकदोन पावलं त्यांनीं टाकलीं असतील नसतील इतक्यांत बाहेरचा दरवाजा धाडकन् वाजल्याचा आवाज आणि त्याच्या पाठोपाठ ' काकूबाईऽऽ ' अशी हांक त्यांच्या कानावर आली. त्यामुळं गडबडीनं पदर सावरीत त्या बाहेर आल्या तों दारांत बाबूराव उभे !... राधाकाकूंनीं त्यांना कांहींशा तिरस्कारानं विचारलं, " कां ?... आज हिकडं कुणीकडं ? "

एकाच हातावर लोंबकळत ठेवलेला कोट काढून हातावर घेत बाबूराव म्हणाले, " आमची ही आलीय ना इकडे ? "

" कोण लक्ष्मी ? "

" हं ! आणि मुलं कुठं गेलीं ? "

" हिकडं कशाला येतील एवढ्या रामपाऱ्यांत ! "

" अरेच्या ! मग कुठं गेलीत सगळीच एवढ्या लौकर ? मला वाटलं तुमच्याकडेच आली असेल आणि म्हणून सरळ इकडेच आलों."

" अस्सं ! "

" बरं, तुम्हांला सांगून तरी गेलीय् का ती ? "

" ह्ये बगा ! मलाव कशाला सांगून जाईल ? मी काय सासू हाय व्हय तिची ? " असं म्हणून राधाकाकूंनीं बाबूरावांना आंत येऊन बसायची हातानंच खूण केली. तेव्हां आंत येऊन बसत ते म्हणाले, "पण तुम्हांला सांगते ना ती नेहमीं ? "

" का ? काम हुतं वाटतं काय ? "

" म्हणजे ? मला नाहीं समजला याचा अर्थ ! "

" कशाला कळल ! लई दिस इसूर पडल्यावर..."

बाबूराव एकदम उसळले आणि उठून जात त्यांनीं तोंड सोडलं, " हा प्रश्न अगदीं खाजगी आहे. तुम्हाला त्यांत लक्ष घालायचं कारण ? ती कुठं आहे तेवढं फक्त सांगा. बाकीचं कांहीं एक नकोय मला. "

राधाकाकूंनीं आपला शांतपणा सोडला नाहीं. जणूं काय कांहींच झालं नाहीं अशा थाटांत त्या म्हणाल्या, " मला ठावं हाय का काय तवा सांगूं ती कुठाय म्हन ! "

" खरं म्हणतां ? "

" मग काय खोटं सांगतीया ? "

त्यावर बाबूराव थोडे शांत होऊन म्हणाले, "...बरं पण ती माहेरीं गेली होती ती आलीय का ? "

" मलाव काय इच्यारतां ? तिनं कारीट लावलं असल कीं तुमाला !"

" बराय, जातों मी. "

बाबूराव पाय आपटीत निघाले तेव्हां राधाकाकू त्यांना मोठ्यानं हांक मारून म्हणाल्या,

" च्या घेऊन जावा कीं ! "

कांहींतरी आठवल्यामुळं पुढं निघाले होते ते बाबूराव चार पावलं मागें आले आणि म्हणाले, " किल्ली तरी ठेवलीय कां ? "

" का ? कुलुपबिलुप हाय व्हय घराला ? "

" हं ! म्हणून तर..."

चहाचा कप बाबूरावांच्यासमोर ठेवल्यावर उपरोधानं त्यांच्याकडे पहात राधाकाकू म्हणाल्या, " त्या दिवशीं घर बदललया म्हन सांगून तुमीच कुलूप लावलंसा आन् माज्याजवळ कुटली किल्ली ? "

त्यावर उत्तर न देतां बाबूराव तिथून निघाले ते सरळ आपल्या घराकडे आले. तों घराचं दार उघडं ! त्यामुळं " आली वाटतं ! " असं म्हणत ते नेहमींप्रमाणं सरळ घरांत घुसले पण...

" कोण तुम्ही ? कुणाकडे आलात ? काय काम आहे ? आणि लाज नाहीं वाटत असं एकाएकीं दुसऱ्याच्या घरांत शिरतांना ?..."

कुणीतरी अनोळखी बाईनं बाबूरावांना बघून असं तोंड सोडलं. तिला बघून बाबूराव बावचळले. साऱ्या घरभर त्यांनीं नजर टाकली. तिथं सगळं सामान दुसऱ्याचंच होतं ! त्यामुळं थोडंसं ओशाळूनच त्यांनीं त्या बाईला म्हटलं, "म्हणजे ?...तुम्ही कुणी पाहुण्या आलात आमच्याकडे ?"

" तुमच्याकडे ? कोण तुम्ही ? "

" हें घर माझं आहे ! आणि मलाच बर विचारतां तुम्ही कोण म्हणून ! छान ! ! शुद्धीवर अहांत कां नाहीं ?..."

बेडरपणानं बाबूरावांनीं केलेल्या या विलक्षण विधानानं ती बाई खवळली. रागानं लालबुंद होत ती ओरडली, " चालते व्हा अगोदर !...माझी शुद्ध काढतोय मेला"...आणि जेव्हां ती बाबूरावांच्या अंगावर धांवली तेव्हां तिथून न हालतां ते म्हणाले, " तुम्ही काय समजतां स्वतःला ? "

" जातोस कीं बोलवूं पोलीसाला !...अहो, धावाऽऽ धावाऽऽ "

त्या बाईच्या त्या चमत्कारिक ओरडण्यानं बाबूराव 'अरे बापरे !' करीत तिथून बाजूला झाले. चार माणसांत भलती शोभा व्हायला नको म्हणून त्यांनीं आपला राग आवरला आणि शेजारीं चौकशी केली...

त्यांच्या जागेंत दुसरं बिऱ्हाड आल्याचं जेव्हां बाबूरावना समजलं तेव्हां ते तावातावानं घरमालकाकडे जाऊन म्हणाले, "माझ्या परस्पर दुसरं बिऱ्हाड माझ्या घरांत कसं आलं?...मला न विचारतां ?...काय समजतां तुम्ही स्वतःला ?..."

घरमालकाला बाबूरावांच्या स्वभावाची कल्पना होती. म्हणून त्यांनीं बाबूरावांची बडबड शांतपणें ऐकून घेतली आणि मग म्हटलं, "तुमच्या बायकोनं स्वतःच तुम्ही घर सोडल्याचं सांगितलं आणि त्यामुळं..."

बाबूराव बायकोचं नांव निघतांच पुन्हां भडकले....घरमालकाला पुरतं बोलूं देण्यापूर्वींच ते संतापून म्हणाले, "काय म्हणालात ? माझ्या बायकोनं सांगितलं म्हणून ? तिला काय अधिकार तसं सांगायचा ? ती कोण ? आणि मी जिवंत असतांना तुम्ही तिचं ऐकलंत !...मला विचारणं तुमचं कर्तव्य होतं कीं नाहीं ?..."

"अहो, पण नाहीं कोण म्हणतो !"

"मग ?"

"पण तुम्हाला विचारायचं म्हणजे तुम्ही इथं असायला तरी हवं, कीं नको ? कीं..."

"मग कुठं होतों मी ?"

"तें ठाऊक असतं तर ती बिचारी पोरंबाळं घेऊन कशाला गेली असती हें सारं सोडून ?..."

"काय ? ती आली होती ? केव्हां ? आणि कुठं गेली ?...असं कसं झालं ?..."

कमालीचं आश्चर्य वाटून बाबूरावांनीं केलेली ही प्रश्नांची सरबत्ती ऐकीत असतांना घरमालक गंभीर झाले. कांहींशा बेफिकीरीनंच त्यांनीं सांगितलं, "यापैकीं कोणत्याच प्रश्नाचं उत्तर मला देतां येणार नाहीं ! ..."

"काय म्हणून ?"

"हा माझा प्रश्न आहे...मला वाटतं आतां तुम्ही जाऊं शकता !"

बाबूरावांना हा अपमान असह्य झाला. शत्रूवर त्वेषानं चाल करून जाणाऱ्या सैनिकाच्या रोषानं घरमालकाकडे पहात " ठीक आहे ! बघून घेईन ! " असं म्हणत ते घराबाहेर पडले...

पाय नेतील तिकडे बाबूराव रस्त्यानं निघाले. सारं जग आपला रोजचा नियम सोडून उलट्या दिशेनं जात असल्याचा त्यांना भास झाला...

" लक्ष्मी घर सोडून गेली ! कुणाला विचारून ?... कुणाला विचारून गेली ती ?... " बाबूराव या प्रश्नांची उत्तरं मिळवीत निघाले होते... संतापानं त्यांचे डोळे लाल लाल झाले ! रागानं त्यांचे ओठ थरथरत होते. अपमानानं अंगाची लाही होत होती. पश्चात्तापानं डोकं सुन्न झालं होतं...बायको घर सोडून गेली या कल्पनेनं सारं जग त्याच्याभोंवतीं रिंगण घालीत होतं...

साऱ्या गांवभर ओळखीच्या ठिकाणीं फिरून बाबूरावांनीं चौकशी केली. पण कुणी तोंडांतून ' अ ' देखील काढला नाहीं. सर्वांनीं कानावर हात ठेवून त्यांना पुढचा मार्ग दाखविला. त्यामुळं बाबूरावांनीं सासूसासऱ्याकडे जाऊन याचा जबाब विचारावा म्हणून स्टेशनचा रस्ता धरला. पण...तिकीट काढायला त्याच्या जेव्हां त्यांनीं खिशांत हात घातला तेव्हां त्यांना कळून चुकलं कीं, त्यांच्या खिशांत फुटकी कवडीदेखील नव्हती !...मग जायचं कसं ?

जवळची पैन् पै नाहींशी होईपर्यंत बाबूराव सुंदरीच्या महालांत बेहोष होऊन गेले होते. एक प्रकारच्या विलक्षण धुंदीनं गुरफटलेलं त्यांचं मन सुंदरीखेरीज दुसऱ्या जगांत पाऊल टाकायला तयार नव्हतं !...ते आणि सुंदरी ! बस्स ! एवढंच त्यांचं जग आहे असाच त्यावेळीं त्यांचा समज झालेला होता...

...पण ज्या दिवशीं त्यांचा खिसा रिकामा झाला त्या दिवशीं सुंदरीनं त्यांना बजावलं, " आतां तुमचं काम संपलं ! पुन्हां माझ्या घरांत पाऊल टाकाल तर खबरदार..."

पुष्कळ दिवसांची गाढ झोप संपवून माणूस जागा व्हावा तशी

आतां बाबूरावना जाग आली होती. आपल्या घराशिवाय, लक्ष्मीशिवाय, मुलांशिवाय, जगांत आपलं कुणी नाहीं याची त्यांना आत्ता कुठं जाणीव झाली होती; आणि त्यामुळंच त्यांनीं आपल्या घराकडे जातां येईल तितक्या वेगानं धांव घेतली होती...आणि आतां ते याहि सुखाला पारखे होऊन बसले होते...



आज रविवार असल्यामुळं राजेंद्र, माधुरी, सखू आणि गोविंदा यांना काय खेळावं नि काय नको याचा मोठा प्रश्न पडला होता. त्यांना येतंय तें तें सगळं खेळायला हवं होतं. पण कांहीं केल्या आधीं काय खेळायचं याचा निर्णय त्यांना घेतां येईना. त्यामुळं सखू म्हणाली, "आज माधुरी गाणंच म्हणूं दे अगोदर. म्हण ग तें तुझं मोराचं गाणं."

माधुरीला मोराची फार आवड. त्यामुळं नानासाहेबांनीं तिच्या इच्छेखातर आपल्या घरासमोरील फाटकाच्या दोन्ही बाजूंवर सुंदर मोर करून बसवले होते. नाहींतरी त्याशिवाय माधुरीला खरा मोर नेहमीं नेहमीं कसा पहायला मिळणार !...त्यामुळं माधुरी ह्या मोरावर देखील खूष होती. त्यासाठीं तिच्या मावशीनं तिला एक गाणं करून दिलं होतं. माधुरी भान विसरून तें गाणं म्हणत असे. इतकं तिला तें आवडायचं ! ...अगदीं मनापासून तिच्या गळयांतून बाहेर पडणारं तें गाणं तिच्या बाईना फार आवडायचं. म्हणून त्या नेहमीं तिला तें म्हणायला लावीत. माधुरीहि वरचेवर तें आनंदानं म्हणे. सखूला आतां तें माहीत झालं होतं. म्हणून तिनं माधुरीला तें म्हण असं सांगतांच माधुरी पळत पळत घरांत गेली आणि तिच्या मावशीनं तिला आणून दिलेला एक प्लॅस्टिकचा नवा मोर आणून पुढं टेवीत म्हणाली, " ऐकाइं आतां ! "

माधुरी गाणं म्हणायला लागली कीं, राजेंद्रानं तबला वाजवायचा, गोविंदानं बासरी वाजवायची आणि सखूनं मन लावून तें ऐकायचं असा त्यांचा ठरलेला संच असायचा.

राजेंद्राच्या हाताच्या स्पर्शानं तबल्याचे बोल सुरू होतांच गोविंदाची

बासरी निनादूं लागली. माधुरीनं हंसत मुखानं गाणं म्हणायला आरंभ केला—

नाचरे माझ्या या अंगणीं
पसरुनि अपुला भव्य पिसारा
नाच नाचरे थयथय मोरा
मोहविते मज नृत्य तुझें रे मंगलसुखदायिनी
निळसर नयनीं तुझ्या थाटली
वनराणी जणु वैभवशाली
शोभतसे किति इंद्रधनूच्या तेजोमय कोंदणीं
उंच उभवुनी मान मयूरा
दे आवाहन तूं जलधारा
दिसूं लागतिल बघ घनमाला लगेच गगनांगणीं
नाचत डोलत तुरुतुरु धांवत
हांसत खेळत थयथय नाचत
साथ द्यावया संगीता मम असाच ये जीवनीं

माधुरीचं गाणं संपतांच साथहि थांबली. सखूनं टाळ्या वाजवून माधुरीला वन्समोअर दिला. त्यावर सगळी मिळून बेहद्द खूष होऊन हंसूं लागलीं. त्यांनीं टाळ्या वाजवल्या आणि आपला आनंद व्यक्त केला. गोविंदानं तर तोंडानं अशी गोड शीळ घातली कीं विचारूं नका !...

गाण्यामुळं निर्माण झालेला उत्साह थोडासा थंडावला तेव्हां सखू म्हणाली, "आतां आपण पत्त्यांचा बंगला करूंया हं !"

राजेंद्र पत्त्यांचा बंगला करण्यांत पटाईत होता. म्हणून तो म्हणाला, "म्हणजे मी बंगला करायचा आणि तुम्ही तो बघायचा असंच ना ?"

"हो. पण तो कीं नाहीं आतां आमच्या खोलीवर जाऊन करूंया हं ! आई म्हणालीय कीं लौकर घरीं या. सदानंदमामा देखील राजाला घेऊन आत्ता येतील."

गोविंदाचं हें बोलणं सर्वांना पसंत पडलं आणि ते बालगोपाल मग सरळ लक्ष्मीनं घेतलेल्या नव्या खोलीवर आले.

त्यावेळीं साडेदहा अकरा झाले असतील. उन्हाच्या सावल्या नेहमींपेक्षां जरा वेगानंच पुढं धांवल्या होत्या. त्यामुळं सखूनं दार लोटून घेतलं आणि हीं सर्व मुलं पत्त्यांचा डाव काढून खेळायला बसलीं.

थोड्याच वेळांत राजेंद्रानं पत्त्यांचा बंगला उभारला. तो बघून माधुरी म्हणाली, "आतां मी पण करतें हं ! " आणि तिनं दुसरा बंगला उभारायची तयारी चालविली. पण तसं करतांना राजेंद्राचा बंगला माधुरीचा धक्का चुकून लागल्यामुळं कोलमडला ! राजेंद्र संतापला...आणि त्याच क्षणाला खोलीचं दार धाडकन् उघडून घामाघूम झालेली लक्ष्मी आंत आली.

त्यावेळचा लक्ष्मीचा अवतार पहाण्यालायक झाला होता...त्यामुळं तीं सगळी मुलं आश्चर्यानं तिच्याकडे बघूं लागलीं. गोविंदानं घाबरून जाऊन लक्ष्मीला विचारलं " काय ग झालं आई ?"...लक्ष्मीचे केंस विसकटले होते, कुठं तरी धुडगूस घातल्यानं फाटावं तसं पातळ टरकलं होतं.हातांतील बांगडी वाढल्यानं उजव्या हाताचा पंजा रक्ताळला होता, कपाळावरचं कुंकू फरपटलं होतं, सर्वांग थरथरत होतं आणि डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या पडाव्या तसे ते लाललाल झाले होते...ओठ थरथरत असल्यानं लक्ष्मी बोलूं शकत नव्हती. जीव मुठींत धरून तिनं घर गाठलं होतं एवढंच....

झाल्या प्रकाराचा अनपेक्षितपणा लक्ष्मीला कमालीचा अस्वस्थ करीत होता. पश्चाताप, भीति आणि झाल्याप्रकाराची भयंकर जाणीव तिच्या मनांत खवळलेल्या समुद्रावरची भयसूचक बादळं निर्माण करीत होती...

लक्ष्मीचा घसा कोरडा झाला होता. त्यामुळं ओठावरून जीभ फिरवीत आणि त्या मुलांना वेड्यासारखं जवळ घेऊन कवटाळीत भांबावून जाऊन ती स्वतःशीच पुटपुटली "खरंच, कां झालं असं ?..."

• • •

## संभ्रम १२

"पण असं झालं तरी काय एकाएकीं ?...कुठं गेला होता ? उनबीन तर फार लागलं नाहीं ना ?"

सावध झालेल्या लक्ष्मीला नानासाहेब धीर देत विचारीत होते. पण उत्तर देण्याचं भान लक्ष्मीला राहिलं नव्हतं. खोलीच्या वरच्या बाजूच्या कोपऱ्यांत कोळ्यानं विणलेलं जाळं ती टक लावून पहात होती. तसं पहातांना तिच्या पापण्यांची देखील हालचाल होईना अशी स्थिति निर्माण झाली ! तेव्हां नानासाहेब तिच्या डोक्यावर बर्फाची पिशवी ठेवीत म्हणाले, " सावध झालाय ना ! तीं मुलं पाहिलींत कां कशी घाबरून गेलींत !....असं काय हें वेड्यासारखं ?"

नानासाहेब बोलत होते तें लक्ष्मीला ऐकूं येत होतं. पण ती आपल्याच नादांत असल्यामुळं उगाचच टक लावून दूरवर पहात होती...

त्यावेळीं सकाळीं घडलेला प्रकार तिच्या नजरेसमोर ' आ ' वासून उभा होता...

गेले दोन महिने ज्यांच्या घरीं मुलींना शिवण आणि कशीदा शिकवायला म्हणून लक्ष्मी जात होती त्या घराचे मालक राघूआण्णा साठे म्हणजे पाटीलमळ्यांतील एक प्रसिद्ध व्यक्ति होती ! स्वतःच्या मनांतील इच्छापूर्तीसाठीं वाटेल तें करून हवं तें साध्य करण्यांत त्यांचा अगदीं

हातखंडा ! मग त्यासाठीं वाटेल तितक्या खोल दरींत उडी घ्यायची देखील त्यांची तयारी असायची ! ...पण बिचाऱ्या लक्ष्मीला तें कसं कळावं ? बरून साधा भोळा आणि सभ्य दिसणारा गृहस्थ गुणानं असा असेल असं त्यांच्या परिचितांखेरीज कुणालाच कळूं नये अशी खरी वस्तुस्थिति. त्यामुळं आजवर त्यांनीं अनेकांना फशी पाडलं होत आणि श्रीमंतीच्या जोरावर पुन्हां आपलंच वर्चस्व प्रस्थापित करून ते मोकळे झाले होते...

सखूच्या शाळेंतील मुली म्हणून लक्ष्मीनं त्यांना शिकवायचं पत्करलेलं. शिवाय तिला स्वतःच्या चरितार्थासाठीं पैशाची गरज होतीच. त्यामुळं रोज एक तासभर लक्ष्मी तिथं शिकवायला जायची. पण आज मुली घरांत नाहींत ही संधि साधून राघूअण्णांनीं लक्ष्मीची एकांतांत गांठ घ्यायचा बेत मनाशीं आंखला...

लक्ष्मीच्या सवडीनं ती रविवारी केव्हांहि शिकवायला जात होती. पण आज ती कधीं नव्हे ती सकाळींच गेल्यामुळं मुली शेजारीं भातुकली खेळायला गेल्याचं तिला सांगण्यांत आलं. शिवाय त्या मुलींना आई नसल्यामुळं परत जातेवेळीं घरांत कुणाला सांगायचीहि जरूरी नव्हती. म्हणून लक्ष्मी आल्यापावली परत निघाली. पण राघूअण्णांनीं माडीवरून तिला हांक दिली, " बाई, आज महिनाअखेर. पैसे घेऊन जाना लगेच. "

राघूअण्णांचा संबंध पैसे घेण्यापलिकडे आजवर कधींच आला नसल्यामुळं लक्ष्मी सरळ माडीवर गेली.

राघूअण्णांनीं इकडच्या तिकडच्या गप्पा काढून वेळ घालवायला सुरवात केल्यामुळं लक्ष्मी जेव्हां जायला उठली तेव्हां त्यांनीं मोठ्या चपळाईनं पुढं होत तिचा हात पकडला... एक जोराचा हिसडा देऊन लक्ष्मीनं प्रतिकार करायचा प्रयत्न केला. पण त्यापूर्वीच तिच्या शरीराभोंवतीं राघूअण्णांच्या हातांचा विळखा पडला होता....

बरेच दिवसांचा डाव पुरा केल्याच्या आनंदांत बेहोष होऊन राघूअण्णांनीं लक्ष्मीला जवळ ओढली होती !...

यापूर्वी असं कांहीं घडेल याची चुकूनहि कल्पना न आलेली लक्ष्मी

भांबावून गेली. भीतीनं तिचं सारं शरीर थरथरूं लागलं...पण कसं कोण जाणे, एकाएकी एखाद्या वाघिणीसारखी चवताळून जात तिनं प्रसंगावधान राखलं आणि राघूअण्णांच्या उजव्या हाताचा कडकडून चावा घेतला...

या अनपेक्षित हल्ल्यानं राघूअण्णांची लक्ष्मीच्या भोंवतीची मिठी ढिली झाली.... प्रतिकाराची पराकाष्टा करून लक्ष्मीनं आपली सुटका करून घेतली; आणि अंगांत असेल नसेल तेवढं बळ एकवटून घर गांठलं...

स्वतःच्या पावित्र्यासाठीं डोळ्यांत तेल घालून परमुलुखांत दिवस काढायला हवेत या भावनेनं लक्ष्मी अत्यंत मर्यादेनं वागत होती...परंतु तेवढी खबरदारी घेऊनहि जेव्हां तिच्यावर असा प्रसंग आला तेव्हां स्वतःचं सामर्थ्य पणाला लावून तिनं आपली सुटका करून घेतली ! पण तरीदेखील "असं कां व्हावं ?" ह्या प्रश्नानं गुरफटून गेलेलं तिचं मन तिला खात होतं. नानासाहेबांना, सदानंदला आणि मग इतरांनाहि हें कळलं तर आपणाला वर तोंड काढतां येणार नाहीं, जगांत आपली किंमत कवडीमोल होईल आणि डिवचलेला नाग फणा काढून अंगावर धावून यावा तसा डाव राखून राघूअण्णा वागेल!...अशा एक नि दोन कितीतरी कल्पना मनांत निर्माण करीत लक्ष्मी आपलं दुःख वाढवीत होती...मग त्या नादांत असतांना ती नानासाहेबांना उत्तर तरी कशी देणार ?

झाला प्रकार तिच्याखेरीज कुणालाच माहीत नसल्यामुळं एकाएकीं असं कां व्हावं याचा कुणालाच उलगडा होईना ! आणि मनस्ताप असह्य होत चालल्यानं लक्ष्मीची अस्वस्थता तर वाढत चाललेली !... तिच्या मनांत उद्‌भवलेल्या प्रचंड वादळानं त्यावेळीं अगदीं उग्र स्वरूप धारण केलं होतं...

मनाला असह्य होणारं दुःख आंतल्या आंत गिळावं लागल्यामुळं लक्ष्मीचं अंग बरंच कढत होत चाललं...डोळे लालसर दिसत होते. हातपाय गार गार झाले होते आणि मुख्य म्हणजे ती कुणाशींच बोलत नसल्यामुळं मोठी पंचाईत होऊन बसली होती.

अखेर नानासाहेबांनीं सदानंदाला बाजूला नेऊन विचारलं, " ही काय भानगड झाली एकाएकींच ? "

तेवढ्या वेळांत आई कुठं जाते, काय करते याची सदानंदानं सखूकडून माहिती मिळविली होती. त्यामुळं त्यानं नानासाहेबांना त्याला माहीत होतं तें सांगून टाकीत म्हटलं, "यांतूनच कांहीं निष्पन्न झालं तर पहायचं आतां ! "

नानासाहेब किंवा सदानंद आपापल्या कामांत गुंतलेले असत. त्यावेळीं लक्ष्मीनं हें काम पत्करलेलं असल्यानं त्याची कुणालाच दाद नव्हती ! आणि आपलं आपण कांहीं तरी मिळवायचं हें लक्ष्मीचं वेड असल्यामुळं तिनंहि त्याबाबत कुणाला सांगितलं नव्हतं ! येऊन जाऊन सखूला आणि गोविंदाला आपली आई अमूक एका घरीं बसायला म्हणून जाते एवढंच काय तें ठाऊक होतं ! पण त्यापलिकडे त्यांनाहि कांहीं दाद नसल्यामुळं सदानंदाला त्यांच्या तेवढ्या माहितीवरून कांहीं निष्कर्ष काढतां येईना !

राघूअण्णांच्या घराचं नांव ऐकतांच नानासाहेबांच्या कपाळाला आठ्या पडल्या. आपल्याला थांगपत्ता न देतां लक्ष्मीनं परस्पर असं वागावं हें त्याच्या स्वाभिमानी मनाला मुळींच पटेना ! .... पण ती वेळ ही चर्चा करायची नसल्यामुळं औषध आणायच्या निमित्तानं म्हणून ते तिथून आपल्या दवाखान्यांत आले.

नानासाहेब जात्याच प्रेमळ होते. त्यामुळं या प्रसंगानं त्यांच्या मनांत निर्माण झालेला संभ्रम नाहींसा करीत त्यांनीं पुष्कळ वेळ विचार केला. ...त्यावेळीं लक्ष्मीवरच्या रागाऐवजीं तिच्याबद्दलच्या सहानुभूतीनंच त्यांच्या मनांत जास्त जागा पटकावली. बराच वेळ विचार केल्यानंतर पुन्हां असा प्रसंग निर्माण होणार नाहीं असंच लक्ष्मीनं वागायला हवं असं तिला बजावयाचं त्यांनीं ठरविलं...घर सोडून परमुलुखांत गेल्यानंतर स्वतःच्या पायावर जगायचं ध्येय उराशीं बाळगीत असतांना तिला अशा आडमार्गानं मुळींच जाऊं देतां कामां नये; त्यासाठीं तिच्यावर सदानंदला देखरेख ठेवायला सांगायची असा नानासाहेबांनीं

मनापासून निश्चय केला..., आणि तेव्हां कुठं त्यांच्या मनांतील रुखरुख थोडीफार शांत झाली.

● ● ●

पिंजारलेल्या केसांतून हात फिरवीत बाबूराव जेव्हां आपल्या सासऱ्यांच्या घरांत शिरले तेव्हां त्यांना बघून त्यांच्या सासऱ्यांना फारच आश्चर्य वाटलं. कधीं नव्हे तो अगदीं मळका आणि फाटकातुटका पोषाख घातलेला, भरमसाट दाढी वाढलेली, केस पिंजारलेले, डोळे खोल गेलेले आणि कपाळावर अठ्यांचं जाळं पसरलेलं...असा हा जावयाचा थाट बघून त्यांना फारच चमत्कारिक वाटलं. एवढंच नव्हे तर हाच आपला जावई कीं काय, असा संभ्रम त्यांच्या मनांत निर्माण झाला !... तरी पण त्यांनीं बाबूरावांना आंत नेऊन बसवीत विचारलं, "कसं काय, बरं आहे ?"

पण लक्ष्मी आणि मुलं घरांत कुठं दिसतात कीं नाहीं इकडेच आल्यापासून बाबूरावांचं लक्ष लागलेलं. त्यामुळं भिरीभिरी साऱ्या घरभर नजर टाकीत ते म्हणाले, "झोपलींत वाटतं सगळी माणसं ?"

माजघरांतूनच बाबूराव आलेले त्यांच्या सासूबाईनीं पाहिलेलं होतं. त्यामुळं पाण्याचा तांब्या त्यांच्यासमोर आणून ठेवीत लक्ष्मीची आई म्हणाली, "निजत्याती कां म्हन ! हाईती की जागीच सारी. तुमास्नी कोन कोन पाइजे ?"

उन्हाची वेळ असल्यामुळं चूळ भरून पाणी पीत बाबूराव म्हणाले, "मला न विचारतां ही इकडे आलीय याचा अर्थ काय ? कुठाय ती ? बोलवा तिला बाहेर म्हणजे विचारतों तिलाच."

लक्ष्मीबद्दल तिच्या आईवडिलांना सर्व माहिती ठाऊक होती. त्यांना तिचीं दोन तीन पत्रंहि आलीं होतीं. त्यावरून ती कुठं आहे याचा त्यांना पत्ता लागला होता आणि स्वतः महादेव एकदां तिला भेटून आल्यामुळं तिची खुशालीहि कळली होती. त्यामुळं बेफिकिरीनं बाबूरावांकडे

पद्मात लक्ष्मीचे वडील म्हणाले, " तुम्हांला कुणी सांगितलं ती इथं आलीय म्हणून ? "

" मग ! जातेय कुठं दुसरीकडे त्याशिवाय ? बायकांना माहेराशिवाय आधार देतो कोण लेकाचा नाहींतरी..."

" पण ती इथं आलीय हें कशावरून ? तुम्ही पाठवली होती तिला? माझी मुलगी म्हणजे काय समजतां तुम्ही ? "

" मला बाकीचं कांहीं एक नको. तिला बाहेर बोलवा अगोदर ! नाहींतर..."

" नाहींतर ? काय करणार हो नाहीं आली तर ?..."

लक्ष्मीच्या वडिलांचा एवढा वेळ मनांत घुटमळणारा राग उफाळून वर आला. बाबूरावहि संतापले. रागानं दांत ओठ खात ते म्हणाले, " काय करणार ? चांगलं जित्या आईचं दूध प्यालोंय म्हटलं !... मुकाट्यानं बोलवा तिला ! नवऱ्याचं घर सोडून पळून आलेली मुलगी घरीं ठेवून घेतांना लाज सोडलीत ती सोडलीत आणि वर मलाच विचारतां ? "

" जीभ आवरा ! माझी लेक म्हणजे मांजराचं पिलू कीं शेळीचं करडूं समजतां पळून यायला ? माणसानं जनाची नाहींतरी मनाची तरी थोडी ठेवायला हवी..."

" म्हणजे ? ती इकडेहि आली नाहीं ? मग गेली तरी कुठं ?... मसणांत ? "

हें ऐकून लक्ष्मीची आई चवताळून उठून बाहेर आली आणि म्हणाली, " तें कां म्हन ! मसनांत कां घालीवतूस तिला ? "

सासूच्या ह्या हल्ल्यानं बाबूराव चपापले. तेव्हां लक्ष्मीची आईच पुन्हां म्हणाली, " आन् तुज्या म्हनन्यापरमानं झालं तर चार रोज रडून गप तरी बसलों असतों. पर तें तरी सुक मिळाय नशीब लागतंया न्हवं तसलं ?..."

बाबूरावना लक्ष्मी जेव्हां तिथंहि दिसली नाहीं तेव्हां ते आणखी

भडकले आणि सासऱ्याकडे रोखून पहात म्हणाले, " ही तुमची मुलगी! सारी लाज सोडून..."

" खबरदार ! लाज नाहीं वाटत असं बोलतांना ? चोर तो चोर आणि..."

" कुणाला म्हणतां चोर ? "

" तुम्हाला, तुम्हाला ! कां भीति आहे कीं काय मला कुणाची ? "

सासरेजावयांची अशा बोलण्यामुळं झटापट उडायची वेळ आली... कोणीच माघार घेईना. त्यामुळं लक्ष्मीची आई नवऱ्याच्या पुढं जाऊन उभी रहात जावयाला म्हणाली,

" चोरी केल्याव दिकुन लाज वाटतीया? सारं घर धुवून त्या रांडला दिलंस तें दिलंस आन् वर माज्या पोरीला बोलतूस ? आमची अवलाद न्हाई रं तसली !..."

कधीं नव्हे ती सासू एकेरीवर आलेली बघून बाबूरावांना विलक्षण अपमान वाटला. त्या अपमानाचा बचपा म्हणून घराच्याबाहेर जात ते ओरडून म्हणाले, " आठ दिवसांच्या आंत तिला घरीं पोंचवली तर ठीक ! नाहींतर माझ्याशीं गांठ आहे!...आत्तां ती आली नाहीं तर माझं घर तिला यापुढं एकदम बंद !..."

लक्ष्मीच्या आईला हें ऐकून कांहींच विशेष वाटलं नाहीं. घराबाहेर पडणाऱ्या जावयाला न थांबवतां ती बाबूरावना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानं म्हणाली,

" पन घर पाइजे कां नगो अगूदर !...घर बंद करतूया म्हनं!... त्वांड बगा !..."



## उफाळलेल्या भावना— १३

राजाचं अंग काळं निळं पडत चाललं तसा लक्ष्मीचा धीर सुटत चालला...धडधडत्या उरावर हात ठेवून ती राजाजवळून उठली आणि मनाची समजूत म्हणून तिनं त्याच्यावरून मीठमिरच्या ओवाळून टाकल्या ...पेटलेल्या चुलींत मीठमिरच्यांची तडतड झाली तेव्हां चुलीचा अंगारा आणून राजाच्या कपाळावर लावीत तिनं करुण नजरेनं त्याच्याकडे पाहिलं. परलोकाच्या प्रवासाला निघालेला राजाचा चिमणा जीव मोठ्या आशेनं पहावं तसा आईकडे टक लावून पहात होता. तें बघून लक्ष्मीनं त्याला मांडीवर घेतला आणि चमच्यानं त्याच्या तोंडांत ग्लूकोजचे दोन थेंब टाकले. पण नेहमीप्रमाणं राजानं ते आंत ओढून घेतले नाहींत. त्यामुळं लक्ष्मीनं जेव्हां पुन्हां एक थेंब त्याच्या तोंडांत घालण्यासाठीं चमचा तोंडाजवळ नेला तेव्हां राजानं डोळे मोठाले करीत नजर फिरविली !...अस्पष्ट आवाजांत ‘ आई ’...म्हणत त्यानं जगाचा निरोप घेतला...राजा गेला...

राजाच्या निर्जीव देहाला कवटाळीत लक्ष्मीनं हंबरडा फोडला... तेव्हां दोनतीन मिनिटापूर्वींच तिथून बाहेरच्या खोलींत इंजक्शनची तयारी करण्यासाठीं म्हणून गेलेले नानासाहेब हातांतील सिरींज टाकून तिथं धांवत आले. त्यांनी राजाला तपासलं, इंजक्शन देऊन पाहिलं पण

त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं...लक्ष्मीचा राजा सर्वांना सोडून गेला तो गेलाच...

साधं सुळेदांत यायचं निमित्त ! पण त्यानं राजाला अगदीं हैराण करून सोडलं होतं. गेले पंधरा तीन आठवडे तर तो अंथरुणाला खिळून होता. नानासाहेब आपल्यापरीनं त्याला औषध देत होते आणि त्यांतून राजा बरा होईल अशी त्यांना खात्रीहि होती !......पण राजाच्या शरीरांतील जीवनसत्व कमी कमी पडत गेल्यानं औषधाचा उपयोग झाला नाहीं. दिवसेंदिवस मुडदूस झालेल्या मुलासारखी त्याची स्थिति होत गेली. तशांत लक्ष्मी घर सोडल्यापासून काळजीनं अस्वस्थच असल्यामुळं म्हणावा तसा सकस दुधाचा पुरवठाहि राजाला झाला नव्हता ! आणि औषध घ्यायला तर त्याची बिलकूल तयारी नव्हती...

वास्तविक वर्ष दीड वर्षांचं मूल पण राजा अजून आईच्या दुधावरच होता. वरचं कांहीं घ्यायचं म्हणजे हातभर जीभ बाहेर काढून ओरडून घसा कोरडा करण्यापर्यंत त्याची मजल जायची...त्यामुळं दिवसेंदिवस तो खालावत न जाईल तरच नवल ! तशांतच दांतांचा त्रास मग तर विचारायलाच नको.

राजाला चांगलं दूध आणि टॉनिक द्यायला हवं म्हणून नानासाहेबांनीं लाखदां लक्ष्मीला बजावलं होतं. पण स्वतःचं दूध पाजण्यांतच धन्यता मानणाऱ्या लक्ष्मीला तें तितकंसं पटलं नाहीं ! त्यामुळं ज्याच्या जन्मापूर्वी पासून जीव मुठींत धरून लक्ष्मीनं राजाला वाढवला होता तो राजा तिला कायमचा सोडून गेला...दुःखाच्या समुद्रांत लक्ष्मी गडप होऊन गेली...

निर्मलाबाई आणि नानासाहेब लक्ष्मीची खूप समजूत घालीत. पण " काय सांगू मला कसं होतंय तें ! " असं म्हणून ती एकसारखी रडत बसे. रडून रडून तिचे डोळे सुजायची वेळ आली तेव्हां गोविंदा तिच्या गळ्याशीं पडून म्हणाला, " पण मी आहे ना ग ! "

गोविंदाच्या या बोलण्यानं लक्ष्मीला जास्तच भडभडून आलं. धाय मोकलून ती रडूं लागली. तेव्हां राजेंद्रानं आपल्या रुमालानं लक्ष्मीचे

डोळे टिपींत म्हटलं, " तो राजा गेला तरी हा आहे. परका का आहे मी कुणी ? "

एवढयाशा मुलानं दाखवलेलं हें समजुतीचं प्रसंगावधान ओळखून लक्ष्मीनं राजेंद्राला पोटाशीं घट्ट आवळून धरला आणि आपले डोळे पुसले...

राजाच्या वियोगाचं दुःख आवाक्याबाहेरचं होऊन बसल्यामुळं लक्ष्मी वेड्यासारखी करीत होती. मधून मधून एकदम हंसायची, एकाएकीं मोठ्यानं रडायची नाहींतर राजाचे दिसतील ते कपडे गटागट गिळून टाकायचा तिला मोह व्हायचा !...दुःखवेग याहि पलिकडे वाढला कीं ती बेशुद्ध होई !...आणि कुणीतरी तिची दांतखिळी उघडली कीं बडबडूं लागे, " नाना, संजीवनी आणा, काय वाटेल ते करा पण माझं बाळ..."

डॉक्टर झाले तरी नानासाहेब माणूसच होते. बालवीराच्या अंगची कणखरवृत्ति आणि मनाची समतोलता त्यांच्याजवळ असली तरी ते हळुवार अंतःकरणाचेहि होते. लक्ष्मीच्या अशा बोलण्यमुळं त्यांच्याहि डोळयांत अश्रू उभे राहून ते म्हणत, " हातांत होतं तेवढयाची शिकस्त केली मी पण...नाहीं, मानवी सामर्थ्य अद्याप दैवी लीलांपुढं अपुरं पडतंय हेंच खरं...ताई, तुम्हीच अशा हातपाय गाळून बसलात तर गोविंदानं आणि सखूनं कुणाकडे पहायचं ? "

सदानंदानं तर लक्ष्मीची समजूत घालायची पराकाष्ठा केली होती. तो जेव्हां " ताई, तुमच्या म्हणण्याप्रमाणं एक वेळ ऐकतों मी. समजा, तुमचा राजा जर तुम्ही रडून येणार असेल तर मी त्यासाठीं माझा प्राण देखील गहाण टाकीन ! ..." असं लक्ष्मीला वारंवार म्हणूं लागे तेव्हां त्याच्या डोळ्यासमोर त्याच्या एक सोडून दोन बायका दिसूं लागत...लग्नानंतरच्या पहिल्या दिवसापासून सदानंदला सुखी ठेवण्यासाठीं मिनिटामिनिटाला त्यांची चालणारी प्रेमळ धडपड, संसाराची हौस म्हणून नवे नवे जिन्नस आणून घर सजवण्यासाठीं चाललेली यातायात, पतीला आपलं कौशल्य दाखविण्यासाठीं म्हणून रोजरोज वेगळे वेगळे

पदार्थ करून घालतांना आणि "कसं झालंय हो !" म्हणून साभिमानानं सदानंदाला विचारतांना त्यांच्या जिवाची होणारी सलज्ज धांदल, गर्भारपणीं दिवसेंदिवस बदलत जाणारीं देहाचीं स्थित्यंतरं आणि त्यामुळं लाजून चूर होणारीं त्यांचीं मुखकमळं, डोहाळ जेवणासाठीं त्यांना आवडेल ते पदार्थ करून मैत्रिणींच्या खेळामेळींत वाडी भरून, नावेंत बसवून त्यांचे काढलेले फोटो, प्रथम पुत्र किंवा कन्या झालेल्या आनंदांत त्याच्या तोंडावर ओसंडणारा आनंद आणि अखेरीस "माझं बाळ सांभाळा" म्हणून त्यांनीं निःशब्द रीतीनंच पण केविलवाण्या नजरेनं सदानंदजवळ फोडलेला टाहो...हें सारं आठवलं कीं सदानंदाचे डोळे ओले होत. अंग कढत झाल्यासारखं वाटे आणि डोकं सुंद होऊन विचार करण्याची ताकद त्यच्यांत उरेनाशी होई...

दुःखाच्या खाईत पोळलेल्या सदानंदानं जेव्हां लक्ष्मीची तशी समजूत घातली तेव्हां आईच्या मायेनं त्याच्या अंगाखांद्यावर हात फिरवीत ती म्हणाली, "आईचं दुःख तुम्हाला कसं कळावं ! माझ्या रक्तांतला प्रत्येक थेंब त्याच्यासाठीं...."

लक्ष्मीचं दुःख कुणी निवारण्यासारखं नव्हतं. त्यामुळं नानासाहेबांनीं सर्वांना बजावलं, "आतां तुम्ही कुणी तो विषय काढूंच नका...काळ हें एकच औषध त्यावर उत्तम आहे..." आणि सर्वांना तें पटलंहि.

पुत्र वियोगाच्या जोडीलाच बाबूरावांच्या आठवणीनं लक्ष्मीला जास्तच दडपल्यासारखं होऊं लागलं. कां कुणास ठाऊक पण तिला त्यावेळीं वाटत होतं कीं, बाबूराव आज आपणाजवळ हवे होते ! लक्ष्मीचं पहिलंच मूल जेव्हां गेलं होतं तेव्हां तिचं सांत्वन करीत बाबूराव तासन् तास तिच्याजवळ बसून होते. तिच्याशीं एकजीव होऊन ते तिची समजूत घालीत होते...आणि आज तिला तोच क्षण हवा होता...विचार करतां करतां लक्ष्मीला आठवलं, "आई, बाबांना हें बाळ नाहीं हं दाखवायचं ! नाहींतर त्याला पण ते मारतील..." असंच कांहींतरी सखू तिला म्हणाली होती आणि 'त्याची नको तुला काळजी' असं म्हणून तिनं तिला धीर दिला होता...होय, त्याच धीराच्या बळावर लक्ष्मीनं

राजाला वाढवला होता...हृदयाच्या हिंदोळ्यावर झोके देऊन तिनं त्याला अंगाई म्हटली होती...मायेच्या उबींत त्याला गुंडाळून तिनं त्याचं रक्षण केलं होतं...प्रत्यक्ष मृत्यूशीं स्वतः झगडून तिनं त्याचे प्राण बांचविले होते...आणि तोच राजा आतां तिला दुःखाच्या दरींत लोटून क्षितिजापलीकडे जाऊन लपून बसला होता...

चारदोन दिवस असेच गेल्यावर लक्ष्मीच्या मनावरचा दुःखाचा भार किंचितसा कमी झाला. पण तेवढ्यांत ती बातमी कळल्यानं महादेव आल्यामुळं त्याला बघून लक्ष्मी पुन्हां व्यथित झाली. आंतड्यांना पडलेला पीळ उलगडीत ती ढसढसा रडली...“ आतां तुला ‘ मामा, ’ ‘ मामा ’ करूनं कोण दमवणार ? ” असं म्हणून तिनं महादेवाला मिठी मारली...महादेव तरी काय सांगणार?...लक्ष्मीच्या नसानसांतून राजा खेळत होता. त्याला कोण आवरूं शकणार होतं !...

लक्ष्मीला थोडी झोप लागली असं समजून जेव्हां महादेव बाहेरच्या व्हरांड्यांत येऊन बसला होता तेव्हां राजेंद्रानं त्याला सांगितलं, “ बरं का मामा, राजा गेला ना, तरी त्याचं अंग कढत कढत होतं !... स्मशानांत नेऊन सदानंदानं जेव्हां त्याला शिणकुटं रचलीं होतीं त्यावर ठेवला तेव्हां घळकन् त्याच्या तोंडातून पाणी ओघळलं बघा !...त्यामुळं मी धांवत जाऊन त्याला तिथून उचलला...पळत पळत जाऊन गोविंदानं नांनाना बोलावलं. मला वाटलं राजा पुन्हां जिवंत होईल ! आणि म्हणून मी नानांना राजाला तपासायला सांगितलं...त्यावेळीं राजा अगदीं रोजच्यासारखा शांत झोपलेला दिसत होता. अजूनहि त्याचं अंग कढत होतं !... म्हणून त्याला जेव्हां मी हृदयाशीं धरला तेव्हां सगळीं मला खुळा म्हणाली पण गोविंदा तेवढं म्हणाला कीं, याला आईकडे नेऊन पाजलं तर तो पुन्हां जागा होईल आणि...”

पडल्या पडल्या लक्ष्मीनं आंतून हें ऐकलं असावं. कारण राजेंद्र जेव्हां शेवटचं वाक्य उच्चारूं लागला तेव्हां विजेच्या वेगानं धांवत येऊन लक्ष्मीनं त्याला विचारलं, “ मग आणलास तूं त्याला माझ्याकडं ?...”

● ● ●

दिवसामागून दिवस जात होते. राजाचं दुःख गिळीत लक्ष्मी मनाचा तोल सावरूं पहात होती...

स्वतःच्या मनाला विरंगुळा म्हणून सदानंदच्या खोलींतल्या कापडाच्या चिंध्या आणून तिनं भावल्या तयार करायला आरंभ केला होता. शिंप्याचं काम सदानंद मधून मधून करायचा. त्यामुळं त्याच्याकडे अनायासेंच रंगीबेरंगी चिंध्या सांठल्या होत्या. निर्मलाबाईंच्या सांगण्यावरून आणि त्यांनीं शिकविल्यावरून लक्ष्मी भावली तयार करायला शिकली होती.

थोडासा भुस्सा घेऊन चिंध्यांना आकार देत लक्ष्मी जेव्हां भावलीचे नाकडोळे, हातपाय, पोट, पाठ, तोंड वगैरे करूं लागे तेव्हां तिला आपल्या आईची फार आठवण येई...लहानपणीं लक्ष्मीला भावलीचं भारी वेड. त्यामुळं तिचे सारे नातेवाईक तिला दिसेल ती भावली आणून देत. लाकडाची भावली, काचेची भावली, मण्यांची भावली, मातीची भावली किंवा रबराची भावली, यापैकीं कसलीहि भावली आणली तरी लक्ष्मी आणखी नवी हवीच म्हणून हट्ट धरून बसे! तेव्हां तिची आई तिच्या समजुतीखातर चिंध्याची भावली कशीबशी तयार करून तिच्या हातावर ठेवी!...लक्ष्मीला त्यांत ब्रह्मानंद लाभे!...तिचा तो आनंद बघून तिची आई तिला कुशींत ओढून घेई...

ह्या भावल्या बनवितांना लक्ष्मीला आपल्या मनाची आग विझविण्यासाठीं म्हणून आईच्या कुशीची आज विलक्षण आवश्यकता वाटत होती...पण...काय वाटेल तें झालं तरी आणखी कांहीं दिवस माहेरींहि न जाण्याचा तिचा निश्चय असल्यामुळं तिनं मुरडकानोला खाल्ला....उफाळून वर आलेल्या भावनांना बांध घालावा म्हणून ती नेटानं कामाला लागली...

भावली तयार करीत लक्ष्मी बसली असतांना अभ्यास करून कंटाळा आलेली सखू धांवत धांवत येऊन तिच्या कुशींत शिरत म्हणाली, "अभ्यास म्हणजे काय ग करायचं आई?...आतां कंटाळा आला बाई!"

लक्ष्मीनं प्रेमानं सखूच्या तोंडावरून हात फिरविला आणि म्हटलं, “ आतां खेळ जा. बस्स झाला, झाला तेवढा अभ्यास. ”

दहा अकरा वर्षांची झाली तरी सखू अजून वयाच्या मानानं बरीच अल्लड होती. एखाद्या फुलपांखराप्रमाणं तिचं आयुष्य चाललं होतं... आणि वयाच्या मानानं गोविंदा मात्र बराच पोक्त झाला होता. बाजवीपेक्षां कोणत्याहि गोष्टीची काळजी करण्याची त्याला फार वाईट खोड लागली होती...

राजा गेल्यापासून लक्ष्मीची प्रकृति खराब झाली होती. शिवाय रात्रंदिवस ती निराशेंतच गुरफटली गेल्यामुळं गोविंदा तिला वरचेवर म्हणत होता, “ आई अशानं कसं ग व्हायचं !...मी शाळेंत गेलों तरी तूं मला दिसतेस...आणि मग वाटतं कीं...”

“ वेडा तर नाहींस बाळ ? ”

“ पण मग मी धांवत धांवत येऊन तुला बघतों आणि मग तूं दिसलीस कीं माझी भीति जाते...”

गोविंदा असं म्हणाला की लक्ष्मीचा जीव तिळतिळ तुटे आणि मग ती शून्य मनानं उगाचच कितीतरी वेळ जागच्या जागीं बसून राही....

आणि मग एखादेवेळीं राजाच्या आठवणीनं तिला पान्हा फुटला की चोळींतून गळूं पाहणारं दूध तिच्या हृदयाचा ठाव घेई...आणि राजाच्या ओठाचा स्पर्श स्तनांना जाणवला कीं ‘बाळऽ’ म्हणून किंकाळी फोडीत लक्ष्मी ग्लानीच्या स्वाधीन होई...

आई देखील आज़ारी झाली आहे आणि राजासारखं तिचं कांहीं बरं वाईट झालं तर आपणाला कोण ? ही गोविंदाच्या मनाची धास्ती ओळखून लक्ष्मी आलेला हुंदका गिळून स्वस्थ पडे. पण मग एखादेवेळीं गोविंदाला वाटतं तसंच जर आपलं झालं तर !...ही कल्पना मनांत आली कीं ती कावरीबावरी होऊन साऱ्या घरभर फिरायला सुरवात करी. अशक्तपणामुळं थोडं देखील सहन करायची तिच्यांत ताकद उरलेली नसल्यामुळं या विचारांच्या वावटळींत ती सांपडली कीं, पुष्कळदां तिच्या छातींत धडधड सुरू होई ! सर्वांगांतून उगाचच चमक

निघते आहे असं तिला वाटे, आणि मग ती आपल्या मनाला बजावण्यासाठीं स्वतःशीच म्हणे "मी देखील गेलें तर मग माझी मुलं... खरंच, कोण बघेल त्यांना? ...गोविंदाSS सखूSSS" आणि हा भावनावेग असह्य होऊन ती भविष्यकालाचीं चित्रं रंगवूं लागली कीं, मधूनच बेशुद्ध पडे...

लक्ष्मीची ही अवस्था बघून काळजीनं काळवंडून गेलेला गोविंदा एक दिवस नानासाहेबांना म्हणाला, "आईला बरं वाटेल ना हो?" त्यावेळचं त्याचं तें केविलवाणं तोंड बघून नानासाहेबांच्याहि मनांत कालवाकालव सुरू झाली. त्याला जवळ घेऊन कुरवाळीत ते म्हणाले, "अरे, आईला झालंय काय न बरं वाटायला? ती चांगली आहे आतां. तूं उगाचच काळजी करतोस. जा खेळ जा."

त्यावेळीं समजूत पटली म्हणून गोविंदा खेळायला निघून गेला.

लक्ष्मीच्या एकंदर जीवनाविषयीं नानासाहेबांना नेहमींच काळजी वाटे; पण त्यामध्यें प्रत्यक्ष असा त्यांचा कांहींच संबंध येत नसल्यानं त्याबाबत ते तिला फारसं बोलून दाखवीत नसत. पण आतां मात्र त्यांनीं मनांतला संकोच दूर करून लक्ष्मीला म्हटलं, "स्वतःसाठीं नसेल पण मुलांसाठीं तरी जास्त दिवस जगायला हवं ना? परिस्थितीचं चक्र माणसाभोंवतीं नेहमींच फिरतं! म्हणून असं हातपाय गाळून कसं चालेल? ...कुणी सांगावं कदाचित् यापुढंच तुमचं आयुष्य अपेक्षेपेक्षांहि सुखांत जाईल! तेव्हां मनाला थोडा बांध घालायला शिका...आणि आम्ही सगळीजणं तुम्हाला जे एवढं सांगतोंय तें उगाचच? गेलेल्या मुलासाठीं एवढा जीव पांखडून...आहे त्यांच्यासाठीं तुमचं कांहींच कां कर्तव्य नाहीं? तो तुमचा नि मग हीं मुलं कुणाचीं? ..."

लक्ष्मीला हें पटत होतं, कळत होतं, पण अजून वळत मात्र नव्हतं. त्यामुळं तिच्यांत निदान शारीरिक ताकद तरी आणावी, म्हणून नानासाहेबांनीं तिला कॅलशियमची व लिव्हर एक्सट्रॅक्टचीं इंजक्शनं द्यायचा निश्चय केला. लक्ष्मीला त्यांनीं जेव्हां तसं बोलून दाखवलं तेव्हां तिनं

नकार दिला ! पण नानासाहेबांनीं तिचं मुळीच ऐकलं नाहीं. त्यामुळं ती नाइलाजानं तयार झाली.

नानासाहेबांच्या बंगल्यांत मनाला थोडा विरंगुळा म्हणून लक्ष्मी अलिकडे चारआठ दिवसासाठीं आली होती. त्यामुळं एक दिवस संध्याकाळीं निर्मलाबाईनीं लक्ष्मीला पलंगावर निजवलं आणि नानासाहेबांना हांक मारीत म्हटलं, " पेशंट तयार आहे हं ! "

हातांत सिरींज घेऊन नानासाहेब आले. त्यांना बघून लक्ष्मी बरीच गोंधळली. खरं म्हणजे तिला मनापासून इंजक्शन नको होतं. पण तसं बोलून दाखवणं शक्य नसल्यानं ती जागच्या जागींच चळवळूं लागली. पण निर्मलाबाईनीं लक्ष्मीचा हात घट्ट दाबून धरला...उजव्या हाताची मूठ तिला घट्ट दाबून धरायला सांगत नानासाहेबांनीं तिचा तो हात आपल्यासमोर धरला आणि खालीं वांकून पायाच्या पंजावर नीट बसत, त्यांनीं लक्ष्मीच्या हातांत कोपराच्या वरच्या भागावर सिरींजची सुई खुपसली...

लक्ष्मीच्या मनांत हजारों विचारांची खळबळ उडाली होती... आणि तिला लवकर बरी करून आईच्या काळजीनं काळवंडून गेलेला गोविंदाचा चेहरा हंसरा करण्याची धडपड नानासाहेबांच्या मनांत चालली होती...

इंजक्शन देतेवेळीं सैल केलेली लक्ष्मीची मूठ नानासाहेबांच्या छातीशीं चिकटून होती. त्यामुळं नानासाहेबांच्या मनांत तिच्या विषयींच्या आपुलकीनं चाललेली खळबळ तिच्या हाताला स्पष्ट जाणवत होती...आणि नानासाहेब जेव्हां 'आतां हात अगदीं ढिला ठेवा हं !' असं तिला म्हणाले, तेव्हां त्याची तिला आणखीनच जाणीव झाली...त्यामुळं लक्ष्मीनं चमकून नानासाहेबांकडे पाहिलं, तों त्यावेळीं नानासाहेब मोठ्या बारकाईनं सिरींजकडे पहात असलेले तिला दिसले.

• • •

## कोवळे किरण

## १४

नुकतीच पावसाची एक मोठी सर येऊन गेली होती. हवेंत गारवा सुटल्यामुळं सहाजिकच प्रसन्न वातावरण निर्माण झालं होतं. भिजलेल्या मातीचा गोड सुवास सगळीकडे दरवळला होता. घरावरच्या पन्हाळींतून पाणी ठिबकत होतं. झाडांच्या पानांफुलांवरचे पावसाचे थेंब घसरगुंडीचा खेळ खेळत घळकन् खालीं ओघळत होते. नुकतंच स्नान घडल्यामुळं फुलझाडांवरचीं फुलं मावळत्या सूर्याच्या किरणांचा स्पर्श होतांच मनापासून हंसून आपला सुगंध पसरूं पहात होतीं...आणि त्या प्रसन्न वातावरणांत फिरायला जाण्यासाठीं म्हणून लहानमोठीं माणसं घराबाहेर पडायला उत्सुक होऊन बाहेर डोकावून पहात होतीं.

इंद्रधनुष्याची मजा पहात बरींच मुलं खेळायला निघालीं होतीं. त्या मुलां शेजारूनच फिरायला निघालेल्या बाबूरावांना त्यांपैकीं एका मुलानं थांबवून विचारलं, " तुमचा गोविंदा कधीं येणार ?...आणि सरू पण त्याच्याबरोबरच येणार होय ? "

हीं मुलं पतंग उडवायला निघालीं होतीं. त्यांच्या हातांतील पतंग आणि त्यासाठीं लागणारी भली मोठी गुंडाळलेली दोरी पहात असतांना बाबूराव म्हणाले, " पतंग उडवायला निघालांत ? "

" हो. पण गोबिंदा..."

" तो होय? आहे आपल्या आजोळीं. "

" पण येणार कधीं? आणि त्याची शाळा?...मास्तर देखील विचारीत होते तो कधीं येणार म्हणून? त्याचं नांव काढलंत होय आमच्या शाळेंतून?"

खरं म्हणजे बाबूरावांना गोविंदा निश्चितपणें कुठं आहे, याची गेल्या दोन तीन वर्षांत मुळींच कल्पना नव्हती. तो आजोळीं नाहीं हें समजल्यापासून त्यांनीं आपणहून त्याचा पत्ता शोधायचाहि प्रयत्न केला नव्हता. घरांतून पळून गेलेली बायको त्यांना आतां मुळींच नको होती! ...आपल्या घरांतून लक्ष्मी गेली; पण ती कुठं गेली असेल, काय करीत असेल, मुलांचं कसं होत असेल, याची चौकशी करण्याच्या भानगडींत बाबूराव पडले नव्हते!...मधून मधून त्यांना त्या सर्वांची आठवण येत होती. पण तिकडे दुर्लक्ष करून ते सुंदरीच्या नादांत असतांना चुकून उरलेली एकरभर जमीन विकून आतां मनाला येईल तसं वागायला ते लागलेले होते...पण आतां तेहि पैसे संपल्यामुळं कांहींतरी उद्योग करून मिळविल्याशिवाय दुसरीकडून पैसे मिळण्याचा मार्ग त्यांना दिसत नव्हता!...नाइलाज म्हणून ते आतां आपल्या मित्राच्या एका दुकानांत मॅनेजरचं काम करीत होते...त्यामुळं मिळणाऱ्या पैशांतूनच एक खोली घेऊन त्यांनीं एकट्याचाच नवा संसार थाटला होता...

रोज संध्याकाळीं त्यांचा फिरायला जायचा क्रम अगदीं ठरलेला असायचा. त्याप्रमाणं आज ते घराबाहेर पडतांच गोविंदाबरोबरच्या मुलांनीं त्याची चौकशी केली तेव्हां ते थोडेसे अस्वथ झाले. खरं म्हणजे त्यांचीं मुलं त्यांना आवडत होतीं; पण त्यांच्याशीं पाहिजे तितक्या प्रेमळपणानं ते अलिकडे वागूं शकले नव्हते...त्यामुळं त्यांना आपल्या आबांपेक्षां आईच अधिक प्रिय होऊन बसली होती!...आणि बाबूरावांच्या मारहाणीमुळं लक्ष्मीवर राजाचे वेळीं जो भयंकर प्रसंग ओढवला होता तो पाहिल्यापासून गोविंदाचं आणि सखूचं आपल्या वडिलांविषयीं वाईट मत होऊन बसलं होतं!...बाप म्हणजे कोणीतरी भयंकर प्राणी आहे अशीच त्यांची समजूत झालेली असावी!...

बाबूरावांच्या मित्रांनीं त्यांना लक्ष्मीची आणि मुलांची चौकशी करावयाला अनेकदां सांगितलं होतं. पण बाबूरावच त्या बाबतींत पूर्ण बेफिकीर असल्यामुळं त्यांचा नाइलाज झाला होता...तथापि आज मुलांनीं जेव्हां गोविंदाची चौकशी केली तेव्हां मात्र बाबूरावांना आपल्या मुलांचा विरह तीव्रतेनं जाणवला. कारण त्याच मुलांबरोबर त्यांचा गोविंदाहि कितीतरी वेळां पतंग उडवायला गेल्याचं त्यांनीं स्वतः पाहिलेलं होतं. त्यावर आजच पहिल्यांदां त्या मुलांची भेट होऊन त्यांनीं जेव्हां गोविंदाबद्दल त्यांना विचारलं, तेव्हां बाबूराव त्या विचारणाऱ्या मुलाजवळ जाऊन त्याची पाठ थोपटीत म्हणाले, " आतां लवकरच येईल हं गोविंदा आजोळाहून. तो आला म्हणजे मग तुम्हांला कळवीन."

गोविंदा येणार असल्याचं ऐकून मुलांची उत्सुकता आणखीनच वाढली. त्या मुलानं बाबूरावांना पुन्हां विचारलं, " तो तिकडच्या शाळेंत जातो ? "

" हो. आतां चांगला अभ्यास करतो हं तो ! आतां आमचा राजा पण शाळेंत जायला लागेल आणि सखू...हो ती पण शाळेंत जाते. "

" असं का ? मग त्यांचा पत्ता काय हो ? "

" पत्ता ?...पत्ता कशाला ? "

थोडंसं अडखळत आणि गंभीर होऊन बाबूराव असं म्हणाले, तेव्हां तो मुलगा म्हणाला, " मी त्याला पत्र लिहिणार आहें. आतां आमच्या शाळेचं मोठ्ठं गॅदरिंग होणार आहे ! साने गुरुजी येणार आहेत अध्यक्ष म्हणून !...त्यावेळीं तो इथं असायला हवाच...मग...काय बरं त्याचा पत्ता ? "

" उद्यां सांगतों हं ! चालेल ? "

" हो. पण नक्की बरं का ? आणि....पण कुठं सांगणार ? तुमच्या घरीं येऊं मी ? "

" नको नको. इथंच, उद्यां ह्या वेळीं ! फिरायला जातांना..."

" अच्छा. "

बाबूरावनीं मुलांना थाप दिली. पण त्यांना ती खरी वाटल्यामुळं तीं हंसत खेळत निघून गेलीं...बाबूराव त्या मुलांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे कितीतरी वेळ पहात उभे होते...

बऱ्याच वेळानं बाबूराव नेहमींच्या रस्त्यानं फिरायला निघाले. त्यावेळीं शेतावरून येणारी एक शेतकरीण दुसऱ्या शेतकरणीला सांगतांना त्यांनीं ऐकलं. ती बाई म्हणत होती " वर त्वांड करून चाललाय बग कसा मेला! सोन्यासारकी बायकू आन् पोरं देशोधडीला लावलीं, आन् ह्यो बसलाय त्या भिंगरीभंवतीं गमजा करीत!...काय करायचा ग असला न्हवरा! नुसता मेला कुकवाचा धनी!... आज न्हाई उद्यां देव बघून घेतल्याबिगार ऱ्हायाचा न्हाई त्येचं!...बिचारी देवावानी हुती बग..."

चालतां चालतां हें कानावर आलं तेव्हां बाबूरावनीं झटकन् मान वळवून त्या बायकांकडे पाहिलं. पण तोंपर्यंत त्या दहा बारा पावलं पुढं निघून गेल्या होत्या!...कपाळावर आठ्या चढवीत बाबूराव पुढं निघाले. त्यांनीं आपल्या मनाला प्रश्न केला, " असं कां म्हणाली ती बाई? आणि तें मलाच उद्देशून तर नसेल?..."

बाबूरावांच्या आंतल्या मनानं उत्तर दिलं, " होय. तुलाच उद्देशून होतं तें. लक्ष्मीशीं वागण्यांत तुझा जो अतिरेक झाला, त्यामुळं चिडून निघालेले ते बोल आहेत...निदान आतां तरी विचार कर... " पण त्यांचं दुसरं मन लगेच म्हणालं, " मग तिनं कां जावं घर सोडून?... मी तिला जा म्हणालों होतों!"

स्वतःच्या मनाशीं हितगुज करीत करीत बाबूराव जेव्हां शिवाजी पार्कवर येऊन पोहोंचले, तेव्हां एका प्रशस्त बाकावर बसत त्यांनीं आपल्या मनाशीं निर्णय घेतला, " बस्स! निदान मुलांना तरी आतां घरीं आणायचंच..." त्यावेळीं ते आपल्या मुलांचे खेळ, त्यांची एकमेकांशीं होणारी गोड कुजबूज, त्यांचं आपल्या आईवरचं प्रेम आणि त्यांना सांभाळण्यासाठीं लक्ष्मीनं घेतलेली शपथ वगैरे सर्व आठवीत, सुन्न मनानं

बसले होते...त्यांच्या डोळ्यासमोर त्यांचं घर त्यांना दिसत होतं... तितक्यांत कुणीतरी शीळ घालीत जवळून जात असल्याची चाहूल लागल्यामुळं बाबूरावनीं कुतूहलानं समोर पाहिलं. एका गुबगुबीत कुत्र्याला लाडीगोडीनं खेळवीत पांढराशुभ्र पोशाख केलेली सुंदरीच तिथून शीळ घालीत निघाली होती ! पण तिनं बाबूरावांना पाहिलं नसल्यामुळं ती तशीच पुढं गेली तेव्हां बाबूरावनींच एकदम पुढं होऊन तिला म्हटलं, "एवढ्यांत ओळख विसरली अं !"

सुंदरीनं कांहींशा बेफिकीरीच बाबूरावांकडे पहांत म्हटलं, "कोण तुम्ही ?"

हा प्रश्न ऐकून बाबूरावांचं आइस्क्रीम व्हायची वेळ आली...आपली सारी संपत्ति आपण हिच्यापायीं घालविली आणि आतां तिनं आपणाला नुसती ओळख देखील देऊं नये, याचा अपमान वाटून ते मोठ्यानं दम भरावा तसे म्हणाले, "मी कोण काय ? शुद्धीवर आहेस कां ?"

कुत्र्याला बांधलेली दोरी खेंचून धरीत सुंदरी म्हणाली, "कोण मी होय ? असं असं ! आहे कीं, चांगली शुद्धीवर आहे. का हो !... माझ्या शुद्धीशीं तुमचा काय संबंध ?"

"म्हणजे ?...आज कांहीं घेतलीस कीं..."

"शट् अप् !"

"सुंदर ! कुणाला म्हणतेस तूं हे ?"

"तुम्हांला ! कां ? भीतेय कीं काय ? आणि मी म्हणजे कांहीं तुम्ही नव्हे असं प्यायला ?"

व्हिस्कीचा प्याला तोंडाला लावावा तशी नक्कल करीत सुंदरी जेव्हां असं म्हणाली तेव्हां बाबूरावांच्या मनाचा तोल सुटला. सुंदरीच्या थोबाडांत द्यायसाठीं जोरानं हात उगारीत ते जाग्यावरून उठलेले पहातांच वेगानं सुंदरी मागें झाली आणि ओरडली, "खबरदार ! मी काय तुमची बायको नव्हे असा हात उगारायला...ही घे ! बायकोचे दागिने विकून माझ्या हातात घातलेली तुमची ती अंगठी !..." आणि हातांतली

अंगठी बाबूरावांच्या अंगावर फेकून ती जेव्हां पुढं निघाली तेव्हां बाबूराव मोठ्यानं म्हणाले, " बराय...बघून घेईन..."

सुंदरी वेश्येची मुलगी होती. तिनं स्वतःदेखील पोटासाठीं आपलं शील विकलं होतं. पण कशी झाली तरी ती एक स्त्री होती. तिला स्वतःच्या भावना होत्या. स्वतंत्र रीतीनं विचार करणारं मन होतं... आपल्या अशा बागण्यानं आपण इतरांच्या संसाराचं बाटोळ करतों, अशी जेव्हां लक्ष्मीची हकीकत कळल्यावर तिची खात्री पटली, तेव्हां ती कमालीची ओशाळून गेली. आपल्यामुळं लक्ष्मीला घर सोडावं लागलं ही कल्पना तिच्या काळजाला छेदून गेली... आजवर तिनं 'असं होतं' म्हणून ऐकलं होतं. पण त्यावेळीं प्रत्यक्ष त्या गोष्टीचा तिच्याशीं संबंध येत नसल्यामुळं ती बेफिकीर होती. पैसा मिळाला कीं बस्स ! मग कांहीं कां होईना असा तिचा सरळ मार्ग चालू होता... पण प्रत्यक्ष लक्ष्मीनंच जेव्हां एक चार ओळींचं पत्र पाठवून " ते कुठं कां असेनात पण सुखी असूं देत" असं सुंदरीच्या एका मैत्रिणीजवळच कळविलं होतं, तें ऐकल्यापासून सुंदरीच्या मनांतील माणुसकी जागी झाली होती...तिला आपल्या बागण्याचा ह्यावेळीं पस्तावा झाला होता...आणि त्यासाठींच तिनं अलिकडे बाबूरावांना आपल्या घराचा दरवाजा बंद केला होता; आणि आज त्यांची उरली सुरली खूण म्हणून असलेली अंगठी त्यांच्या अंगावर फेकली होती...

सुंदरी निघून गेली. तिनं बाबूरावांनीं दिलेली धमकी ऐकली न ऐकल्यासारखीच केली, तेव्हां बाबूराव स्वतःवरच चिडले...बऱ्याच वेळानं त्यांनीं ती अंगठी उचलली आणि पाहिली तों त्यांचाच पाय तिच्यावर जोरानं पडल्यामुळं तिच्यांतला खडा निघून पडला होता !

● ● ●

भावल्यांच्या ढिगाऱ्यांत बसून लक्ष्मी भावल्यांच्या भुवया कोरीत होती. समोर समई तेवत होती. शेजारीं बसून सखू कांहीं तरी वाचीत होती. कुणी कुणाशीं बोलत नव्हतं.

अर्धा एक तास असाच मौनावस्थेत गेल्यावर घाईघाईनं नानासाहेब लक्ष्मीकडे येऊन म्हणाले, 'ताईऽ पेढे काढा !"

लक्ष्मीनं चमकून वर मान केली आणि मोठ्या आश्चर्यानं नानासाहेबांना विचारलं, " म्हणजे ? "

बरोबर आणलेला पेढ्यांचा पुडा सोडून त्यांतला एक पेढा सखूच्या हातावर ठेवींत नानासाहेबांनीं सांगितलं, 'वक्तृत्वाच्या चढाओढींत आंतर विद्यालयीन सामन्यांत गोविंदाला पहिलं बक्षीस मिळालं. ही बघा आत्तांच तार आली राजेंद्राची...गोविंदाला अडीचशें रुपायांचं पहिलं बक्षीस मिळालं !... "

नानासाहेब ही आनंदाची बातमी सांगीत होते. लक्ष्मी कान टवकारून ऐकत होती. सखू मोठ्या कुतूहलानं नानासाहेबांच्या तोंडाकडे पहात होती. दोघींच्याहि तोंडावर अचानक निर्माण झालेला आनंद नानासाहेबांना दिसत होता...आनंदातिरेकानं लक्ष्मी गोंधळून गेली. तिचा त्या बातमीवर चटकन् विश्वास बसेना. त्यामुळं ती मंदस्मित करून म्हणाली, " खरंच ? "

" ही बघा तारच खोटं वाटत असलं तर ? " असं म्हणून नानासाहेबांनीं तारेचा लिफाफा लक्ष्मीसमोर टाकला...सखूनं गडबडीनं ती तार वाचली आणि लक्ष्मीला म्हटलं, " अग आई खरंच ! अय्या ! किती छान झालं नाहीं हो नानासाहेब ? "

" फार भाग्यवान अहांत तुम्ही ताई. " गोविंदाविषयींच्या कौतुकामुळं नानासाहेबांनीं उच्चारलेलं हें वाक्य ऐकतांच लक्ष्मी म्हणाली, " ह्याचं सारं श्रेय तुम्हांलाच. ऐनवेळीं तुम्ही भेटलांत म्हणून त्याला कांहींतरी मार्ग दिसला..."

लक्ष्मीच्या डोळ्यांतून आनंदाश्रु घळाळूं लागले...गोविंदाच्या कर्तबगारीमुळं तिचं हृदय आनंदातिशयानं उचंबळून आलं...एकाद्या मोठ्या सभेंतल्या व्यासपीठावर आपल्या तेजस्वी वक्तृत्वानं समोरच्या श्रोत्यांचीं मनं जिंकणारा गोविंद तिनं कल्पनेनं आपल्या मनासमोर उभा केला...

तेवढ्यांत निर्मलाबाई आणि माधुरी तिथं येत नानासाहेबांना म्हणाल्या, " सदानंद म्हणाला तें खरं कां ! "

" काय म्हणाला ? "

" कीं गोविंदाला बक्षिस मिळाल्याची तार आलीय म्हणून..."

" होय. ही बघ तारच." असं म्हणत नानासाहेबांनीं निर्मलाबाईंच्या हातावर तार ठेवली. ती बघून सखूकडे जाऊन तिला बिलगत माधुरी म्हणाली, " आतां पेढे हवेत गऽ ! "

त्यावर " एवढंच ? " असं म्हणून सखूनं माधुरीच्या हातावर पेढा ठेवलाहि, तशी निर्मलाबाई म्हणाल्या,

" बाकी तुम्ही कांहीं म्हणा. गोविंदा अगदीं योग्य आहे तें बक्षिस मिळवायला...परवांच्या सुट्टींत आला तेव्हां मला त्यानं किती छान भाषण करून दाखविलं होतं म्हणतां.! अगदीं थेट प्रो. फडक्यांच्यासारखं ! ...आणि त्यासाठींच त्यांच्या मास्तरांनीं पण त्याला आपलं पेन दिलं होतं नाहीं हो ! "

" हो हो. म्हणजे आतां तो मोठा वक्ता होणार होता यांत शंका नाहीं. "

नानासाहेबांनीं गोविंदाबद्दल केलेलं हें भाकीत ऐकतांच समाधानाची एक गोड चमक लक्ष्मीच्या अंगांतून निघून गेली. अशा आनंदाच्या प्रसंगीं आलेल्या मंडळींचं तोंड गोड करावं म्हणून चुलीकडे जात ती म्हणाली, " थांबा हं, आलेंच मी ! "

पाटीलमळयाला आल्यापासून लक्ष्मीचा कधींहि न दिसलेला आजचा उत्साह बघून निर्मलाबाई म्हणाल्या, " बाकी आज ना उद्यां आईचे पांग फेडल्याशिवाय रहायचा नाहीं हो गोविंदा ! बिचारीचा सारा जीव ह्या मुलांवर...आज पाहिलांत ना त्यांचा हा आनंद ! "

त्यानंतर नानासाहेब कांहीं बोलणार तोंच गोविंदाला अभिनंदनाची तार करून धांवत धांवत तिथं आलेला सदानंद दारांतूनच ओरडून लक्ष्मीला म्हणाला, " ताई, मी पण आलोंय हो ! एक कप जादा टाका. "

● ● ●

# कल्पना

# १५

" ताई, आज मी कैलासाला जाऊन आलों ! अश्शी मजा पाहिली तिथं !...छे, फारच मजा आली बुवा..."

घाईघाईनं येऊन पाण्याचा प्याला तोंडाशीं नेत सदानंदानं केलेलं हें निवेदन ऐकून लक्ष्मीनं आश्चर्यानं म्हटलं, " कैलासाला ? म्हणजे ? "

" अहो, म्हणजे मी कैलासाला एकटा नव्हतों कांहीं गेलों ! मला एका नव्या पेशंटनं नेलं तिथं एका मिनिटांत ! "

" अगबाई ! हा कुठला आला नवा पेशंट आणखी ? "

" आलाय काल सकाळींच. आणि आज सकाळीं आमचा हा प्रवास झाला ! "

" म्हणजे तो मरत असतांना !... "

"छे छे ! तसला कैलास नव्हे ! अगदीं खरा, जिवंतपणीं पाहिलेला!"

" गोष्टींतला कीं काय ? "

" नाहीं हो. "

" मग ? "

" त्याचं असं झालंय कीं, एक चांगली जाडजूड अशी बाई काल आली नानासाहेबांकडे दवाखान्यांत. तिला खरं म्हणजे कांहीं होत नाहीं. पण तिला आपणाला कांहींतरी होतंय असं वाटतंय !...आहे चांगली

श्रीमंताची बाई. नको म्हटलं तर चार दिवस दवाखान्यांत काढणारच म्हणतेय ! तेव्हां काल तिला तिची इच्छा म्हणून दाखल करून घेतली... "

" बरं मग पुढं ?" लक्ष्मीची उत्सुकता वाढली. तें ओळखून सदानंद म्हणाला, " तेव्हां आज सकाळीं तिनं मला सहज गप्पा मारायला बोलावलं. मला वाटलं तिला एखादा ब्लाउज शिवून हवा असेल ! कारण कालच ती तसं म्हणाली होती. म्हणून मी ' मला वेळ नाहीं ' असं सांगायचा बेत करून गेलों...हो, नसती पिडा कशाला घ्या गळ्यांत ! अहो, तिला ब्लाउज शिवायचा म्हणजे निदान तीन साडे तीन वार कापड..."

" पुरे हो तुमचं ! इतकं करूं नये हं एखाद्याचं ! "

हंसतां हंसतां तोंडाला पदर लावून लक्ष्मीनं मध्येंच असं म्हटलं, तेव्हां मोठ्यानं हंसून सदानंद म्हणाला, " आहेच तें प्रकरण तसं...पण तिनं तो प्रश्न कांहीं काढला नाहीं. त्यामुळं मी चारदोन मिनिटांतच ' मला काम आहे ' असं सांगून निघालों, तों ती म्हणाली थांबा...आणि मी थांबायचा अवकाश मात्र ! तिनं सांगायला सुरवात केली, ' बरं का, मी सगळ्या यात्रा केल्यात हो तीर्थांच्या ! अगदीं कैलास पर्वतावर देखील जाऊन आलेंय !... " मी थक्क झालों तें ऐकून !...थोड्या वेळानं ती पुन्हां म्हणाली, ' त्यावेळीं असं बर्फ पडलं होतं म्हणतां तिथं ! छे छे ! विचारूं नका ! तरी पण आम्ही, म्हणजे मी व माझ्या बरोबरीची मंडळी, अगदीं बेधडक निघालों...कांहीं अंतर तोडून गेल्यावर मी थोडीशी घसरलें...' हें ऐकतांच बर्फावर घसरत जाऊन खेळण्याचा खेळ आठवल्यामुळं मी तिला विचारलं, 'लागलं का हो मग ? ' तेव्हां ती हंसून म्हणाली, ' छे ! देवांचं राज्य आहे तें ! लागेल कसं तिथं ?...तर काय गंमत झाली बघा, तिथं एक साधु पुरुष आला. त्यानं एक काळा मणी माझ्या हातांत बांधायला दिला आणि सांगितलं कीं, हा हातांत असल्यावर मग तुम्हांला कश्शाची म्हणून कश्शाची भीति नाहीं !...आणि

काय त्याचा चमत्कार बघा, शंकराच्या दर्शनाला जातांना वाटेंत सारे सापच साप !...अगदीं काळे कुळकुळीत..."

"अगबाई, खरं ?"

विश्वास न बसून लक्ष्मीनं ही शंका प्रदर्शित केली, त्यामुळं तिथं येण्यापूर्वी कमालीचं हंसू आल्यानं थोडासा दमलेला सदानंद म्हणाला,

"तर हो ! आणि मग त्या सगळया लहान मोठ्या सापांनीं ही बाई निघाली तशी भराभर बाजूला सरून वाट करून दिली...आणि शंकराच्या त्या भव्य, दिव्य मूर्तीचं तिला जेव्हां दर्शन झालं, तेव्हां पार्वतीनं म्हणे तिला आशीर्वाद दिला कीं, हिला चांगले चारपांच मुलगे होतील !... त्यामुळं मोठ्या आनंदानं जेव्हां ती परत निघाली, तेव्हां रस्त्यावरचे साप कांहीं केल्या बाजूला होईनात ! थंडी तर मी म्हणत होती ! अगदीं त्या तिथल्या बर्फानं गोठून जाण्याएवढी !... मग त्या मण्याचा प्रभाव म्हणून म्हणा किंवा हिनं त्यावेळीं माझी सारी इस्टेट देवादिकांच्या कार्याला वाहीन अशी प्रतिज्ञा केली म्हणून म्हणा, ते साप तिथून बाजूला झाले म्हणे...आणि मग मात्र बरोबर आलेल्या माणसांची पर्वा न करतां तिथून उडी मारून खालच्या प्रदेशांत निघालेल्या गंगेच्या प्रवाहांत हिनं उडी घेतली !... आणि मग बाकीचीं तीर्थं करीत ती म्हणे आपल्या घरीं सातान्यास आली...पण अजूनसुद्धां कैलासावरची ती देवाची तेजस्वी मूर्ति तिला आशीर्वाद देते म्हणे !... आहे कीं नाहीं गंमत बोला ?"

"बाई बाई, एकेक ऐकावं तें नवलच आहे हं !...आणि सदानंद, तुमचा विश्वास बसतो अशा गोष्टींवर ?...अहो, नुसता कल्पनेचा खेळ आहे हा !"

सदानंदाला ह्या कल्पनेचं हंसू येत होतं. लक्ष्मीचीहि हंसून हंसून पुरेवाट झाली होती. अखेरीस कसंबसं हंसू आवरीत सदानंद म्हणाला, "आतां मात्र खरंच कमाल वाटते हं त्या बाईची !"

"कां हो ?"

"अहो, ती आतां पुन्हां जाणार आहे म्हणे ?"

" कुठं ? "

" कैलासाला ! "

● ● ●

कधींहि न अनुभवलेल्या धरणीकंपाचा धक्का अचानक बसावा आणि त्यामुळं गांवंच्या गावं त्यांत गडप व्हावींत किंवा उग्र स्वरूप धारण केलेल्या ज्वालामुखीच्या आसपासचा मुलूख बेचिराख होऊन नेस्तनाबूद व्हावा तशी भयंकर परिस्थिति सगळीकडे एकाएकीं निर्माण झाली !... ज्याच्या त्याच्या घरीं, दारी, रस्तोरस्तीं, जिथं म्हणून मनुष्यवस्ती असेल तिथं तिथं तोच विषय आणि तीच चर्चा !...

त्यावेळीं युरोपांतील वातावरण तंग होत चाललं होतं. म्युनिच कराराला झुगारा देऊन हिटलरनं झेकोस्लाव्हाकिया गट्ट करून टाकला होता !...हिटलरचं हें कृत्य राजकीय व कायदेशीर दृष्टया योग्य नसल्याचं इंग्लंड, फ्रान्स आणि रशिया यांनीं जाहीर केलं होतं...त्यामुळं युद्धाचे ढग जमूं लागल्याचीं चिन्हं दिसूं लागलीं होतीं...आणि त्यानंतर चार सहा महिन्यांनीं रशिया आणि जर्मनी यांच्यांत जो नवा करार झाला होता, त्यामुळं साऱ्या युरोपभर खळबळ उडून गेली होती. त्या करारान्वयें जर्मनी युद्धांत पडल्यास रशियानं इतरांना मदत करावयाची नाहीं व जर्मनीला लागेल तो माल व अन्नपुरवठा करावयाचा. त्या मोबदल्या-दाखल जर्मनीनं रशियाला यंत्र सामुग्री पुरवायची अशीं महत्त्वाचीं कलमं त्या करारांत होतीं !...एकीकडे रशियाची इंग्लंड व फ्रान्स यांच्याशीं बोलणीं चाललीं असतां जर्मनीशीं गुप्तपणें दुसरा करार करावा याबद्दल रशियाला दोष दिला जात होता...हिटलरी डावपेचांचा तो एक विजय होता खरा ! पण त्यामुळं ही जर्मन रशियन कराराची बातमी ऐकल्याबरोबर एखादा बॉंब पडल्याप्रमाणं सगळीकडे गोंदल, गडबड उडाली होती...त्याचवेळीं इंग्लंडच्या पार्लमेंटची बैठक होऊन मंत्रिमंडळाला युद्धप्रसंगीं वाटेल तें करण्याची परवानगी मिळाली होती !...चेंबरलेननं इंग्लंडनं पोलंडला दिलेलं वचन कायम असल्याचं जाहीर केलं आणि त्याप्रमाणं इंग्लंड व

पोलंड यांनीं एकमेकांना मदत करावयाची व युद्ध झाल्यास किंवा इतर वेळींहि इतर कोणत्याहि राष्ट्रांशीं कसलाहि करार एकमेकांच्या विचाराशिवाय करावयाचा नाहीं असा त्यांचा आपापसांत करार झाला. ...रशियन जर्मन कराराला हें प्रत्युत्तर मिळालं !...सगळीकडे युद्धाची तयारी म्हणून कडेकोट बंदोबस्त करण्यांत आला !...आणि अखेरीस सप्टेंबरच्या १९३९ च्या एक तारखेस दुसऱ्या जागतिक युद्धाचं रणशिंग फुंकलं गेलं...

परदेशाच्या वातावरणांत धडाडूं लागलेल्या तोफांचा आवाज जगाच्या कानाकोपऱ्यावर जाऊन आदळला !...जिकडे तिकडे हीच चर्चा सुरू झाली...

दुसरं महायुद्ध सुरू झालं !...

हिंदुस्थानशीं ह्या युद्धाचा प्रत्यक्ष संबंध नव्हता खरा, पण शत्रूचा हल्ला होऊन बॉंबचा वर्षाव आत्तां ह्या क्षणाला होईल कीं दुसऱ्या क्षणाला ह्या परिस्थितीला तोंड द्यावं लागेल, अशी चमत्कारिक परिस्थिति गांवोगांवीं निर्माण झाली ! विशेषतः शहरांतल्या लोकांमधून फारच घबराट निर्माण झाला...त्यामुळं शहरांतील लोकांच्या आप्तेष्टांकडून युद्धाची बातमी समजतांच चटकन् निघून येण्याबद्दल घरोघरीं पत्रांचा ढीग पडूं लागला ! दारोदार आपलं सामान खेडोपाडीं पाठविण्यासाठीं वहानांची रीघ सुरू झाली...नोकरीची, पैशाआडक्याची कशाची पर्वा न करतां हजारों लोक शहर सोडून जायचा विचार करूं लागले...रेल्वे स्टेशनवर माणसांचा तोबा झडूं लागला ! ...नभोवाणीच्या बातम्या आणि दररोजचीं वर्तमानपत्रं हजारों लोक ऐकूं लागले...कुणाला धड जेवायला सुचेना कीं बोलायला सुचेना, असं धांदली—गडबडीचं आणि निष्कारण घबराटीचं वातावरण दाही दिशांना पसरलं गेलं...

लक्ष्मीला जेव्हां हें सारं समजलं तेव्हां तिनं घाईघाईनं पोस्टांत जाऊन पुण्याला शिकत असलेल्या गोविंदाला तावडतोब परत येण्याविषयीं तार दिली ! ...

नानासाहेबांना जेव्हां लक्ष्मीनं तार दिल्याचं समजलं, तेव्हां ते

तिच्याकडे येत बरोबर आलेल्या सदानंदला म्हणाले, "सदानंद त्या पेशंटच्या शेजारी आणखी एका ह्या पेशंटची सोय करायला हवी बरं का आजच्या आज!"

त्यावर उगाचच गोविंदाच्या काळजींत गुरफटून गेलेली लक्ष्मी म्हणाली, "तुम्हांला नाहीं कळायचं त्यांतलं!...माझा गोविंदा मला केव्हां भेटेल असं झालंय."

"हेंच तें! मी म्हणतोंय तें हेंच! अहो, युद्ध सुरू झालंय युरोपांत. तिथले लोक बघून घेतील त्याचं! त्यांचे ते युद्धाची तयारी करताहेत, प्राण पणाला लावून लढताहेत, गेलेला प्रदेश पुन्हां मिळण्यासाठीं आणि आहे तो सुरक्षित राखण्यासाठीं जीव गहाण ठेवून तजवीज करताहेत आणि तुमचा आमचा कां उगाचच गोंधळ!"

सदानंद असं म्हणाला तेव्हां नानासाहेब लक्ष्मीला म्हणाले, "आणि ताई, आजच्या आज पुण्यावर बॉंब पडणार असल्यासारख्या तुम्ही कां उगाचच घाबरून गेलाय!... म्हणजे युद्ध चाललंय तिकडे आणि घबराट मात्र झालाय इकडे! ...खासा न्याय आहे कीं नाहीं? ... निदान तुमच्यासारख्यांनीं तरी असा धांदरटपणा दाखविणं बरं नाहीं..."

युद्ध म्हणजे इतिहासांत वाचलेला तरवारींचा खणखणाट, तोफांचा गडगडाट आणि रक्ताची नदी... हीच युद्धाबद्दलची लक्ष्मीची समजूत होती! तिनं मराठ्यांचा इतिहास वाचला होता... महाभारतांतल्या कथा ऐकल्या होत्या...त्यामुळं शून्य दृष्टीनं दूरवर पहात युद्धाचीं भयंकर दृश्यं मनासमोर रेखाटून ती म्हणाली, "गोविंदा लहान आहे अजून नानासाहेब!"

"आतां मात्र कमाल केलीत! अहो, पण युद्ध आपल्याकडे आहे कीं काय तेव्हां एवढी काळजी? ...तुमच्या या मसत्या कल्पनेनं तुम्ही केलेली तार बघून तो मात्र उगाचच घाबरून जाईल!"

नानासाहेब असं म्हणाले तेव्हां कमालीचं हसूं येऊन सदानंद म्हणाला, "ताई, बाकी कैलासाच्या प्रवासासारखंच हें युद्धाच्या बातमीमुळं निर्माण झालेलं नवलं आहे नाहीं?"

तेवढ्यांत निर्मलाबाई तिथं येत नानासाहेबांना बजावून म्हणाल्या, " बरं का, उगाच इकडं तिकडं फार फिरूं नका ! हो, एक करतां एक व्हायचं !...तुमचा स्वभाव हा असा. हांक मारायचा अवकाश कीं निघालेच खुशाल...तसाच तो राजेंद्र !...कुठं कुठं भटकत असेल देव जाणे बाई ! अहो, त्याला नि गोविंदाला बोलवा तरी ! "

" घ्या ! हें यांचं आणि तिसरंच ऐका ! "

सदानंद असं म्हणाला, तेव्हां निर्मलाबाई चिडून म्हणाल्या, " ए, तुला त्यांतलं कळायचं नाहीं ! ...हो, आईचं मन तुला कसं रे कळावं ? "

" हं ! आणि समजा आतां युद्ध आलंच ना, येणार नाहीं म्हणा, पण समजा आपल्याकडे सुरू झालंच, तर मग मात्र आईचं मनबिन सारं गुंडाळून बापाचं मन मिळवायला शिकलं पाहिजे तुम्ही बायकांनीं ! ... ज्याचं त्यानं रक्षण करण्याची वेळ आलीय आतां ! ...युरोपांतल्या बायका घरदार, पोरंबाळं, सारं सोडून रणांगणावर जायच्या तयारींत आहेत ? "

" म्हणजे ! बायका कां लढाईला जाणार ? " निर्मलाबाई असं आश्चर्यानं म्हणाल्या, तेव्हां नानासाहेब म्हणाले, " त्यांत एवढं आश्चर्य कसलं वाटलं तुला ? ...जाणार नव्हे त्यांनीं जायलाच हवंय ! ... निदान स्वतःचं तरी रक्षण करायला शिकलंच पाहिजे आतां तुम्हीं... नुसत्या कल्पनेवर जगायचे दिवस संपले आतां..."

● ● ●

शाळा सुटली तेव्हां माधुरी आणि सखू हंसत खिदळत घरीं यायला निघाल्या. इंग्रजी सहावीचा अभ्यास चालू होता पण त्या अभ्यासाची जबाबदारी अजून त्यांना जाणवली नव्हती...पूर्वीप्रमाणेंच 'बघतां येईल परीक्षा आल्यावर !' या थाटांत त्या हंसत खेळत दिवस घालवीत होत्या. अजून भातुकलीचा खेळ, भावलींची सजावट, विटी दांडू... अशा बालपणींच्या खेळांतच त्या दंग होत्या.

नेहमींप्रमाणं घातलेला फुलांचा हार हातांतून काढून घेत माधुरी म्हणाली, " सखू किती छान होईल नाहीं ग त्या गोष्टींत तसं झालं तर ! "

पाठीवरचा शेपटा पुढं घेऊन सुटलेली रिबन बांधीत सखूनं मोठेपणाचा आव आणून उत्तर दिलं, " इश्श ! अग ती गोष्ट ! म्हणून प्रत्यक्ष कां कुठं होईल तसं ? "

" अं ! काय झालं न व्हायला ? " असं म्हणत माधुरीचं मन तिला हव्या त्या अद्‌भुतरम्य वातावरणांत डुंबू लागलं. फुलांचा एक सुंदर बाण करून व त्यावर बसून त्या पऱ्यांच्या गोष्टींत म्हटलं होतं तसं तिला हवेतून तरंगत जायचं होतं ! ...ढगांची शिडी करून वर जात अप्सरांचा डोळ्यांना दिपवून सोडणारा नाच तिला पहायचा होता ! ... तिच्या पायांतील पैंजणांच्या छुमछुमीबरोबर धांवून येणारा असंख्य पोऱ्यांचा ताफा तिला आपल्यासमोर यायला हवा होता ! ... साबणाच्या पाण्याचा फेस करून निर्माण होणाऱ्या फुग्यावर बसून तिला हवेतून उंच उडावंसं वाटत होतं ! ...जादूची कांडी फिरवून निर्माण होणाऱ्या गोड परीचा पोशाख आपणाला हवा म्हणून तिचा हट्ट होता ! ...पाण्यांतील रम्य बागेतून समुद्रांत बावरणाऱ्या परीप्रमाणं तिलाहि अर्धा भाग माशांचा लावून भटकावसं वाटत होतं ! ... आकाशांतील असंख्य तारकांबरोबर चम्‌चम् करीत चांदोबाशीं खेळायला मिळणाऱ्या संधीची ती आतुरतेनें वाट पहात होती ! ....कोकिळेसारखं मंजुळ गाणं गायला यावं म्हणून झाडावर झरझर चढून खुद्द कोकिळेकडूनच धडा घ्यायला तिचं मन उतावीळ झालं होतं ! ...आणि अशा त्या अतद्‌भुरम्य वातावरणांच्या गोष्टी ऐकल्यापासून ती अद्‌भुतता, तें भव्य, दिव्य असं वातावरण अनुभवायला ती आतुरली होती ! ...त्यामुळें तें रम्य वातावरण नजरेसमोर आणीत ती सखूला म्हणाली, " मला तर असं वाटतं कीं,...

" काय ? तसे सुंदर पंख असावेत कीं, तसले झगझगीत कपडे असावेत म्हणून ? "

" अं हं ! आपल्याजवळ एक जादूचा दिवा असावा असं वाटतं."

" अगबाई ! कशाला ग तो ?"

" सांगू ! मनांत येईल ती गोष्ट पुरी करायला !"

" छान ! कल्पना तर मस्त आहे. पण..."

" पण काय ?"

" नाहीं म्हटलं कल्पनाच ती. तेव्हां..."

" तसं मुळींच नाहीं..."

" मग ?"

" तसंच जर झालं ना तर मग मात्र मी ह्या महायुद्धांत भाग घेईन !"

" आँ ! काय म्हणालीस पुन्हां बोल !"

" हो हो, अगदीं खरं बोललेंय मी तें... त्या जादूच्या दिव्याला हुकूम दिला कीं, काय बिशाद आहे इकडे युद्ध सुरू व्हायची ?"

" छट् ! जादूच्या दिव्याच्या जोरावर कां युद्ध जिंकणार बाईसाहेब ?"

अलिकडे सखू लाठी आणि जंबिया उत्तम खेळत होती. त्यामुळं त्या खेळांतील आपलं कौशल्य ध्यानांत घेऊन ती असं म्हणाली, तेव्हां माधुरीनं आश्चर्यानं तिला विचारलं, "म्हणजे ? मग तूं काय खरोखरीची लढाई समजलीस कीं काय ?...अय्या ! ..."

● ● ●

## "असं आहे तर!" १६

" ...काय वाटेल तें झालं तरी मी जिवंत असेपर्यंत माझी झाशी कुणाच्याहि हातीं पडूं देणार नाहीं !... "

झाशीच्या राणीच्या आवेशांत हातांतील तरवार मनांतून बाहेर काढीत सखूनं खणखणीत आवाजांत असं म्हटलं, तेव्हां प्रेक्षागृहांतील सर्व मंडळींनीं टाळ्या वाजवून तिला शाबासकी दिली.

स्टेजवर झाशीच्या राणीचं काम करणाऱ्या सखूकडे लक्ष्मी टक लावून पहात होती. त्यावेळचा तो सखूचा एकंदर थाट तिचे डोळे दिपवीत होता. भरजरी पांढरी साडी नेसलेली सखू मधून मधून चवताळलेल्या वाघिणी-प्रमाणं स्टेजवरच धाऊन आपल्या कामाचा उठाव आणीत होती...

लक्ष्मीनं डोळे भरून लेकीचं काम पाहिलं आणि त्या प्रवेशानंतरच्या प्रवेशासाठीं म्हणून जेव्हां दुसरा पडदा समोर आला, तेव्हां ती स्वतःशींच पुटपुटली, "माझी सखू ! ...खरंच तिच्या जीवनांतील प्रत्येक क्षणाला स्वतःच्या रक्षणासाठीं ती अशीच झगडायला तयार झाली पाहिजे... तिच्या मनगटांतील सामर्थ्य स्वतःच्या रक्षणासाठीं खर्चीं पडेल तरच मला खरं समाधान मिळेल... सखू ऽ ! ... "

पण तेवढ्यांत अंगावरचा दागिन्यांचा आणि इतर उपकरणांचा साज

उतरून घाईघाईनं सखू लक्ष्मी बसली होती तिथं आली. तिनं मोठ्या उत्सुकतेनं लक्ष्मीला विचारलं, " जमलं काग आई?"

" फारच छान." लक्ष्मीनं या शब्दांत सखूला शाबासकी दिली आणि तिच्या पाठीवर थोपटल्यासारखं केलं.

सखूच्या शाळेचं वार्षिक स्नेहसंमेलन चालू होतं. त्यासाठीं मुलींच्या विविध कार्यक्रमांची आंखणी करून पालकांना बोलाविण्यांत आलं होतं. लक्ष्मीहि त्या निमित्तानंच आज तिथं आली होती. निर्मलाबाईहि तिच्याच शेजारीं बसल्या होत्या. सखूला शाबासकी देऊन त्या लक्ष्मीला म्हणाल्या, " आतां ही कॉलेजांत गेली ना पुढच्या वर्षी म्हणजे मग..." पण त्यांचं बोलणं पुरं होण्यापूर्वीच लक्ष्मी घाईघाईनं म्हणाली, "छे छे! मी तिला कॉलेजांत पाठविणार नाहीं!"

" कां?"

" नको. करायचं काय जास्त शिकून तरी? शिक्षणापेक्षां सखूनं स्वाभिमानानं जगायला शिकावं, स्वतःचं रक्षण करण्याचं सामर्थ्य तिनं कमवावं, अशी माझी फार इच्छा आहे."

लक्ष्मीची एकंदर मिळकत ध्यानांत घेतली असतां सखूला कॉलेजांत पाठवून तो खर्च तिला निभणार नाहीं; आणि त्या हेतूनंच ती तसं म्हणाली असावी हें लक्षांत घेऊनच निर्मलाबाई म्हणाल्या, " केवळ त्यासाठीं कॉलेज नको?... ह्यांनीं त्या दिवशीं भाऊबीजेला तुम्हांला जी ओवाळणी घातली त्याचं तर हें उत्तर नाहीं?"

नानासाहेबांनीं आणि सदानंदानं लक्ष्मीला आसरा दिला. त्यांचं सर्वांच येणं जाणं वाढत गेलं, परिचय दृढ होत गेला; आणि आतां तीं सर्वजण एकमेकांशीं एकाच कुटुंबांतल्या माणसांप्रमाणं वागूं लागलीं होतीं!... त्यांचीं मनं एकमेकांशीं आतां खुल्यादिलानं हितगुज करूं शकत होतीं... अगदीं खेळीमेळीचं वातावरण आतां त्यांच्यांत निर्माण झालं होतं...परकेपणाचा लवलेशहि तिथं आतां उरला नव्हता.

पण जगाला मात्र त्याचा खरा अर्थ कळला नसावा!...नानासाहेब लक्ष्मी....होय, तीं एकमेकांशीं ज्या निःसंकोच मनानं वागत होतीं,

त्याचाच जगानं निराळा अर्थ केला होता !...राघूअण्णांनीं आपल्या आगलावी स्वभावाचा उपयोग करून घेऊन लक्ष्मीवर सूड उगवायचा डाव आखला होता ! भेटेल त्याला ते आपल्या मिठ्ठास वाणीनं भुरळ पाडून सांगत होते, 'अरे बाबा, अंदरकी बात फार निराळी आहे ! स्वतः ह्या डोळ्यांनीं पाहिलंय ! शिव शिव !'...

खरं पाहिलं तर राघूअण्णावर कुणाचा विश्वास बसेल अशी कांहीं ती व्यक्ति नव्हती. पण ज्याअर्थी हा गृहस्थ छातीठोकपणानं असं सांगतोय त्याअर्थी यांत कांहीं तरी मख्खी असलीच पाहिजे असं पुष्कळांना वाटलं तर त्यांत नवल कसलं ? ... नाहींतरी जिथं आपला अर्थाअर्थी प्रत्यक्ष संबंध येत नाहीं तिथं गंमत पहायला जगाचं काय जातं ? आणि जी बाई नवऱ्याला आणि घरादाराला सोडून खुशाल परक्या ठिकाणीं येऊं शकते, ती असं कांहीं करणार नाहीं हें तरी कशावरून ?...आणि तसंच पाहिलं तर अशा अनोळखी बाईला एवढी आपुलकी नानासाहेबांनीं तरी कां म्हणून दाखवावी ? ... लोक असा विचार करीत होते !

माणसाच्या जिभेला हाड नसतं असं जें म्हणतात तें अशा वेळीं खरं वाटायला लागतं !

लक्ष्मीबद्दल आणि विशेषतः नानासाहेबांबद्दल गांवांत अलिकडे अशी गुणगुण चालली होती ! लक्ष्मीच्या कानावर ही बातमी आल्यापासून ती दिवसेंदिवस गंभीर होत चालली. आपण इतकं व्यवस्थित वागूनहि जग असं बोलत असेल तर त्याला भीक घालण्यांत अर्थ नाहीं, हें तिला पटत नव्हतं असं नाहीं. पण उद्यां जर प्रत्यक्ष तिच्या मुलांनींच तिला तसं विचारलं असतं तर ?....तर ती काय सांगणार होती ?...छे, मुलांची समजूत घालणं तिला मोठं कठिण होऊन बसलं होतं...

आणि त्यासाठीं लक्ष्मीनं आतां आपल्या मनाशीं निश्चित ठरवून टाकलं होतं कीं, काय वाटेल तें झालं तरी आतां परिस्थितीवर मात करूनच खरं समाधान मिळवायचं ! मग जग काय वाटेल तें म्हणो...

आपल्याप्रमाणंच आपल्या लेकीनंहि जगाशीं टक्कर द्यायची तयारी

करायला हवी अशी लक्ष्मीची मनोदेवता तिला बजावीत होती...आणि म्हणून तिनं ठरवून टाकलं कीं, सखू मॅट्रिक झाली कीं तिचं शालेय शिक्षण बस्स ! ...नानासाहेबांनीं भाऊबीजेची ओवाळणी म्हणून तिला ज्या वेळीं बालवीराच्या बिल्ला कोरलेल्या बांगडया घातल्या, त्यावेळीं ते म्हणाले होते, "तुमच्या उजव्या हातांत ह्या असूं देत. तुमचं मनगट कणखर झालं पाहिजे आणि तें सामर्थ्य यामुळं येईल...हजारों बालवीरांचं सामर्थ्य त्यांच्या पाठीशीं आहे ! " ...आणि त्याच भावनेनं लक्ष्मीनंहि त्या बांगडया आपल्या हातांत सरकावल्या होत्या...तिच्या बाबतींत नानासाहेबांनीं दर्शविलेली ती अपेक्षा तिला आतां सखूबद्दल जास्त वाटूं लागली होती.

अलिकडे सखूला न्हाऊं घालतांना जेव्हां ती मोठी होत चालल्याचं लक्ष्मीच्या ध्यानांत आलं होतं तेव्हांपासूनच तिच्याबद्दल तिला विशेष काळजी वाटूं लागली होती...चांगलं स्थळ मिळून ती सुस्थळीं कशी पडेल असा तिच्या माहेरच्या माणसाप्रमाणंच तिच्यापुढंहि प्रश्न होता.

ज्या ज्या वेळीं लक्ष्मी सखूबद्दल विचार करी त्या त्या वेळीं तिला वाटूं लागे कीं, स्थळ तिच्या नशिबानं कसं कां मिळेना पण वेळ आली तर मात्र सखूनं निर्भयपणानं जगायची तयारी ठेवायला हवी...बाबूरावांच्या तऱ्हेवाईकपणाची झळ तिला स्वतःला चांगलीच सोसावी लागल्यामुळं स्वानुभवानं तिचं हें मत बनलं होतं...आईच्या जिव्हाळयानं ती सखूचं भविष्य मापीत होती ना ? म्हणून सखूनं जास्त शिकण्यापेक्षा सैंपाकांत तरबेज व्हावं, चांगलं शरीरसामर्थ्य कमवावं, शक्य तर घोडयावर बसणं, पोहणं या कला अंगीं बाणवून ठेवाव्यात, अशी तिची मनापासूनची इच्छा होती. मग गाणं, विणकाम, लेखन असलं तिला कांहीं एक आलं नाहीं तर बेहत्तर अशी तिची समजूत ! ...त्यामुळं झाशीच्या राणीचं काम सखूनं चांगलं वठवतांच तिला मनस्वी आनंद झाला. आपल्या तिच्याबद्दलच्या स्वप्नाला साकार रूप सखू देईल या आनंदांतच तिनं निर्मलाबाईंना सांगून टाकलं होतं कीं, आतां तिला आपण कॉलेजांत धाडणार नाहीं म्हणून !

एखादा बेत मनांत आंखला तरी तो पार पाडण्याची शक्यता दिसेपर्यंत

लक्ष्मी त्याबद्दल कुणाजवळच बोलत नसे. तशीच वेळ आतांहि आली होती. म्हणून निर्मलाबाईनीं नानासाहेबांनी लक्ष्मीला दिलेल्या बांगड्याची आठवण देतांच ती म्हणाली, "तसंच कांहीं नाहीं! ...गोविंदाचा खर्च भागवतां भागवतां कसं होतंय तें पहातांच! नि मग हें आणखी कशाला वाढवूं उगाचच?"

त्यानंतर तिथं जमलेल्या माणसांत फार बोलणं शिष्टाचाराला धरून नसल्यामुळं त्या दोघीहि गप्प बसल्या. अखेर घरीं जातेवेळीं मुलींच्या कार्यक्रमांतील आवडलेल्या गोष्टींचं कौतुक करून झाल्यावर निर्मलाबाईनीं पुन्हां तो प्रश्न काढलाच.

"नुसता फीबद्दलचाच प्रश्न असेल तर ह्यांना सांगीन मी हवं तर. माधुरी जाणार आहेच. तिच्याबरोबर जाईल ही पण!"

"बोललांत त्यांतच आनंद आहे."

"म्हणजे? मी खरंच म्हणतेंय हें!"

"असेल कीं! त्याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं. पण माझं आपलं ठाम मत आहे कीं, माणसानं पचेल तेवढंच खावं."

"तें खरं, पण आपणाला पचेल कोणतं किंवा पचणार नाहीं कोणतं हें तरी कशावरून ठरवायचं अगोदर? एखादी गोष्ट आज घडली म्हणून त्याबाबत पुढंहि तसंच गृहित धरायचं अशी तर आपली समजूत नाहीं?"

त्यावर एक उसासा टाकून लक्ष्मी म्हणाली, "पुढचं कुणी सांगावं! निदान आज जें दिसतंय, जें घडतंय, त्याबद्दलतरी विचार करायला नको?"

● ● ●

आरशासमोर उभं राहून नानासाहेब आपला हिरवा फेटा बांधीत होते. मनासारखा फेटा बांधून झाला अशी खात्री झाल्यावर त्यांनीं उरलेला शेमला उजव्या हातानं खोचून दिला; आणि मग दोन्ही हातांनीं फेट्याची बैठक कपाळावरच्या बाजूनं सारखी करून घेतली. गळ्या-भोंवतालचा हिरवा स्कार्फ, छातीच्या डाव्या बाजूवरचे खिशावरचे

बिल्ले, डाव्या हातावर लटकावलेली शिटेची दोरी, बरोबर न्यायची तात्पुरत्या उपचारांची पेटी वगैरे सारं जियल्या तिथं झाल्यावर त्यांनीं कपाळापासून इंच दीड इंच उंचीवर मोराचं पीस असलेला बिल्ला आरशांत पहात फेट्यावर नीट लावला आणि पायांतील मोजे व्यवस्थित असल्याची खात्री करीत त्यांनीं आपल्या खोलीच्या बाहेर पाऊल टाकलं.

तेवढ्यांत निर्मलाबाई गडबडीनं बाहेर येत म्हणाल्या, " ऐकलंत का ? आत्तांच फोनची रिंग वाजूं लागलीय. तेवढा फोन घ्या बरं. मी पोळ्या करायला बसलेंय नुकतीच. "

" अच्छा " असं म्हणत नानासाहेब घरांत आले आणि आंतल्या खोलींत जाऊन त्यांनीं रिसीव्हर उचलला.

फोन मधून आवाज आला, 'हॅलो ऽ ऽ '

नानासाहेबांनीं प्रत्युत्तर दिलं, ' हॅलो ऽ ऽ ! '

" कोण नानासाहेब कां ? "

" हां हां, मीच ! ...अच्छा, अच्छा. सदानंद, काय भानगड ? अं !....काय म्हणतोस!...बोट बुडाली ?...बरं मग ?...अस्सं ! म्हणजे तूं जातोस तिकडे गाडी घेऊन ?...ठीक आहे. आलोंच मी...हं हं, आलं ध्यानांत...आलोंच हं ! "

फोनमधून आलेली बातमी नानासाहेबांनीं निर्मलाबाईंना गडबडीनं सांगितली आणि ते अगदीं घाईनं घराबाहेर पडले.

त्यावेळीं सकाळचे आठ साडे आठ झाले असतील. अपेक्षेपेक्षां समुद्र अधिक खवळून गेल्यामुळं आणि वाजवीपेक्षां जास्त माणसं बोटीवर चढविल्यामुळं मुंबईहून गेलेली रत्नागिरी मार्गावरची बोट एकाएकीं बुडाली होती !...कप्तानानं शिकस्त करूनहि शेंकडों लोकांना उराशीं कवटाळून बोटीनं समुद्राचा तळ गांठला होता !...सुदैवानं लाईफ बेल्टच्या सहाय्यानं बोटींतून प्रसंगावधान राखून उड्या टाकलेले कांहीं लोक समुद्रांत तरंगत होते... बोट बुडतेवेळीं घाबरून गेल्यामुळं हृदयाला

पिळवटून टाकणाऱ्या निघालेल्या असंख्य माणसांच्या कर्णकर्कश किंकाळ्या अजूनहि त्यांच्या कानांत घुमत होत्या...त्यामुळं स्वतःचं अस्तित्व उरल्याचंहि भान त्यांना राहिलं नसावं एवढे ते लोक डोळे फाडफाडून समोरचं सागराचं भव्य स्वरूप पहात होते आणि क्षणार्धात डोळे मिटून त्या प्रसंगांतून आपणाला वांचविण्यासाठीं परमेश्वराजवळ टाहो फोडीत होते...आसपासचा सारा समुद्रकिनारा जलसमाधि घेतलेल्या माणसांच्या आप्तेष्टांच्या आक्रोशानं दणाणून गेला होता...प्रत्येकजण आपला माणूस तरंगतांना दिसतोय किंवा नाहीं हें मोठ्या आशेनं दूरवर पहात होता....

वरून मुसळधार पाऊस आणि भोंवतीं कमालीचा चिखल अशा स्थितींत किनाऱ्याला लागलेलीं माणसं बाहेर खेंचून घेण्यांत बालवीरांची धांदल उडाली होती. कुणी लहान लहान पडाव हाकारून तें भराभर वल्हवीत पुढं जाऊन फळकुटाच्या आधारावर तरंगणाऱ्या माणसांना बांचविण्याची शिकस्त करीत होते तर कुणी बोट बुडालेल्या जागीं कुणी दिसेल कां ह्या वेड्या आशेनं अपघाताच्या तपासासाठीं जमलेल्या अधिकाऱ्यांशीं विचारपूस करीत होते...

'पाटीलमळ्या' पासून दहापंधरा मैलांवर समुद्र होता. ही अपघाताची बातमी समजतांच नानासाहेब पंचवीस तीस बालवीरांची एक तुकडी घेऊन मोटारीनं त्याजागीं गेले होते. आयुष्याची दोरी मोठी बळकट म्हणून खवळलेल्या समुद्रावर देखील मात करून सुदैवानं जगलेले कांहीं लोक किनाऱ्यावर येतांच भांबावून जाऊन सगळीकडे पहात होते... हत्तीसारख्या मोठ्या लाटेच्या तडाख्यांत सांपडल्यामुळं नाकातोंडांत वरचेवर पाणी जाऊन गुदमरून गेलेलीं तीं माणसं अर्धमेलीं झाल्यासारखीं दिसत होतीं. बराच वेळ पाण्यावर तरंगत राहिल्यामुळं गारठलेल्या माणसांना शेकोटीची आवश्यकता तीव्रतेनं भासत होती; आणि कित्येकांची तर वेळेवर औषधोपचार झाला, तरच जगणं शक्य आहे अशी अवस्था झालेली !...

नानासाहेबांनीं शक्य असेल तेवढया माणसांना तात्पुरता उपचार

केला आणि घरीं परततां येईल तितक्या वेगानं ते त्यांपैकीं कांहीं माणसांना घेऊन परतले...

समुद्रकिनाऱ्यावर ज्यांचं कुणी आलं नव्हतं, ज्यांच्या अपघाताची अद्याप कुणाला जाणीवहि नव्हती आणि ज्यांच्या नांवगांवचा कुणाला पत्ता लागत नव्हता, अशा माणसांना नानासाहेबांनीं उपचारासाठीं म्हणून आपल्या दवाखान्यांत आणलं होतं. त्यांपैकीं एका रोग्याची, म्हणजे त्या अपघातामुळं रोगी होण्याची ज्याच्यावर पाळी आली होती अशा माणसाची, प्रकृति विशेष चिंताजनक होती.

नानासाहेबांनीं डोळ्यांत तेल घालून शक्य ते सारे उपचार करीत त्या माणसाला शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न चालविले होते. त्याच्या नाकातोंडांतून पोटांत शिरलेलं पाणी त्यांनीं काढून टाकलं होतं... एकदां तर अत्यंत जरूरी भासल्यामुळं त्यांनीं त्यास प्राणवायूचाहि पुरवठा केला होता...

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पाऊस उघडला होता. लख्ख ऊन पडलं होतं. हवा मनाला समाधान देणारी पडली होती. त्यामुळं बऱ्याच रोग्यांना आराम पडलेला दिसत होता...कालचा तो चिंताजनक अवस्था प्राप्त झालेला रोगी नानासाहेबांच्या अविश्रांत प्रयत्नामुळं बचावला होता...त्याला आतां बरीच शुद्धि येत चालली होती...

इंजेक्शनची तयारी करून त्या रोग्याजवळ येत नानासाहेब म्हणाले, " कसं काय ? बरं आहे ना ? " सदानंद त्यांच्या शेजारीं उभा होताच. त्यानं जेव्हां त्या रोग्यानं मानेनंच खूण करून "ठीक आहे" असं म्हटलं तेव्हां सदानंदानं त्या रोग्याकडे थोडंसं बारकाईनं निरखून पाहिलं... कां कुणास ठाऊक पण त्यावेळीं तो थोडासा दचकून मागें सरला ! नानासाहेबांच्या जेव्हां तें ध्यानांत आलं तेव्हां त्यांनीं त्याला विचारलं,

" कां ? कांहीं विशेष ? "

" पण... आलोंच हं ! "

कांहींतरी बोलायचं म्हणून सदानंद असं बोलला आणि तिथून बाहेर गेला. नानासाहेबांना त्याचं हें वागणं फार चमत्कारिक वाटलं. म्हणून

त्या रोग्याच्या हातावर इंजेक्शनसाठीं आयोडीनचा बोळा त्यांनीं परिचारिकेला फिरवायला सांगितला आणि ते गडबडीनं बाहेर येत सदानंदाला म्हणाले, " काय भानगड आहे रे ? असा कां दचकलास ?"

तो रोगी म्हणजे लक्ष्मीचा पति, बाबूराव, असावा असं जेव्हां नानासाहेबांना सदानंदकडून समजलं तेव्हां ' अस्सं ! ' असं म्हणूनं ते चटकन् आंत आले. त्यांनीं त्या रोग्याकडे निरखून पाहिलं आणि मग इंजेक्शन दिल्यावर त्याला विचारलं, " आपलं नांव ? "

तो रोगी बराच थकलेला दिसत होता. तशांत इंजेक्शनचा त्रास त्याला अधिक जाणवल्यामुळं ' अग आईग ! ' म्हणत तो थोडासा कुशीवर झाला. त्याला बरं वाटावं म्हणून नानासाहेबांनीं इंजेक्शनची जागा आपल्या हातानं थोडीशी चोळली आणि पुन्हां म्हटलं,

" नांव सांगा ना तुमचं ! आमच्या इथं नोंद करावी लागते तशी."

अंगावरची चादर किंचितशी वर ओढून आंतल्या आवाजांत तो रोगी म्हणाला, " बाबूराव शिंदे...बिहागला असतों मी नेहमीं !..."

त्या रोग्याच्या नांवाचा आणि गांवाचा पत्ता ऐकून नानासाहेब आश्चर्यानं कपाळावर आठ्या चढवीत तिथून बाहेर पडले आणि स्वतशींच पुटपुटले, " असं आहे तर !... "



## पुनर्भेट

## १७

" कोण ?...आबा !...तुम्ही इथं कसे ? "

नानासाहेबांच्या दवाखान्यांतून नवे नवे रोगी पहात माधुरीबरोबर सखू फिरत होती. एकेका माणसाची चौकशी करीत बाबूरावांच्याजवळ त्या दोघी जेव्हां आल्या तेव्हां त्यांना बघून सखूनं बिलक्षण आश्चर्य व्यक्त करीत असं म्हटलं. त्यामुळं तितक्याच आश्चर्यानं पडल्या पडल्या बाबूरावांनीं त्या दोघींकडे पाहिलं. सखू आतां साडी नेसण्याइतकी मोठी झाली असेल अशी त्यांची कल्पना होती. पण प्रत्यक्ष त्या स्थितींत तिलाच पाहिल्यावर मात्र त्यांचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. यौवनांत प्रवेश केलेली सखू परकरांतल्या सखूपेक्षां निराळी दिसणं स्वाभाविक नव्हतं का ?...आणि त्याच फरकामुळं तिचे वडील तिला चटकन् ओळखूं शकत नव्हते !... पण प्रत्यक्ष तिनंच त्यांना ' आबा ' म्हणून संबोधल्यामुळं तिच्या आवाजावरून त्यांची खात्री झाली होती कीं, ती सखूच असावी. तिच्याकडे आणखी त्यांनीं निरखून पाहिलं तेव्हां सखूच्या डोळ्यांची, ओठांची, हनुवटीची आणि केसांची ठेवण त्यांना ओळखीची वाटली. म्हणून सखूबरोबर असलेल्या माधुरीकडे पहात त्यांनीं तिला अडखळतच विचारलं, " आणि तूं !... तूं कशी इथं ?... गोविंदा ! ...लक्ष्मी !... "

क्षणार्धांत त्या मायलेकरांची एकमेकांशीं पुरती ओळख पटली आणि त्यांनीं एकमेकांविषयीं मोठ्या आपुलकीनं चौकशी केली. फार दिवसांनीं भेटलेल्या आपल्या वडिलांकडे प्रेमळ नजरेनं पहात सखूनं माधुरीला सांगितलं, " हेच आमचे आबा. "

" अय्या !...आणि...आतां बरं वाटतं काहो तुम्हांला ? "

कमालीचं आश्चर्य दर्शवीत आणि त्यामुळं गोंधळून जात माधुरीनं अडखळत उच्चारलेले हे शब्द कानावर पडले, तेव्हा मंदस्मित करून तिच्याकडे पहात बाबूराव म्हणाले, " ही कोण ? तुझी मैत्रीण ? "

" अं !...हो. आणि हे जे डॉक्टर असतात ना इथं, त्यांची मुलगी. "

" असं का ? नांव काय बाळ तुझं ? "

" माधुरी. "

" रहातां कुठं तुम्ही ? "

" आमच्या घराशेजारींच सखू रहाते कीं ! आणि तुम्हाला माहीत नाहीं ? "

माधुरी एकदम बोलून गेली. त्यामुळं तिची बाजू सावरून घरीत सखू म्हणाली, " इश्श ! तें ग कसं त्यांना ठाऊक ! आत्तांच तर आमची गांठ पडली...आबा, कसं वाटतं हो आतां तुम्हांला ? बरं आहे ना ? आमचे नानासाहेब फार चांगले आहेत. ते तुम्हांला लौकर बरं करतील...आणि तुम्ही घरीं कधीं येणार ?...आईला बोलावून आणूं ?"

वडील अचानक भेटल्यामुळं सखूला त्यांना काय विचारूं नि काय नको असं होऊन गेलं होतं. त्यामुळं एवढं बोलून तिथं क्षणभरहि न थांबतां ' आलेंच हं ! ' असं म्हणत ती बाहेर पळाली.

अपघाताच्या धक्क्यामुळं बाबूराव बरेच थकले होते. अशावेळीं आपल्या घरचीं माणसं आपणाला भेटावींत याचं त्यांनां समाधान झालं असावं !...म्हणून त्यांनीं समोर उभ्या असलेल्या माधुरीला म्हटलं, " त्या खुर्चीवर बसा ना. "

बाबूरावांबद्दल सखूनं माधुरीला बरंच सांगितलेलं होतं. त्यामुळं ती थोडी भीत भीतच त्या खुर्चीवर बसली. तेव्हां बाबूराव पडल्या पडल्याच तिच्या बाजूच्या कुशीवर वळून म्हणाले, " आमची सखू इथं कशी ? "

" म्हणजे ! इथंच तर असते ती ! "

" इथंच असते ! "

" हो ! कां ? "

" केव्हांपासून ? "

" खूप दिवस झाले. "

" असं ! आणखी कोण कोण असतं तिच्याबरोबर ? "

" तिची आई आणि ती अशा दोघीच इथं असतात. गोविंदा असतो पुण्याला. "

" आणि आमचा राजा ?... "

" राजा ? "

" हो. तो लहान होता तो ! "

राजाबद्दलच्या कुतुहलानं बाबूराव असं म्हणाले, तेव्हां माधुरी चटकन् उठून उभी राहिली. तिचा चेहरा कावराबावरा झाला. तिनं सान्या खोलीभर नजर टाकली आणि अगदीं हळू आवाजांत म्हटलं, " तो गेला केव्हांच... "

" कुठं ? "

बाबूराव उठायचा प्रयत्न करीत आश्चर्यानं असं म्हणाले. त्यामुळं त्यांना निजायला सांगत माधुरीनं घडलेली सर्व हकीगत सांगितली... बाबूरावांचा गंभीरपणा पुन्हां त्यांच्याठिकाणीं आला...पण तोंडावर तसं न दाखवतां ते माधुरीला म्हणाले, " सखूची आई काय करते ?... त्यांना पैसे कोण देतं ? "

" पैसे !...हं ! त्यांच्या त्याच मिळवतात. दुसरं कोण देणार ? "

" हो का ?...आणि काय करते ती ? "

" भावल्या करून विकतात ! "

" खरं म्हणतेस ? "

" हो ना. फार चांगली आहे नाहीं सखूची आई ? आम्ही सगळीः त्यांना ' ताई ' म्हणतों. "

बाबूरावांना माधुरीकडून लक्ष्मीची माहिती बरीचशी मिळाली. आणखी कांहींतरी त्यांना विचारायचं मनांत यायला आणि सदाः तिथं यायला एकच गांठ पडली.

बाबूरावांच्या शेजारीं माधुरीला बसलेली बघून सदानंद चपापत त्यानं हातानंच खूण करून माधुरीला विचारलं, " इथं कशाला बसल तूं ? " त्यावर ' बरं का सदानंद, हे आपल्या सखूचे बडील असं म्हणत माधुरी सदानंदाजवळ आली. त्यानं तिला बाहेर नेः म्हटलं,

" तुला कुणीं सांगितलं ? "

"सखूनं स्वतःच !...ती आपल्या आईला बोलवायला गेलीय. आ ताई येतील ना एवढ्यांत !... "

" खरं म्हणतेस ? ...आणि... ते गृहस्थ आणखी कांहीं म्ह होते ? "

" हो. त्यांनीं खूप खूप विचारलं. "

" मग ? "

" ते विचारतील तें मी सगळं सांगून टाकलं ! "

" सगळं ?...काय काय सांगितलंस ? "

" ताई इथं आल्यापासूनचं सगळं !..."

हें ऐकून सुरुंग उडून एकाद्या मोठ्या पर्वताला भगदाड पडावं सदानंदला झालं...लक्ष्मी समोर दिसली कीं, बाबूराव काय व बडबड करतील याची धास्ती वाटून, सदानंद तिथून गडबडीनं कळवायला म्हणून नानासाहेबांकडे गेला.

त्यावेळीं कांहींतरी जरूरीचं काम करीत नानासाहेब घरीं बसले हो सदानंद पळत आल्यामुळं दम छातीत त्यांच्यासमोर गेला आणि म्हणाः

नानासाहेबांना सखू आपल्या वडिलांना भेटल्याची दाद नव्हती. त्यामुळं निर्विकार चेहऱ्यानंच ते म्हणाले, " काय म्हणतो आहेस ? "

" अहो, सखू आपल्या वडिलांना भेटली ! "

" केव्हां ? "

" आत्तां थोड्यावेळापूर्वी ! आणि आतां म्हणे ती आपल्या आईला बोलवायला गेलीय खोलीवर ! "

बाबूराव आपल्या दवाखान्यांत आल्याचं ठाऊक असूनहि नानासाहेबांनीं ती गोष्ट अजून लक्ष्मीच्या कानांवर घातली नव्हती. त्यामुळं बसल्या जागेवरून उठत त्यांनीं सदानंदला विचारलं, " आणि मग आतां ? "

● ● ●

सोसाट्याचा वारा सुटावा, प्रचंड वादळ निर्माण व्हावं, मोठाल्या गारांचा धो धो पाऊस पडावा, दुष्काळ पडलेल्या, रानावनासारख्या भासणाऱ्या, प्रदेशांतून प्रवास सुरू व्हावा; जोरानं विजा कडकडाव्यांत, तोफांचे गोळे सुटल्यामुळं आसपासच्या प्रदेशास जोराचा हादरा बसावा, डोक्यावर बॉंबची वृष्टि चालू असतांना सैरावैरा धावून जीव वाचवण्या-साठीं माणसांचा गोंधळ उडावा, कसल्या तरी भयंकर प्रसंगाचं उग्र स्वरूप पहात धीमेपणानं जातांना माणसाला पुढची पाऊलवाट दिसावी आणि अशावेळीं तिथून एखाद्यानं बेदरकार मनानं पुढचा मार्ग आक्रमावा अशाच कांहींशा थाटांत बाबूरावांची बातमी समजतांच अशावेळीं त्यांना भेटणं जरूर म्हणून लक्ष्मी निघाली होती...

समुद्रावरच्या अपघातांत बाबूराव सांपडले होते हें ऐकायला मिळाल्यामुळं तिला आपल्या डोळ्यांसमोर खवळलेल्या अफाट सागराचं तांडव नृत्य चाललेलं दिसत होतं, हत्ती एवढाल्या लाटा माणसांना पोटाशीं कवटाळतांना ती पहात होती...त्यावेळीं सागराच्या तळाशीं गडप झालेल्या शेंकडो माणसांचा आक्रोश तिच्या कानांत घुमत होता...

आणि त्या सर्व भयंकर प्रसंगांतून निभावलेल्या आपल्या पतीची अवस्था कशी असेल ह्या काळजीनं झालं गेलं सारं विसरून ती दवाखान्याकडे निघाली होती.

जातां जातां सखू लक्ष्मीला म्हणाली, " अग आई, मला आबांनीं प्रथम ओळखलंच नाहीं ! मी मात्र त्यांना लगेच ओळखलं बघ..."

"आणखी काय काय म्हणाले ग ते ?" लक्ष्मीनं उत्सुकतेनं विचारलं. वडील भेटल्याच्या आनंदांत सखू गुंग होती. ती समाधानानं म्हणाली, " ते म्हणाले कीं, तूं इथं कशी ?...रहातेस कुठं ? दादा, आई कुठं आहेत ?...आणि..."

त्यावेळीं राजाची आठवण झाली म्हणून सखू बोलतां बोलतां थांबली. लक्ष्मीनं तें ओळखलं... एक दीर्घ सुस्कारा सोडून तिनं दवाखाना गांठला.

लक्ष्मी समोर आलेली दिसतांच बाबूरावांनीं अपराधी नजरेनं तिच्याकडे पाहिलं....डोळ्यांत जमा झालेलीं आसवं पदरानं टिपीत लक्ष्मी त्यांच्याजवळ आली... त्या दोघांनीं एकमेकांकडे पाहिलं !... दोघंहि गोंधळून गेलीं...

धडधडत्या अंतःकरणानं लक्ष्मीनं बाबूरावांना हळूच विचारलं, "कसं वाटतंय आतां ?"

गेलं झालं सारं कांहीं विसरून लक्ष्मीनं इतक्या आपुलकीनं उच्चारलेले हे शब्द बाबूरावांना फार मोलाचे वाटले. जगांत आपल्याला कुणीहि नाहीं अशा उदासीनवृत्तीनं लक्ष्मीनं घर सोडल्यापासून ते वागत होते. त्यामुळं एवढ्या जिव्हाळ्यानं आपल्या बायकोनं आपली चौकशी करावी याबद्दल त्यांना विलक्षण आनंद झाला...आणि त्या आनंदाच्या भरांतच ते उठायचा प्रयत्न करून लक्ष्मीकडे धांवले...सद्गदित कंठानं त्यांनीं तिला आंतल्या आवाजांत हांक मारली, " लक्ष्मी !... "

आणि त्याचवेळीं तिथं प्रवेश करून बाबूरावांना खालीं निजवीत नानासाहेब म्हणाले, "... हं हं ! अशी उठायची घाई नका करूं !... फार विश्रांति हवीय तुम्हाला अजून... "

नानासाहेबांचा हात आपल्या हातांत घेऊन बाबूराव म्हणाले, "विश्रांति ?... लक्ष्मी भेटली...हीच आतां माझी विश्रांति !..."

हें ऐकून सदानंद, नानासाहेब, स्वतः लक्ष्मी, माधुरी आणि सखूहि चपापली. एकमेकांकडे त्यांनीं आश्चर्यानं पाहिलं तेव्हां बाबूरावच सद्गदित आवाजांत पुन्हां म्हणाले, "आज मला खरा आनंद झाला... ...पण...पण यावेळीं माझा राजा हवा होता !..."



## स्वप्न

## १८

राजेंद्राचा परिचित शब्द कानांवर पडतांच सखूच्या सर्व भावना उचंबळून वर उसळल्या !...आनंद, दुःख, अशा, निराशा, लज्जा वगैरे विविध मनोविकार तिच्या चेहऱ्यावर आलटून पालटून उमटून गेले...झटकन् मान वळवून मार्गे पहात ती म्हणाली, "केव्हां आलास ?"

गांवाबाहेरच्या बागेंत येऊन सखू बराच वेळ कसलासा विचार करीत बसली होती. त्या नादांत आपण तिथं किती वेळ येऊन बसलों आहोंत याचं तिला भान राहिलं नव्हतं...आणि म्हणून आपण सकाळीं पुण्याहून आलों तरी सखू अजून भेटत कशी नाहीं याचा शोध मनाशीं लावीत राजेंद्र तिला भेटायला म्हणून तिकडे आला होता.

संध्याकाळ होत चालली होती. त्यामुळं आभाळांतील बदलत्या रमणीय कलाकृति पहात राजेंद्र सखूजवळ येऊन बसला आणि तिच्या सुकलेल्या चेहऱ्याकडे पहात म्हणाला, "सकाळींच आलोंय कीं !... आणि आज तूं अशी का ! एकटीच कां इकडे येऊन बसलीस ?...बरं नाहीं ?"

कां कुणास ठाऊक, राजेंद्राचं हें बोलणं कानावर पडत असतांना सखू एकाएकीं हुंदके देऊन रडूं लागली...तिनं असं कां करावं हें

राजेंद्राला कळेना ! कावऱ्याबावऱ्या मनानं इकडे तिकडे पहात त्यानं तिला विचारलं, " हें काय भलतंच !...सखूऽ...देवी !..."

राजेंद्रानं आपणाला 'देवी' कां म्हणावं हें ध्यानांत न आल्यानं आलेला हुंदका आवरीत सखू म्हणाली, " देवी कुणाला म्हणालास ?"

" माझ्या देवीला..."

" तुझी ?...कुठं आहे ती ? "

" इथंच ! "

" इथंच ?...म्हणजे ? "

" इथं, माझ्यासमोर."

राजेंद्र मनांतलं बोलून गेला. सखूनं चमकून त्याच्याकडे पाहिलं... ती गोंधळून गेली...त्या वेळचे तिचे सारे भाव निःशब्द झालेले बघून राजेंद्रच पुन्हां म्हणाला, " मी जवळ असतांना देखील एवढी निराशा तुझ्या तोंडावर ?...काय झालं ?...मला नाहीं सांगणार ?..."

" राजेंद्र !..."

सखूच्या धडधडत्या अंतःकरणांतून आवाज आला...राजेंद्रानं सखूचा हात आपल्या हातांत घेऊन विचारलं, " बोलत कां नाहींस तूं आज ?.. मला न सांगण्यासारखं कांहीं..."

" कसं सांगू ?... आणि काय सांगू राजेंद्र !..."

" कां ? कांहीं विशेष ? "

" हूं ! पण..."

" बोल ना ! कळूं दे तरी..."

" आईनं...नको नको. तुला नकोच सांगायला."

एवढं बोलून सखू चटकन् तिथून उठली. राजेंद्राला तिचं हें वागणं चमत्कारिक वाटलं म्हणून तो आश्चर्यानं म्हणाला, " म्हणजे ? आज हा काय प्रकार चालवला आहेस तूं ? "

त्यावर बराच वेळ सखू शांत होती. राजेंद्र तिच्याजवळ बसून मनाशीं विचार करीत होता. त्याच्या मनांत सखूच्या वडिलांविषयीं विचार

चालले होते...अखेर ती शांतता असह्य झाल्यामुळं राजेंद्रच पुन्हां म्हणाला, " तुला एक गंमत दाखवूं ! "

" कसली गंमत ? "

एका क्षणांत सखूची निराशा विराम पावली. तिनं मोठ्या उत्सुकतेनं राजेंद्राकडे पाहिलं. तो खिशांतून कांहीं तरी बाहेर काढीत होता. तसं करतांना त्याच्या तोंडावर समाधान दिसत होतं !...

राजेंद्रानं एक सुंदरशी कर्णफुलांची जोडी बाहेर काढली. कोळयाच्या जाळयाप्रमाणंच पण अगदीं गोलार्धांत असलेल्या त्या कर्णफुलांच्या तारा दिव्यांच्या उजेडांत चमचमत होत्या. वरच्या बाजूला एक बारीकसा खिळा दिसत होता आणि त्या खिळयावर बोट दाबून राजेंद्र म्हणत होता, " बघ हं ! "

—भिर्रर...भिर्रर...असा बारीकसा आवाज आला...सखूनं कुतुहलानं त्या कर्णफुलाकडे पाहिलं तों जलदीनं फिरणाऱ्या त्या कर्णफुलांतील तारा चमचम करीतच अक्षरांतून दर्शवीत होत्या, " आय् लव्ह यू !... "

राजेंद्राबद्दल सखूला पहिल्यापासूनच थोडं आकर्षण होतं. तिला तो मित्र म्हणून मनापासून आवडत होता. शिवाय अगदीं मोकळ्या मनानं त्यांना बराचसा काळ एकत्र घालवायला मिळाल्यामुळं त्यांना एकमेकांचा स्वभाव ओळखतां आला होता. एकमेकांची आवडनिवड ते जाणून होते...पण एकमेकांबद्दल प्रत्यक्ष असं बरं वाईट ते अजून एकमेकांजवळ बोलले नव्हते ! ...आजवर त्यांना त्याची जरूरीहि भासली नव्हती ...

पण आज राजेंद्रानं मोठ्या युक्तीनं प्रकट केलेला भाव ध्यानांत येतांच सखू लाजली. तिनं आपल्या माथ्यावरचा पदर नीट सावरला आणि नकळत म्हटलं, " राजेंद्र ! ... एवढं भाग्य आहे माझं ?...तूं...आणि... "

अंधार पडल्यामुळं बागेंतील दिवे केव्हांच लागले होते. त्या प्रकाशांत राजेंद्र मनांतलं स्वप्न पहात होता...

मनाच्या बोहल्यावर चढून राजेंद्रानं सखूला लग्नमाळ घातली होती...

सप्तपदी पार पाडण्यासाठीं म्हणून तो तिच्या हाताला धरीत पुढं निघाला होता...आयुष्याच्या प्रवासाला त्या दोघांनीं घोड्यावर बसून आप्तेष्टांचा आशीर्वाद घेत सुरवात केली होती...मनासारखा जोडीदार मिळाला म्हणून तीं दोघं अभिमानानं एकमेकांकडे पहात म्हणत होतीं, " हें स्वप्न तर नाहीं ना ? ... कीं... "

...आणि आपल्या या स्वप्नाचं आविष्करण जेव्हां त्या कर्णफुलांच्या जलद आवर्तनांतून राजेंद्रानं प्रकट केलं तेव्हां सखूच्या मनाची उडालेली धांदल बघून तो म्हणाला, " होय. ...आतां तूं आणि मीच... मी तुला आणि तूं मला...बस्स !... देवि, पण तुझी संमति आहे ना ?... आवडली माझी ही भेट तुला ?... नाहीं तर... "

लक्ष्मीनं आपलं लग्न ठरवायचा विचार चालविला होता म्हणून सखू अस्वस्थ झाली होती. तिला मनापासून वाटत होतं कीं, उगाच कुणाच्या तरी गळ्यांत माळ घालण्यापेक्षां लग्न न केलेलंच अधिक बरं !... आणि प्रौढ होत चाललेल्या मुलीला एकदां योग्य तो पति मिळवून देऊन रांकेला कसं लावतां येईल याचा लक्ष्मीला ध्यास लागला होता... मधून मधून या दोन टोकांना कसं सांधतां येईल याचा सखू विचार करूं लागली कीं उंचा पुरा, विद्येनं आणि विनयानं सुशोभित झालेला, हाडापेरानं नीटस, वर्णानं गोरागोमटा, गुणानं लाख माणसांत शोधण्यासारखा आणि माणुसकीच्या कसाला पुरेपूर उतरणारा राजेंद्र उगाचच तिच्या नजरेसमोर येत होता... ती त्याचा विचार करीत होती... त्यावेळीं तिला आपल्या कोड्याचं उत्तर मिळत होतं... पण प्रत्यक्षांत तें कितपत साध्य होईल याची साशंकता मनांत येऊन ती दिवसेदिवस बेचैन मात्र होत होती...पण राजेंद्रानं तिला दाखविलेली ती गंमत बघून तिच्या मनाला, भावनेला, राजेंद्राकडूनच साद मिळाली... आणि त्यानं प्रत्यक्षच जेव्हां तिला तसं विचारलं, तेव्हां लाजेनं लवलेली मान उंच करून राजेंद्राच्या डोळ्यांत पडलेलं त्याच्या अंतःकरणाचं प्रतिबिंब पाहायचा मोह मोठ्या शिताफीनं आवरीत ती म्हणाली, " स्वप्नांत तर नाहीं ना मी राजेंद्र ! ... "

● ● ●

दीर्घकालाच्या विरहानंतर भेट झाल्यावर एकदोन महिने बाबूराव आपल्या मुलांशीं आणि बायकोशीं फारच प्रेमानं वागले. जणूं कांहीं कांहींच झालेलं नाहीं इतक्या आपुलकीनं त्यांची होणारी ती वागणूक बघून सदानंद एकदां स्वतःशींच म्हणाला सुद्धां "माणसांत एकदम असा पालट होऊं शकतो ? ...ईश्वरा, खरंच तुझी लीला अगाध आहे ! ..." नानासाहेब तर राहून राहून आश्चर्यानं सदानंदला म्हणत होते, "छे इतका चांगला माणूस आणि असा होता म्हणतात ! अंहं ! शक्य नाहीं... ताईचीच कांहींतरी चूक असली पाहिजे..." आणि असं असतांना परिस्थितीचा बाऊ दाखवून लक्ष्मी असं वागली त्याअर्थी त्यांत तिचाच खात्रीनं कांहींतरी डाव असला पाहिजे अशी शंका निर्मलाबाईंच्या मनांत डोकावली होती ! ...बिचारी लक्ष्मीदेखील बाबूरावांच्या प्रेमळपणानं गोंधळली होती ! ...त्यामुळं एखादेवेळीं असला प्रेमळ नवरा सोडून आपण उगाचच घर सोडून आलों असा विचार तिच्या मनाला चाटून गेल्याशिवाय रहात नव्हता ! ...गोविंदाला आणि सखूला वडिलांच्या प्रेमळ वागण्यानं गुदमरल्यासारखं वाटत होतं ! चांगला खाऊ देण्यासाठीं आईला मरणप्राय दुःख देणारे आपले वडील एवढे कसे निवळले आणि त्यांच्या मनांत आपल्याविषयीं आतांच एवढं प्रेम कुठून निष्पन्न झालं हें कोडं त्यांना कांहीं केल्या सुटत नव्हतं ! ...आणि स्वतः बाबूराव ! ते मात्र आपण खरोखरच सर्वांशीं खुल्या दिलानं वागत आहोंत असा भास निर्माण करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते...

नानासाहेबांनीं लक्ष्मीला का आधार दिला ? लक्ष्मी घर सोडून नेमकी याच ठिकाणीं कशी आली ? सदानंद तिच्याशीं एवढया घसटीनं कां वागतो ? ...नानासाहेब आणि लक्ष्मी एवढ्या जिव्हाळ्यानं एकमेकांशीं कां हितगुज करतात ? असं असतांना त्यांचे एकमेकांशीं संबंध कसे असतील ? ...गोविंदा एवढा पुण्याला शिकतो तर मग त्याला पैसे कोण पुरवीत असेल ? ...आणि राजाला त्याची कटकट नको म्हणून लक्ष्मीनं आपणहूनच मारला नसेल कशावरून ? ...वगैरे वगैरे विविध

प्रश्नांची उत्तरं मनाशीं मिळवीत असतांना बाबूराव मूळपदावर येत चालले होते...

आपल्या संकटाच्यावेळीं आपल्या घरचीं माणसं जवळ येऊं शकलीं म्हणून त्यांना दवाखान्यांत झालेला आनंद आतां मावळत चालला होता...त्यांच्या वागण्यांतील फरक कुणालाहि जाणवेल अशी त्यांची वागणूक एकदम बदलली !...राघूअण्णांच्या आगलावीपणामुळं त्यांनीं बाबूरावांनाहि नाहीं नाहीं तें जुळवून आणि बाजवीपेक्षां जास्त भडक स्वरूपांत रंगवून सांगितल्यामुळं बाबूराव चिडले होते...आणि एक दिवस राघूअण्णांच्या घरीं जाऊन त्यांनीं पुन्हां प्यायला सुरवात केल्यापासून तर त्यांच्या मनाचा तोल सुटला होता !

" आबा मी पास झालों " म्हणून आनंदानं सांगत आलेला गोविंदा आपल्या वडिलांना नमस्कार करण्यासाठीं म्हणून जेव्हां वांकला होता तेव्हां बाबूरावांनीं ' हरामखोर ! ' अशी शिवी हासडून त्याला लाथाडला होता !...त्यांच्या पायांतील बुटाचा तडाखा जोरानं बसल्यामुळं गोविंदाचं कपाळ खोक पडून रक्तबंबाळ झालं !... त्यामुळं तो किंचाळला होता, " आईऽऽ मेलों ! ..."

महापुराच्या प्रचंड लोंढ्यामुळं एकाएकीं उभी भिंत कोसळावी, तशी लक्ष्मीच्या मनाची स्थिती झाली. आपल्या मुलाला प्रत्यक्ष त्याच्या बापानं असं लाथाडावं हा अपमान न सहन झाल्यामुळं ती खवळून गेली होती... रागारागानं दांत ओठ खात तिनं त्याबद्दल बाबूरावांना जाब विचारला होता, " माझ्या पोराला असं लाथाडतांना जनाची नाहींतर मनाची तरी थोडी शिल्लक ठेवायची होतीत ! " बाबूराव बिलक्षण संतापले होते ...रागानं थरथरणारे ओठ हाताच्या मुठीशीं मुडपून जेव्हां ते "आतां हें पाप कुठं लपवणार ! बदमाष !..." असं ओरडले होते तेव्हां लक्ष्मीच्या सगळ्या भावना एकाएकीं थिजून गेल्या होत्या...आतां तिला दोनचार महिने गेले होते...आणि त्यासाठीं बाबूरावांनीं तिच्यावर हा भयंकर आरोप केला होता !...

एक दिवस तर बाबूरावांनीं कमालच केली! लक्ष्मी उद्योगांत असतांना

सोन्यानाण्याचा डबा ते पसार करण्याच्या बेतांत होते ! रात्रीं नऊदहाचा सुमार होता. त्यावेळीं नानासाहेब सहज आपल्या अंगणांतल्या कॉटवर पडून आराम घेत होते...

त्यावेळीं लक्ष्मी नानासाहेबांच्याच बंगल्यांतील उजव्या कोपऱ्यावरच्या दोन खोल्यांत रहात होती. त्यामुळं बाबूरावांच्या ह्या हालचालीची चाहूल लागतांच ते गडबडीनं उठून लक्ष्मीकडे आले. तेव्हां बाहेर पळायच्या गडबडीत असलेले बाबूराव "कां ? चैन पडत नाहीं ना यावेळीं सुद्धां ?" असं म्हणत घराबाहेर निघाले...नानासाहेबांनीं मोठ्या चपळाईनं बाबूरावांचा हात पकडून त्यांना मागें ओढलं.!... त्यावेळीं बाबूरावांनीं चटकन् खिशांतला चाकू काढून नानासाहेबांच्या तोंडावर फेकला !.... पण मोठ्या चलाखीनं नानासाहेबांनीं मान वांकवली आणि ते मोठ्यानं ओरडले, "ताईऽऽ चोरऽऽऽ"

एका क्षणार्धांत निर्मलाबाई, सखू, माधुरी आणि लक्ष्मी धांवून आल्या. बाहेरचा दिवा लावून त्यांनीं पाहिलं तों नानासाहेब आणि बाबूराव यांची झटापट चाललेली !...लक्ष्मी दोन ढांगांत पुढं झाली. नानासाहेब आणि बाबूराव यांच्या मध्यें उभी रहात ती बाबूरावांना म्हणाली, "गेटवर जायचा कां बेत आंखलाय ?..." पण तें सहन न होऊन हातांतला दागिन्यांचा डबा फेंकून देत बाबूरावनीं त्या वयांतहि लक्ष्मीच्या तोंडांत भडकावली ! कानशिलावर जोराचा मार बसल्यामुळं लक्ष्मी 'आई गऽ' करीत कोलमडली...बाबूरावांच्या चांगुलपणाच्या स्वप्नांत गुंगलेल्या सर्व माणसांना त्या एकाच तडाख्यानं खडखडीत जाग आणली...

दुसऱ्या दिवशीं साऱ्या गांवभर ही बातमी पसरली...लक्ष्मीला स्वतःच्या मृत्यूपेक्षांहि त्यामुळं दुःख झालं...

ती सारी रात्र लक्ष्मीनं तळमळत काढली...अखेर बऱ्याच उशीरानं तिचा डोळा लागला तेव्हां ती स्वप्नसृष्टींत गुरफटली गेली...त्यावेळीं सारं घरदार सोडून ती रानावनांतून चालली होती...भयंकर वादळ सुटलं होतं, विजा कडाडत होत्या, आसपास चिटपांखरूं देखील वावरत नव्हतं

...अंगांत असेल नसेल तें बळ एकवटून धीमेपणानं लक्ष्मी कुठं तरी दूर दूर निघाली होती...

...त्यावेळीं बेचाळीसच्या क्रांतीचं रणशिंग गांवोगांव फुंकलं जात होतं...गांधीजींची ' चले जाव ' ची घोषणा देशांतल्या कानाकोपऱ्यांतून निनादत होती...सातारा जिल्ह्यांतल्या पत्री सरकारची दहशत गांवोगांव पसरली होती...गळ्यांत काडतुसाची भरगच्च माळ, खांद्यावर बंदूक आणि कमरेला पिस्तुल अशा थाटांत सगळीकडे भूमिगत असूनहि पोलीसांच्या हातावर तुरी देत वेळीं अवेळीं वावरणारा पत्रीसरकाचा सैनिक, सर्वांच्या कुतुहलाचा प्रश्न होऊन बसला होता !...केव्हां, कुठं, काय होईल याची कल्पना नसल्यामुळं सगळीकडे घबराट निर्माण झालेला...खुनाखुनी आणि हाणमार यांना ऊत येऊन सगळीकडे वातावरण अगदीं तंग झालेलं...पत्रीसरकारचा दरारा जेवढा तेवढंच त्यांचं न्यायदानाहि वाखण्यासारखं होतं...शिवाजी महाराजांच्यावेळच्या महाराष्ट्राची आठवण आज नव्या स्वरूपांत सर्वांसमोर उभी होती... अशा त्या प्रदेशांतून निर्भयपणानं लक्ष्मी निघाली होती !...त्यावेळीं कुणीतरी एक माणूस बुरखा घेऊन पुढं येत तिला म्हणाला, " ताई एकटी कुठं निघालीस ? " लक्ष्मीनं चमकून त्याच्याकडे पाहिलं. टीचभर दाढी वाढलेला तो माणूस तिनं ओळखला नाहीं...ती तशीच पुढं निघाली तेव्हां तो माणूसच पुन्हां म्हणाला, " ताई, थांब !"...लक्ष्मीचा भाऊ महादेव होता तो !...त्याला त्या पत्रीसरकारच्या सैनिकाच्या थाटांत बघून लक्ष्मी घाबरून म्हणाली," आणि हें काय ?"...महादेवाला फार वेळ तिथं थांबणं शक्य नसल्यामुळं तो घाईघाइनं म्हणाला " आज मी दाजींना पत्र्या मारणार ! . त्याशिवाय तुझ्या जिवाला स्वस्थता मिळणार नाहीं..." पत्र्या मारायच्या म्हणजे कोण दिव्य ! तें ऐकून लक्ष्मी जोरानं किंचाळली आणि म्हणाली,

" थांब महादेव ! असं करूं नकोस... "

लक्ष्मीची किंकाळी ऐकून सखू धांवत तिच्याजवळ आली. घाबरलेल्या लक्ष्मीनं तिला जवळ ओढत विचारलं, " मामा कुठाय ?"

लक्ष्मी झोपल्यानंतर तिनं स्वतःच्या मिळकतींतून जमविलेलं घरांतील सोनं नाणं घेऊन बाबूराव पसार झाले होते...सखूच्या तें ध्यानांत आल्यामुळं ती सचिंत होऊन बसली होती. ...काय करावं तें तिला सुचत नव्हतं. म्हणून " दादाला तार करूं काग ? " असं कांहींशा चिंताग्रस्त मनानं सखूनं म्हणतांच डोळे फाडफाडून तिच्याकडे पहात लक्ष्मीनं पुन्हां तिला विचारलं, " पण मामा कुठाय ? "

" मामा आलाय तरी का इकडे ! आणि असं काय विचारतेस ?"

" म्हणजे ?...मग तें स्वप्नच होतं !...नको, नको...खरंच, तसं नको व्हायला..."

लक्ष्मी असं कां बडबडते आहे हें सखूच्या ध्यानांत येईना. म्हणून ती काळजीनं आईला जवळ ओढीत म्हणाली, " आईऽऽऽ असं ग काय करतेस ? "

● ● ●

## कद्म कद्म बढाये जा— १९

" अय्या !...फुग्यानं खेळायला लहानच नाहीं रे तूं दादा ? कुणी बघितलं तर हंसतील ना ? इंजिनियर व्हायचास कीं तूं आतां !...आणि असा फुग्यानं खेळतोस ? इश्श !..."

महादेवाच्या मुलांबरोबर गोविंदा फुगा घेऊन खेळत होता. त्याला बघून सखू मोठ्यानं हंसून असं म्हणाली, पण गोविंदानं तिच्या म्हणण्याकडे बिलकुल लक्ष दिलं नाहीं. त्या लहान मुलांप्रमाणं तोंडांत फुगा घालून तो फुगवीत होता. मधून मधून एक नवा फुगा घेऊन त्यांत पाणी भरायला त्याला हौस वाटत होती आणि पाणी भरून गब्ब झालेला फुगा कुणातरी मुलावर आपटून तो फोडण्यांत त्याला आनंद वाटत होता. फुग्यांतील पाणी अंगावर पडलं कीं, बाकीचीं मुलंहि तसंच करून गोविंदाला भिजवूं पहात होतीं !...

सखूला आपल्या भावानं आतां मोठं झाल्यावर असला खेळ खेळूं नये असं मनापासून वाटत होतं. म्हणून ती गोविंदाच्या हातांतील फुगा खस्‌दिशीं ओढून घेऊन रागानं म्हणाली, " कमालच केलीस कीं दादा ! शाबास ! ! "

विजारीच्या खिशांतला दुसरा फुगा काढून घेत गोविंदा हंसला आणि म्हणाला, " यांत कसली बुवा कमाल ? "

" अं ! कमाल नाहींतर काय ? आतां लहान कां आहेस तूं ? "

" मग ? "

" छान ! अगदीं कुक्कलं बाळ आहेस हो ! "

" अग, पण इथं लहानाचा नि मोठ्याचा प्रश्नच कुठं उद्भवतोय ?... कोणता खेळ कुणीं खेळावा याला कुठं बंधनं असतात होय ? "

" म्हणजे ?...उद्यां तूं भावली घेऊन देखील खेळायला लागशील !"

" मग बिघडलं कुठं त्यांत ?... आतां कोणती भावली म्हणशील तर..."

" अय्या ! थांब हो आईला सांगतें ! "

"...फुग्यानं खेळतों म्हणून होय ? खुशाल सांग. मी कांहीं इथंच खेळतोंय असं नाहीं ! आमच्या कॉलेजांत आम्हीं नेहमींच खेळतों फुग्यानं !...अगदीं तुझा राजेंद्र सुद्धां ! "

" खरंच ?...आणि..."

" अग, आम्ही या खेळाला डकिंग म्हणतों. रोज अभ्यास करून कंटाळा आला कीं, आमचा हा खेळ सुरू झालाच म्हणून समज ! वरच्या मजल्यावर उभं राहून खालच्या बाजूनं फिरकणारा विद्यार्थी दिसला रे दिसला कीं, फुगा फेंकला गेलाच !...आणि मग तो भिजला कीं तोहि दुसऱ्यावर तोच प्रयोग करतो !..."

" अगबाई ! मग कुणी रागवत नाहीं ? "

" छे ! ... रागावणारा कुणी भेटला, तरी त्यालासुद्धां हाच प्रसाद मिळतो ! ... मग तो रागावणारा प्रत्यक्ष रेक्टर कां असेना ! ... "

" छान ! आणि मग ? "

" मग काय ? ... कांहीं नाहीं ! आमचा खेळ आपला कांहीं झालं तरी चालूच !...किती मजा वाटते म्हणतेस ! ...राजेंद्राला बिचार यांत काय गंमत असते ती ! "

एवढं बोलून गोविंदानं पाण्याचा तांब्या हातांत घेतला आणि फुग्यांत पाणी भरायला सुरुवात केली. तितक्यांत महादेवाच्या अशोकला बोलावायला म्हणून एक त्याच्याच वयाचा मुलगा पळत पळत तिथं

येत म्हणाला, " अरे पळ, पावणा आला !..." आणि आल्या वेगानंच तो परतलाहि...

" आलोंच हं ! " असं गोविंदाला बजावून अशोकनं आपल्या हातांतला फुगा गोविंदाच्या अंगावर फेकला आणि तो त्या मुलाच्या दिशेनं पळत निघून गेला.

त्यावेळीं लक्ष्मी माहेरीं आली होती. मध्यंतरीं तिचा गर्भपात एका एकींच झाल्यामुळं तिला फार थकवा आला होता. म्हणून तिच्या आईनं मोठ्या आग्रहानं तिला आपल्या घरीं आणली होती. सुटी असल्यामुळं त्यावेळीं सखूबरोबरच गोविंदाहि आजोळीं आला होता.

लक्ष्मीचं माहेर म्हणजे पत्रीसरकारच्या राज्यांतील एक प्रमुख खेडेगांव ! त्यामुळं आसपासची या ग्रामराज्यांतील बरीच माहिती तिथं रोजच्या रोज ऐकायला मिळे...आज कुणाचा खून झाला, उद्यां कुणाच्या घरीं दरोडा पडला, परवां कुणाला तरी पत्र्या मारल्या, तर तेरवां कुठं तरी मोटर नाहींतर रेल्वे लुटली !... अशा कितीतरी बातम्या तिथं दरेक तासाला नव्या नव्या प्रकारांत ऐकायला मिळत.

त्यावेळीं धान्य गांवाबाहेर जातां कामा नये आणि कुणीं बाहेरून आपल्या गांवांत दारू आणतां कामा नये असा ह्या ग्रामराज्याचा प्रमुख नियम ठरलेला असे. त्या नियमाला झुगारून कुणी गांवाबाहेर धान्य चोरून नेतांना दिसलं किंवा कुणी लपत छपत दारूची बाटली सात पडद्यांत घालून गांवांत येतांना दिसलं कीं, गांवांतील मुलं 'पावणा आला ! पळा रे ऽ ऽ' असं म्हणत आपल्या सहकार्यांना बोलावून त्या माणसावर तुटून पडत!...अशावेळीं त्या माणसाची किती त्रेधा उडून जात असे तें सांगणं शब्दापलीकडचं होऊन जाई !...दहापंधरा मुलांच्या तावडींत सांपडलेला एकटा दुकटा माणूस मुकाट्यानं आपला गुन्हा कबूल करून स्वतःची सुटका कशीबशी करून घेई ! ...त्याशिवाय त्याला गत्यंतरच उरत नसे ! तसं नाहीं केलं तर पत्र्या मारण्याची धमकी आणि त्याच्या पाठोपाठ प्रत्यक्ष त्याची अंमलबजावणीहि घडत असल्यामुळं गुन्हा केलेला माणूस बोबडी वळून जाण्याइतपत घाबरून जाई !...आणि असं कांहीं गांवाच्या

वेशीजवळ घडलं कीं, तीं मुलं साऱ्या गांवभर "कदम कदम बढाअे जा" हें आझाद हिंदसेनेचं रणगीत गात फेरी काढीत...आणि मग रात्रीं सगळे गांवकरी जमले कीं, ' जयहिंद ' च्या गर्जनेंत त्या ग्रामराज्यांतील एखाद्या प्रमुख माणसाकडून न्यायदानाचा समारंभ पार पडे...

हिंदुस्थानची वेस ओलांडून सुभाषबाबूंनीं आपली आझाद हिंद सेना तयार केली होती. हजारों हिंदी सैनिक त्यांना जाऊन मिळाले होते. इंग्रजांच्याविरुद्ध बंड पुकारून ही फौज ' चलो दिल्ली' चा जयघोष करीत होती ! ... आणि ग्रामराज्यांतील कानाकोपऱ्यांतून त्या जयघोषाचा ध्वनि पुनःक्षेपित केला गेल्यामुळं ' कदम कदम बढाअे जा ' हें गीत गात शेंकडों मुलं शत्रूवर तुटून पडत असत ! ...

गोविंदाला आणि सखूला हें सारं नवीन होतं. त्यामुळं त्यांनीं महादेवाजवळ चौकशी करून विचारलं, " अशोक कुठं पळत गेला ? " महादेव त्याच माणसांपैकीं एक असल्यामुळं त्यानं सर्व हकिकत गोविंदाला आणि सखूला सांगितली...तो एकेक रोमांचकारी प्रसंग ऐकून त्यांना नवल वाटलं ! ... आश्चर्यहि वाटलं ! आणि म्हणून त्यांनीं रोज त्या ग्रामराज्यांतील थोडीथोडी माहिती मिळवायला प्रारंभ केला.

एक दिवस रात्रींच्या वेळीं लक्ष्मीची आई लक्ष्मीचं डोकं आपल्या मांडीवर घेऊन तिला कुरवाळीत आपल्या घराच्या सोप्यांत बसली होती. त्यावेळीं लक्ष्मीची आई म्हणाली, " भूमिगत मानसांस्नी रोजच्या रोज वाटल तें जेवान मिळतं ! त्यांस्नी कशाचा घोर ग ? कुटंबी खात्यात, कायबी खात्यात आन् वाट फुटल तिकड जात्यात बी ! पर हिकडचं तिकडं हुईल म्हनशील तर ! अहं ! छा ! काय भागायचं न्हाई त्ये !... अग, बायकांस्नी ह्येंचा कसला त्यो तरास न्हाई, उलट कित्येकींचं न्हवर ताळ्याव आनून संसार रांकला लागलाय न्हवं ! पत्रीच्या भ्यानं सारं निथल्या तितं हुतंया बग...आन् हीं बारकीं बारकीं पोरं, सांगावा मिळायच्या अवकाश कीं धूम टोकत्यांत !... एका घटकंत बातमी कळतीया !... म्हाताऱ्या बायका दिकून फराऱ्यांची काडतुसं चुलींच्या बैलांत न्हाईतर जळनाच्या ढिगाऱ्यांत लपवून टेवत्यात्या ! पोलीस

आला म्हन एकबी भेत न्हाई !... पोलीसांच्याच अंगाव धाऊन जात य्येलाच दम भरत्यात न्हवं का खुळे?...आन् खोकून खोकून जकड झाल्याली म्हातारी बाई, पर जवानावानी बळ आनून फराऱ्यास्नी दडीवतीया की आपल्या घरांत! आन् भाईर जुंदळ घालून राकनीला बसल्याचंबी स्वांग आनतीया!...काय बिशाद आलीया तिच्या वाटला जायाची कुनाची!"

लक्ष्मी लक्ष देऊन हें सारं ऐकत होती. तें सांगतांना तिच्या आईच्या ठिकाणीं आढळणारा उत्साह तिच्या नजरेतून निसटत नव्हता... ग्रामराज्यांतील अशा बऱ्याच गोष्टी ऐकल्यावर एकदां ती महादेवाला सहज म्हणाली, " ह्या भानगडींत बायका देखील भाग घेतात म्हणे ! "

" हो हो ! न घ्यायला काय झालं ? ...अग, कोंडाबाईसारखी म्हातारी, जिला सभा कशाशीं खातात हें माहीत नव्हतं कीं, चार पुरुषांतसुद्धां जी कधीं बसली उठली नव्हती, तीच कोंडाबाई आतां पांच पांच हजारांच्या सभेंत बेधडक व्यासपीठावर चढून म्हणू शकते—

" खावी भाकर कांदा । आन् करावा देशाचा धंदा ! "

आतां बोल ! ...यापेक्षां आणखी काय करायला हवं तिनं ? ..."

लक्ष्मीला कोंडाबाईचं विशेष कौतुक वाटलं तिची ही हकीकत ऐकून...महादेवाकडून जेव्हां तिला ग्रामराज्यांतील बऱ्यावाईट अनेक गोष्टी ऐकायला मिळाल्या तेव्हां तिनं आपलं स्वप्न महादेवाला सांगून टाकलं. तें ऐकून तो हसला. पण लक्ष्मी गंभीर होऊन त्याला म्हणाली, " पण तूं तसं कांहीं करूं नकोस हं ! ...असं वेडवाकडं कांहीं करून मला सुख मिळायचं नाहीं ! ...माझ्या कर्तबगारीनंच मला सुखाचा मार्ग गांठायचा आहे...कसं झालं तरी आपलं सौभाग्य कुणाला नको होईल का ? "

बाबूराव लक्ष्मीला कितीहि त्रास देत होते तरी ते मरावेत असं तिला मुळींच वाटत नव्हतं. हें तिचं म्हणणं लक्षांत घेऊनच महादेव म्हणाला, "असला नवरा करायचा काय असून तरी ? ...कवडीचं तरी सुख मिळालंय तुला कधीं ? ...निदान पत्री मारायची थाप तरी जाऊं-देच त्यांच्या कानावर ! "

" नको नको ? ...शपथ आहे माझ्या गळ्याची ! ...त्यांचं ते वाटेल तें करूं देत...मी खंबीर आहे चांगली...नाहीं तरी सुख कशामध्यें मानायचं हा आपला ज्याचा त्याचा वैयक्तिक प्रश्न आहे ! ... माझी मी जगूं शकतें, मुलाचं शिक्षण करूं शकतें, हेंच माझं सुख. आणि मी म्हणतें आपणाला हवं तें सारंच मिळालं, तर मग शेवटीं राहिलं काय ? ...आयुष्याशीं झगडत रहाण्यांतच पराक्रमाचं बी रुजवलं जातं ना ? ... "

नानासाहेबांच्या, सदानंदाच्या आणि बालवीरांच्या सहवासांत असतांना लक्ष्मीनं आपल्या मनाला बरीच खंबीरता आणली होती... बाबूरावांच्या विचित्र वागणुकीनं अगोदरच बंडखोर बनलेलं तिचं मन आतां प्रत्येक क्षणाला येईल त्या परिस्थितीवर मात करायला तयार झालं होतं ! स्वतःच्या अंगचं सामर्थ्यं पणाला लावून जगायची तिनं आपल्या मनाची तयारी केली होती. ...राजा गेला त्यावेळीं किंवा सखूच्या लग्नाच्या वेळीं उपयोगी पडावेत म्हणून, काटकसरीनं राहून उरलेल्या पैशांचे लक्ष्मीनं दागिने केले होते, ते बाबूरावनीं तिला फसवून नेले, त्यावेळीं ' सगळीकडून आभाळ फाटल्यासारखं झाल्यावर जगायचं तरी कशाच्या आधारावर ? ' अशा समजुतीनं कित्येकदां आत्महत्त्येचा विचार क्षणभर कां होईना, करणारं तिचं मन आतां त्याच विचाराला क्षणाचाहि थारा द्यायला तयार नव्हतं !...आणि म्हणूनच बाबूरावनीं राघूअण्णांच्या थापांना भुलून तिच्यावर केलेला भयंकर आरोप ती फारसा आकांडतांडव न करतां गिळूं शकली ! ...त्यावेळीं नानासाहेबांनाच तिनं उलटं म्हटलं होतं कीं, समाजाच्या बडबडीला भीक घालण्याइतपत आपलं मन आतां कमकुवत राहिलं नाहीं ! ... त्याबद्दल तिला त्यांच्याकडून अनेकदां शाबासकी मिळाली होती...हळूहळू आपल्या विचारांत क्रांति होत असल्याचा आनंद तिला अनुभवतां येत होता...

आपलं आयुष्य आणखी बंडखोरपणानं जाईल तर हवंच, अशी आतां लक्ष्मीच्या मनाची बैठक तयार झाली होती. त्यामुळं नानासाहेब

रजपूत म्हणून त्यांनीं आपल्या पद्धतीनुसार रक्षाबंधनाच्या वेळीं तिच्या हातांत घातलेल्या, स्काउटचा बिल्ला जागजागीं कोरलेल्या, बांगड्या, तिनं अजून हातांत ठेवल्या होत्या. त्याबद्दल तिनं निर्भयपणानं बाबूरावना उत्तरं दिलीं होतीं ! आणि एकदां त्या बळजबरीनं काढून घेतांना तिनं बाबूरावना जोराचा प्रतिकारहि केला होता... आणि आतां त्याच नानासाहेबांच्या बायकोनं तिच्याकडे साशंक मनानं पहायला सुरवात केल्यावर तिनं त्याच क्षणाला पाटीलमळा सोडून आपल्या आईकडे धांव घेतली होती... मनांतील गैरसमज नाहींसा व्हावा म्हणून तिनं निर्मलाबाईना आर्जवून पत्र टाकलं होतं; आणि खऱ्या वस्तुस्थितीची जाणीव झाल्यावर आपला समज चुकीचा झाला असल्याचं दिलगिरी व्यक्त करणारं त्यांचं उलट पत्रहि तिला मिळालं होतं ! पण आतां कांहीं झालं तरी ती पुन्हां रहायला म्हणून तिथं जाणार नव्हती... तिनं हा निश्चय अगदीं पक्का करून टाकला होता. तसं करतांना ज्यांनीं ऐनवेळीं आपणाला आश्रय दिला त्या सदानंदाला आणि नानासाहेबांना ती विसरूं शकत नव्हती...उलट तिथं रहायचा मोह तिनं आवरला होता, तो केवळ त्यांना आपला त्रास होऊं नये याच हेतूनं ! ...

दहा पंधरा दिवस माहेरीं काढल्यावर लक्ष्मीनं गोविंदा शिकत होता म्हणून तूर्त पुण्यालाच रहायचा बेत केला. त्याप्रमाणं ती पुण्याला जायला निघाली तेव्हां तिच्या वडिलांनीं कांहीं पैसे तिच्या जवळ दिले. फार दिवसांनीं माहेरपणाला ती आली होती. त्यामुळं तिच्या मुलांना आणि तिला भरपूर कपडे तिच्या वडिलांनीं घेऊन दिले होते...पण त्यांच्या कडून पैसे घ्यायचं मात्र तिला आवडेना ! म्हणून ती म्हणाली, "नको...पैसे कशाला ?"

सखूचं आणि तिच्या आजोबांचं तिच्या लग्नाबाबत बोलणं झालं होतं...नाहीं होय करतां करतां शेवटीं सखूनं त्यांना आपण राजेंद्राशीं लग्न करणार असल्याचं सांगून टाकलं होतं ! तिचा निश्चय तिच्या आजोबांना तितकासा पसंत नसला, तरी 'निदान परकी जात तरी नाहीं या समजुतीवर त्यांनीं तिला होकार दिला होता. रजपूत आणि मराठे

मूळचे एकच. त्यामुळं त्यांना सखूच्या निवडींत फारशी चूक दिसली नाहीं...सखूलाहि बदलत्या काळाप्रमाणं आपल्या आजोबांची काळा-बरोबर जायची असलेली तयारी बघून आनंद झाला होता...पण लक्ष्मीला यांतली कांहींच माहिती नसल्यामुळं ती जेव्हां " पैसे कशाला ? " असं म्हणाली तेव्हां तिचे वडील हंसून म्हणाले, " कशाला म्हणजे ? माझ्या नातीच्या लग्नाला ! "

हें ऐकून लक्ष्मी थोडीशी बुचकळ्यांत पडली. तिला वाटलं आपला मोठा भाऊच आपल्या मुलीचं–शांताचं लग्न करायला तयार झाला असावा ! आणि त्यावेळीं आहेर म्हणून आपणाला ते पैसे उपयोगी पडावेत किंवा आपण पैशाच्या सबबीवर लग्नाला यायचं टाळूं नये म्हणून ही युक्ति असावी ! आणि त्याच दृष्टीनं ती म्हणाली, " येवढ्या लौकर शांताचं लग्न ! "

" अंहं ! तिचं नाहीं. "

" मग ? "

" सखूचं. "

" सखूचं ? "

" हो. तिचंच ! "

" अहो पण, नवऱ्या मुलाचा अजून पत्ता नाहीं आणि तोंवरच लग्नाची तयारी ? "

मोठ्यांदा हंसून लक्ष्मी असं म्हणाली, तेव्हां तिचे वडील सखूकडे पहात म्हणाले, " त्याची सोय झालीय अगोदरच ! "

" म्हणजे ? "

" काय सखू, खरं ना ? "

आजोबांनीं असं विचारतांच सखू लाजली. तिचं आरक्त झालेलं तोंड बघून लक्ष्मीनं मोठ्या आश्चर्यानं तिला विचारलं, "काय म्हणतात ग आजोबा ? "

त्यावर एवढा वेळ गप्प उभा असलेला गोविंदा म्हणाला, "आजोबांनीं खरं तेंच सांगितलं आई ! "

" अरे पण...मला कळूं दे ना !...काय भानगड आहे ही ?... सखूऽऽ !"

सखूचं आणि राजेंद्राचं लग्न ठरलं आहे हें कानावर पडतांच लक्ष्मी गंभीर झाली ! सखूनं आपला नवरा आपण शोधला यांत तिला गैर वाटलं नाहीं. राजेंद्रासारखा हुषार मुलगा आपणाला जावई म्हणून मिळाला याचंहि तिला समाधान झालं...वारसा हक्कानं जडलेली त्यांची मैत्री रक्ताच्या नात्यानं नव्यानं दृढ झाली म्हणून तिच्या मनालाहि आनंद झाला...पण ती गंभीर झाली ती एवढ्यासाठींच कीं, त्याबाबत सखू, राजेंद्र किंवा गोविंदादेखील तिला कांहींच कसा बोलला नव्हता ! आणि ज्या मुलांच्यासाठीं तिनं आपल्या जिवाचं रान केलं होतं त्याच मुलांनीं तिच्या परस्पर असे बेत रचावेत याचं तिला दुःखहि झालं... पण फार वेळ आपला गंभीरपणा न राखतां ती हंसून म्हणाली, " असं होय ? ठीक आहे." आणि तिनं वडिलांचे पैसे हातांत घेऊन परत त्यांचे हवाली करीत म्हटलं, " मग त्याच वेळीं द्याना...आत्तां नेले तर खर्चून जातील !..."

० ० ०

## विस्मय आणि उत्कंठा २०

शस्त्रक्रियेच्या मेजावर नानासाहेब शांत पडले होते. त्यांच्या उजव्या हाताला बराच मार लागून हाडांचा चुराडा झाला असावा ( फ्रॅक्चर ) असं तिथल्या डॉक्टरांचं म्हणणं ! त्यामुळं हजारों लोकांना आपल्या सेवेनं जीवदान दिलेल्या नानासाहेबांबद्दल साऱ्या गांवभर कुतुहल निर्माण झालं होतं. जो तो दवाखान्याकडे धांव घेऊन 'कसं काय ? ...ऑपरेशन झालं ?...डॉक्टर काय म्हणाले ?...' असे प्रश्न विचारून त्यांचं कुशल समजण्यासाठीं उत्सुक असलेला दिसत होता...परिचारिकांची धावपळ चालली होती. डॉक्टरांची आंत बाहेर फेरी सुरू होती...शस्त्रक्रियेच्या तयारीसाठीं लागणारीं सर्व साधनं जमा होतांच शस्त्रक्रिया केली जाणाऱ्या खोलीचं दार बंद झालं...

निर्मलाबाई, राजेंद्र, माधुरी आणि सखू नानासाहेबांच्या काळजीनं चूर होऊन व्हरांड्यांत उभी होती. सदानंद आतां शस्त्रक्रियेचा काय निकाल ऐकायला मिळणार या उत्सुकतेनें शस्त्रक्रिया होत असलेल्या खोलीशीं उभा होता. डॉक्टर म्हणाले त्याप्रमाणं हाड मोडलं असेल किंवा हाडांचा चुराडा झाला असेल तर कदाचित् हात कापावा लागेल कीं काय, ही भीति प्रत्येकाला बेचैन करीत होती.

त्यावेळीं दवाखान्याचं सारं आवार अगदीं शांत झालं होतं. कुठेही

टांचणी पडली तरी आवाज यावा एवढं गंभीर वातावरण तिथं नांदत होतं. तिथलीं माणसं जेवढी गंभीर झालीं होतीं, तेवढीच झाडावरील पानफुलं देखील शांत झालीं होतीं ! ...त्यावेळीं अगदीं सकाळची वेळ होती तरी वारा वहात नव्हता. फुलझाडावरचीं पानं हालत नव्हतीं, मोठाले वृक्ष धीरगंभीरतेनं उभे होते...झाडावरचे पक्षी आपले पंख सावरून दवाखान्याकडे टक लावून पहात होते...दवाखान्याच्या दरवाजावरचा कुत्रादेखील जागच्याजागीं उभा राहून–किंचित्सुद्धां हालचाल न करतां-समोर पहात होता...दवाखान्याच्या आसपासचे दगड, वाळू, माती सारीं सारीं काळजीनं काळवंडून जावीं तशी दिसत होतीं...त्यावेळचं सगळं वातावरणच निःशब्द होऊन गेलेलं होतं...

खट्...कर्रर्...

शस्त्रक्रियेच्या खोलीचं दार उघडलं गेलं. त्याबरोबर कळ दाबलेल्या यंत्राप्रमाणं प्रत्येकानं तिकडे वळून पाहिलं. प्रत्येकाच्या नजरेनं बाहेर आलेल्या डॉ. दिनेशना प्रश्न केला, " कसं काय ? ...काय निकाल ठरला ? "

डॉ. दिनेशांच्या तोंडावर समाधान तरळत होतं. त्यांतच निम्मं उत्तर मिळाल्यामुळं सदानंद पुढं होऊन म्हणाला, " झालं ऑपरेशन ? "

निर्मलाबाई उभ्या होत्या तिथं येत डॉ. दिनेश म्हणाले, " आतां कसलीच काळजी नाहीं...सर्व कांहीं व्यवस्थित झालं...बरंचसं रक्त गेल्यामुळं त्यांना थकवा पुष्कळसा आला असला, तरी आतां काळजी नाहीं...थोडे दिवस हात मात्र प्लॅस्टरमध्यें ठेवावा लागणार ! "

नानासाहेबांचा हात, ज्या हातानं आजवर हजारोंची सेवा केली, बालवीर म्हणून रेल्वेंतून किंवा मोटारींतून जातां येतांना स्वच्छता राखण्यासाठीं व शिस्तीसाठीं म्हणून केरकचरा उचलला, अनेकांना ऐनवेळीं उदार मनानं पैशाअडक्याची मदत केली, अनेकदां बुडत चाललेल्या होडीला सावरण्याचा प्रयत्न केला, शेकडों संकटांना हंसत-मुखानं झुगारून दिलं, लक्ष्मीसारख्या परिस्थितीनं ग्रासलेल्या स्त्रीमनला ' मी अबला आहे ' हा भ्रम काढून टाकून स्वतःच्या पायावर जगायचं

सामर्थ्य तिथ्याठिकाणीं येण्यासाठीं हातभार लावला, रस्त्यावरून जाणाऱ्या-येणाऱ्या कितीतरी मुलांना खेळीमेळीनं आपल्या मोटर सायकलवर उचलून घेऊन समाधान दिलं; आणि ज्या हातानं आजवर लाखों लोकांना आपल्या बालवीर थाटाची सलामी देऊन अभिवादन केलं तो नानासाहेबांचा हात, कापून टाकला नाहीं म्हणून क्षणार्धात सारा दवाखाना आनंदानं भरून गेला...

नानासाहेब शुद्धीवर आले तेव्हां घाईघाईनं पण हळू आवाजांत राजेंद्रानं त्यांना विचारलं, " आतां दुखत नाहीं ना ?...थोडं तरी बरं वाटतंय ? "

कितीहि दुखलं तरी त्या दुःखाचा ठसा कधींहि तोंडावर उमटूं न देणारे नानासाहेब एवढा त्रास झाला होता, तरी मंदस्मित करून डाव्या हातानं राजेंद्राला जवळ घेत म्हणाले,

" अगदीं चांगलं बरं वाटतंय आतां...चुराडलेलं हाड नीट बसवलं आहे. हात आतां प्लॅस्टरमध्यें टाकायचा. थोडक्यांत निभावलं !... आणि तुझी आई कुठं आहे ? तिला म्हणावं मला आतां भूक लागलीय तेव्हां सैंपाक लवकर कर ! "

निर्मलाबाई शेजारीं उभ्या होत्याच. अशावेळीं देखील नानासाहेबांनीं नेहमीप्रमाणं जेवायची घाई बोलून दाखवावी म्हणून त्यांना हंसूं आलं. त्यामुळं सखू नानासाहेबांसमोर जाऊन म्हणाली,

" सैंपाक तर केव्हांच झालाय ! फक्त तुम्हीच जेवायला बसायचा अवकाश ! "

नानासाहेब सखूच्या या उत्तरामुळं हंसले. सखू आतां त्यांची सून झाली होती. ती त्यांच्या घरीं आल्यापासून तिनं स्वतःकडे सैंपाक घेतला होता. त्यांत ती तरबेज होती, त्यामुळं तिनं तसं बोलून दाखवणं उचित होतं. म्हणून राजेंद्र म्हणाला, "बायका शिकल्या तरी सैंपाकांतच विशेष..."

" असूं दे जा !... तुला काय करायचं ? "

सखू किंचित् चिडली तेव्हां निर्मलाबाई म्हणाल्या, " आतां आपण इथून जाऊं या. नाहींतर यांना त्रास होईल ! जास्त वेळ थांबूं नका

म्हणून डॉक्टरांनीं सांगितलंय...आणि माधुरी, ताईना तार केलीस?... जा, सगळं ठीक असल्याचं कळव बरं..."

तितक्यांत खुद्द बाबूरावच एकदम तिथं येत म्हणाले, "कसं काय झालं ऑपरेशन ?"

बाबूरावना बघून सगळींच किंचित् मार्गे सरलीं...ते तिथं अचानक कसे काय आले हें कुणालाच कळेना. त्यामुळं प्रत्येकानं त्यांच्याकडे आश्चर्यानं पाहिलं. नानासाहेबांना देखील क्षणभर बाबूरावांच्या अचानक भेटीचं नवल वाटल्याशिवाय राहिलं नाहीं ! तेव्हां त्या सर्वांची आश्चर्यकारक नजर ध्यानांत येतांच बाबूराव म्हणाले, "असं काय बघतां माझ्याकडे ?...माझा व्याही...हो व्याहीच नाहींतर काय ?...खुद्द तो स्वतः आजारी असतांना मी येणार नाहीं असं कसं होईल?...नानासाहेब, बोला ना कसं काय आहे ?"

"चांगला आहें मी आतां."

नानासाहेबांनीं स्वतःच उत्तर दिलं. बाबूरावांनीं आनंदानं त्यांच्याकडे पाहिलं आणि "आतां हिला तार करतों" असं म्हणत ते तिथून चटकन् बाहेर पडलेहि !

• • •

"हॅलोऽऽ कोण सदानंद का ?...असं कां ?...अगबाई ! आणि मग ?...आतां चांगलं बरं आहे ना त्यांना ?...हात प्लॅस्टरमधें ठेवायचा ?...किती दिवस ?.... बरं बरं...आणि काय झालं एकाएकींच हें ?...मोटारीचा अपघात ?...आणि कुठं ?...अस्सं ! मला कांहींच कल्पना नाहीं !...म्हणजे ?...हे कसे आले तिथं ?...ठीक ठीक... दुपारच्या गाडीनं निघतेंच...हं, हं !...त्यांना कळवा मी येतेंय म्हणून ! ...छे, त्यांना म्हणजे नानासाहेबांना...अच्छा..."

लक्ष्मी पुण्याला जिथं रहात होती त्या घरमालकांकडे फोन होता. त्यामुळं ती संधि साधून नानासाहेबांवरची शस्त्रक्रिया यशस्वी होतांच सदानंदनं तिला ट्रंक फोन केला. नानासाहेबांबद्दलची फोनमधील ही

हकीकत ऐकून लक्ष्मी आश्चर्यानं थक्क झाली. तिची ओळख झाली तेव्हां पासून नानासाहेब कधीं आजारी असल्याचं तिनं ऐकलं नव्हतं कीं पाहिलंहि नव्हतं !... आणि आज एकदम फोन आला नि त्यांत ते नुसते आजारी नव्हते तर त्यांच्यावर शस्त्रक्रियाहि झाली होती असं तिला कळलं !... लक्ष्मीला कमालीचा धक्का बसला तें ऐकून. म्हणून तिनं गोविंदा भेटतांच तावडतोब पाटीलमळयाला जाणं जरूर आहे, असं मनाशीं ठरवून टाकलं.

गांवाला जाण्यासाठीं म्हणून लक्ष्मीनं जेव्हां एकदोन पातळं लहानशा पिशवींत घाईघाईनं घातलीं, तेव्हां नुकतांच घरीं आलेला गोविंदा आश्चर्यानं तिच्याकडे पहात तिला म्हणाला,

" म्हणजे ! "

अलिकडे बाबूरावांनीं पाटीलमळयांतील तो प्रकार केल्यापासून लक्ष्मी नेहमींच कसल्यातरी विचारांत गढलेली असायची. फारसं कुणाशीं न बोलतां सवरतां तिचं भावल्या तयार करण्याचं काम तेवढं अखंड चालायचं. त्यामुळं गोविंदा कुठं बाहेर गेला किंवा कॉलेजांत गेला तरी त्याचं सारं लक्ष घरांत असायचं. त्याला उगाचच वाटायचं कीं, आपली आई कुठंतरी निघून जाईल ! आणि म्हणून तो घरांतून बाहेर पडतांना नेहमीं सांगून जायचा, " आई, आज अमूक अमूक खायला करं हं मी यायच्या आंत ! "... पण आज नेहमींप्रमाणं खाऊ तयार न करतां ती कुठंतरी जायच्या तयारींत असलेली बघून तो दचकला, घाबरून गेला. त्यानं भीतभीतच तिला विचारलं, " कुठं निघालीस ? "

गोविंदा आपली बाजवीपेक्षां जास्त काळजी घेतो अशी लक्ष्मीची नेहमींच कुरकुर असायची. त्यामुळं ती नेहमींप्रमाणं त्याला जवळ घेत म्हणाली, " इतकं घाबरायला काय झालं ? " आणि तिनं सदानंदाच्या फोनवरची सगळी बातमी त्याला सांगून टाकली.

नानासाहेबांनीं आपल्या आईला किती मदत केली याची गोविंदाला जाणीव होती. त्यांनीं त्याला स्वतःला आपल्या मुलाप्रमाणंच कसं वागवलं होतं हेंहि तो जाणून होता. शिवाय राजेंद्राच्या आणि सखूच्या

विवाहानं निर्माण झालेलं नवं नातं तो ओळखून होता...नानासाहेबांची एकंदर वृत्ति त्याच्या ओळखीची होती...अशावेळीं आपण तिथं जायला हवंच हा त्याच्या मनानं चटकन् निर्णय घेतला; आणि म्हणून तो आपल्या आईला म्हणाला, " आतां दीड एक तासानंच तिकडची गाडी आहे! चल पकडूं या तीच गाडी. "



गाडी निघाली होती त्याच वेगानं लक्ष्मीचे विचारहि धांवत होते. नानासाहेबांकडे गेल्याबरोबर काय काय नजरेसमोर दिसेल याचा आपल्या मनाशीं ती विचार करीत होती.

नानासाहेबांना कितपत लागलं असेल याची सदानंदाच्या फोनवरून लक्ष्मीला तितकीशी कल्पना आली नव्हती. त्यामुळं त्यांना कितपत लागलं असेल, कुठं कुठं लागलं असेल, आतां ते चांगले शुद्धीवर असतील किंवा नाहीं, त्यांचा तो हात प्लॅस्टरमध्यें ठेवायचा म्हणजे काय काय करावं लागलं असेल, त्यांच्याजवळ कोण कोण असेल, डोळे उघडून ते पहात असतील किंवा नाहीं,...त्यांच्यावर ओढवलेल्या ह्या प्रसंगानं तिथल्या सर्वांचा कितपत गोंधळ उडाला असेल, निर्मलाबाई, राजेंद्र, माधुरी, सखू...या सर्वांच्या मनाची स्थिति कशी झाली असेल इत्यादि बद्दल लक्ष्मीच्या मनांत फारच उत्सुकता निर्माण झाली होती. तसा विचार करतांना पाटीलमळ्याभोंवतीं दिसणाऱ्या रम्य वनश्री बरोबरच गांवांतील तिच्या ओळखीचा प्रत्येक भागन् भाग तिच्या नजरेसमोरून सरकत होता...

लग्न झाल्यानंतर सखू सासरीं म्हणून नानासाहेबांकडे गेली होती. त्यानंतर लक्ष्मी तिला यावेळीं पहिल्यांदांच भेटणार होती!...आणि म्हणून लहानपणापासूनची सखू तिच्या नजरेसमोर नाचत होती. अगदीं पाळण्यांतल्या गुटगुटीत आणि हंसऱ्या सखूपासून तों आतां लग्न झालेल्या सखूपर्यंतचा साऱ्या अवस्थेंतील सखू तिला आठवत होती...भुरु भुरु उडणारे केंस आपल्या चिमुकल्या हातानं सावरीत अंगणांतून धांवणारी,

चिमुकली पाटी खाकेंत मारून 'आईऽऽशालाऽ' करीत शाळेला जाणारी, सागरगोट्यांचा डाव मांडून त्यांतच तासन् तास गुंगणारी, नवा परकरपोलका शिवल्यावर चटकन् वांकून नमस्कार करणारी, दिवाळसणांत गौळणी घालून रांगोळ्या काढणारी, आजोबा आजीजवळ खाऊसाठीं हट्ट धरणारी, राजाला हौसेनं कडेवर घेऊन मिरवणारी, राजेंद्र माधुरीशीं पळापळीचा खेळ खेळणारी, अभ्यासाचा कंटाळा आला कीं आईच्या गळयाशीं येऊन पडणारी, वडिलांच्या धाकानं मन मारायची वेळ आली असतां काळवंडून जाणारी आणि लग्नाच्या वेळीं वडील आले नाहींत म्हणून साश्रुनयनांनीं आईला कडकडून मिठी मारणारी सखु लक्ष्मीच्या यावेळीं कांहीं केल्या नजरेसमोरून हलत नव्हती.

इतक्या दिवस सखू आपल्याजवळ अतिशय लाडांत वाढलेली तेव्हां तिला सासरचं कसं काय निभत असेल, ती सर्वांशीं कशी वागत असेल, तिच्या सासूसासऱ्यांचं सून म्हणून तिच्याबद्दल काय मत बनलं असेल, राजेंद्राच्या मनाप्रमाणं ती वागत असेल किंवा नाहीं, तिला वरचेवर भूक लागायची तेव्हां ती भूक लागेल तेव्हां खात असेल कीं संकोचानं भूक मारीत असेल, राजेंद्राला आतां 'अहो' म्हणत असेल किंवा कसं, सैंपाक करण्यांत मनापासून लक्ष देत असेल कीं नाहीं, आल्या गेल्याशीं तिचं वागणं कसं होत असेल, ...वगैरे वगैरे कितीतरी गोष्टी जाणून घ्यायला लक्ष्मी उत्सुक झाली होती. सखू केव्हां भेटेल आणि तिला आपण केव्हां पोटाशीं आवळून धरूं असं तिला झालं होतं !

...नानासाहेबांच्या घरीं उतरायचं म्हणजे निर्मलाबाई आपणाशीं पूर्वीच्याच मोकळया मनानं वागतील किंवा नाहीं याचीहि लक्ष्मीला त्यावेळीं काळजी वाटत होती. मध्यंतरीं बाबूरावांच्या चमत्कारिक वागण्यामुळं उडालेला गोंधळ नीट समजून न घेतां त्यांच्या मनांत आपल्याबद्दल जी साशंकता निर्माण झाली होती, ती अजूनहि कांहीं उरली असेल कीं कसं, याचाहि तिला थोडाफार धाक वाटत होता ! ...आणि त्या तिच्याशीं कशाहि वागल्यातरी ती मात्र अगदीं खुल्या मनानं वागायचं ठरवूनच आपल्या घरून निघाली होती...,

सदानंदाचा फोन राहून राहून लक्ष्मीच्या कानांत घुमत होता... त्यावेळीं बाबूरावहि तिथं येऊन गेल्याचं ऐकल्याचं आठवतांच ती विशेष गंभीर झाली! आतां ते त्या ठिकाणीं पुन्हां आपणाला भेटतील तर काय काय परिस्थिति निर्माण होईल आणि त्या त्या परिस्थितींतून आपणाला कसं सहीसलामत बाहेर पडतां येईल, याची तिला विशेष काळजी वाटत होती...बाबूरावांकडून आतां तरी असलं कांहीं चमत्कारिकपणाचं वर्तन घडूं नये, अशी तिची मनापासूनची इच्छा असल्यामुळं ती स्वतःशींच पुटपुटली, "देवा, आतां तरी त्यांना बुद्धि दे! सारा जन्म संपायची वेळ आली, तरी असंच कुठंवर सोसायचं आणखी?"

नेहमींप्रमाणं प्रवासांत असतांना आई आपल्याशीं जशी बोलते तशी या खेपेला अजिबात न बोलतां गप्पच बसलेली बघून गोविंदा लक्ष्मीजवळ गेला. गळ्याभोंवतीं गुंडाळलेला रुमाल काढून त्यानं मनगटाभोंवतीं गुंडाळला आणि आपल्या आईला विचारलं, "कांहीं दुखतंय काग?"

गोविंदाचा प्रश्न कानावर येतांच लक्ष्मीनं चटकन् मान वर करून त्याच्याकडे पाहिलं आणि ती म्हणाली, "छे! कांहीं नाहीं...किती रे काळजी करतोस?"

"मग तूं अशी गप्प कां?"

"कुठं गप्प आहे?..."

लक्ष्मी इतरांशीं बोलत नव्हती तरी स्वतःशीं एवढावेळ खूप खूप बोलली होती...पण तें गोविंदाला कसं कळावं? म्हणून आईचं हें बोलणं ऐकून तो किंचित वावरला. त्यानं मोठ्या काळजीनं पुन्हां म्हटलं, "गप्प नाहींतर कशी ग! गाडींत बसल्यापासून एक अक्षर तरी बोललीस?"

"तुझं आपलं कांहींतरीच! नसत्या शंका मनांत आणतोस आणि मग बसतोस काळजी करीत!... तुला मी कितीदां तरी सांगितलं असेल कीं, तूं उगाच काळजी करूं नकोस म्हणून!... पण ऐकशील तर शपथ!...."

"मग तूं वागतेस तशी तर...."

" हो, मीच वागतें म्हणे तशी ! "

" नाहींतर काय ?...तीस चाळीस रुपये कां होईना शिकवण्या करून मी मिळवतों, तीस पस्तीस रुपये मला स्कॉलरशिप मिळते आणि शिवाय फीची भानगड नाहींच ! असं असतांना तुझं आपलं भावल्यांचं कंत्राट चालूच !... किती ताण पडतो तुला...पण तुला त्याचं कांहींच कसं नसतं ग ? "

" हं ! आजवर बसूनच होतें मी जशी कांहीं !... अरे, तुझं वय माझ्या जिवावर खुशाल हंसत खेळत उड्या मारायचं ! तूं कशाला नसते विचार करतोस ? "

" पण मला आपलं वाटतं कीं, माझी आई खूप दिवस आपणाला मिळावी. आतां तिला कसलासुद्धां त्रास होऊं नये...त्याला काय करूं मी ? "

खरं म्हणजे आपल्या मुलानं आपली एवढी काळजी घ्यावी याचं लक्ष्मीला मनापासून बरं वाटत होतं. नाहींतरी सखू सासरीं गेल्यानंतर आतां गोविंदाशिवाय दुसरं कोण तिची काळजी घेणार होतं ?... हें सर्व खरं असलं तरी तिची मनापासूनची इच्छा होती कीं तिच्या गोविंदानं-ज्याच्याकडे बघून तिनं साऱ्या यातना किंवा सारीं दुःखं आजवर सोसली त्या तिच्या मुलानं-कसलीहि काळजी न करतां मजेंत रहावं...पण गोविंदा नेमका याच्या अगदीं उलट वागत होता ! त्यामुळं बराच वेळ विचार केल्यानंतर लक्ष्मी म्हणाली, " आतां तूं एवढंच कर कीं..."

" काय ? "

" कीं, तूं माझ्याबाबत काळजी करायचं सोडून दे. मला काय वाटेल तें झालं तरी मी मरत नाहीं हें निश्चित !... मग उगाच कां भितोस ? वेडा कुठला ! "

त्यानंतर त्याच विषयावर कितीतरी वेळ तीं मायलेकरं बोलत बसलीं. त्या नादांत त्यांची गाडी पाटीलमळ्याच्या स्टेशनांत केव्हां शिरली, याची देखील त्यांना दाद उरली नाहीं. शेवटीं त्यांना घ्यायला म्हणून स्टेशनवर आलेले खुद्द बाबुरावच जेव्हां त्यांच्याजवळ येत फलाटावरून म्हणाले,

" तार वेळेवर मिळाली ना लक्ष्मी ? " तेव्हां कुंठ लक्ष्मी आणि गोविंदा भानावर येऊन गडबडीनं बसल्या जागची उठली. बाबूरावांना बघून आणि त्यांनीं विचारलेला प्रश्न ऐकून त्या दोघांनींहि मोठ्या विस्मयानं त्यांच्याकडे पाहिलं ! त्यामुळं बाबूरावच पुन्हां म्हणाले, " माझी तार मिळाली ना ? "

" तार !...नाहीं बाई !...कधीं केली होती !...आणि कोणत्या पत्त्यावर ! "

लक्ष्मी असं विचारीत होती तोंवर बाबूरावांनीं तिचं सामान खालीं उतरून घेऊन हमालाजवळ दिलं होतं !...लक्ष्मीबरोबरचं आणखी कांहीं सामान राहिलं नाहीं ना याची त्यांनीं गोविंदाजवळ खात्री करून, मग ते त्या दोघांना घेऊन टांग्याजवळ आले. त्यांनीं टांगा ठरवला आणि मग लक्ष्मीला व गोविंदाला त्यांत बसायला सांगून म्हटलं, " सकाळीं नानासाहेबांवरची शस्त्रक्रिया यशस्वी झाल्याबरोबर मी तार केली होती ! "

...टांगा चालू झाला. लक्ष्मी कांहींच बोलली नाहीं. टांग्यामागून सायकलवर येणारे बाबूराव आणि एवढा वेळ त्यांनीं दाखविलेली कमालीची आपुलकी बघूनच तिला मोठा विस्मय वाटत होता !... आणि म्हणूनच कावरी बावरी होऊन ती एकदां गोविंदाकडे आणि एकदां बाबूरावांकडे विलक्षण आश्चर्यानं बघत होती !...अतिशय दुःखाप्रमाणंच अतिशय आनंद झाल्यावरहि माणसाचा ऊर भरून येऊन तो जसा निःशब्द होतो, तशी तिची अवस्था होऊन गेली...ती गप्प होती तरी गोविंदा मात्र बडिलांशीं बोलत होता. नानासाहेबांची माहिती बाबूरावहि अगदीं आपुलकीनं त्याला सांगत होते !

दवाखान्याशेजारीं येऊन टांगा थांबतांच गडबडीनं नानासाहेबांना झोपवलं होतं त्या खोलींत लक्ष्मी गेली. भीतभीतच तिथं प्रवेश करून शांत पडलेल्या नानासाहेबांना तिनं हळूच विचारलं, "कसं वाटतंय आतां ?"

लक्ष्मी एवढ्या तांतडीनं भेटायला आली म्हणून नानासाहेबांना

आनंद झाला. डाव्या हातानं ठीक असल्याची तिला खूण केली आणि त्यांनीं गोविंदाला विचारलं,

" पुण्याची काय विशेष बातमी ?...गांधीजींची प्रकृति कशी काय आहे ? आज कांहीं कळलं त्याबद्दल ? "

तशा स्थितींतहि नानासाहेबांनीं केलेली ही चौकशी बघून लक्ष्मीला आणि गोविंदालाहि नवल वाटलं. मोठ्या आश्चर्यानंच इकडे तिकडे पहात गोविंदा म्हणाला, " तें सांगतों मग ! पण आधीं तुम्ही कसे आहांत तें कळायला हवंय आम्हांला...फार लागलं नाहीं ना ? "

हें ऐकून नानासाहेब मनापासून हंसले. त्यांनीं जेव्हां आपणाला बरं असल्याचं आणि आतां काळजी करण्यासारखं कांहीं नाहीं असं सांगितलं, तेव्हां लक्ष्मीला आनंद झाला. तिनं प्लॅस्टरमध्यें ठेवलेल्या नानासाहेबांच्या हातावरून हात फिरवीत विचारलं, " फार त्रास झाला असेल नाहीं ? "

" विशेष नाहीं !... चालायचंच !... बरं पण पुण्याची काय बातमी ? "

त्यावेळीं गांधीजी आगाखान राजवाड्यांत राजकीय कैदी म्हणून रहात होते...नेहमींप्रमाणं इच्छेविरुद्ध बऱ्याचशा गोष्टी घडल्या होत्या म्हणून त्यावेळीं त्यांनीं आमरण उपोषण केलं होतं...पण यावेळीं त्यांची प्रकृति अतिशय चिंताजनक असल्याची बातमी डॉक्टरांनीं जाहीर केल्यामुळं, प्रत्येक हिंदी माणसाला क्षणाक्षणाला काय घडेल तें ऐकायची विलक्षण उत्कंठा लागलेली होती...देशाच्या इतिहासांतील एक पेंचप्रसंग त्यावेळीं निर्माण झालेला होता !...काय वाटेल तें झालं तरी गांधीजी माघार घ्यायला तयार नव्हते आणि त्यांच्या अटी लौकर मान्य झाल्या नाहींत तर त्यांना मृत्यूच्या हवाली केल्याचं पाप ब्रिटिश सरकारच्या माथ्यावर फुटणार होतं !...आणि सरकारनं तें घेण्याची तयारीहि केली होती पण उघड तसं दाखवायचं मात्र नव्हतं !... सगळीकडचं वातावरण अगदीं तंग झालेलं !...देशांतील सर्व जनता आणि 'बेइमान झालों पुरा पुरा, मी देशाचा अपराधी खरा... ' असं मनापासून दुःख व्यक्त करणाऱ्या नगरच्या तुरुंगांतीलमोठमोठे पुढारी व इतर ठिकाणचेहि तुरुंगांतील

थोर स्त्री-पुरुष ह्या एकाच प्रश्नाचं उत्तर मनाशीं मिळवीत होते... प्रत्येकाला गांधीजींबद्दलची क्षणाक्षणाला घडणारी माहिती हवी होती...

नानासाहेबांनीं त्याच उत्कंठतेनं गोविंदाला हा प्रश्न विचारला तेव्हां तो म्हणाला, "आज सकाळीं जें सरकारी पत्रक निघालं आहे त्यांत गांधीजींना रात्रीं बरीच शांत झोंप लागली, असं डॉ. सुशीला नय्यर यांनीं म्हटलं आहे..."

त्यानंतर नानासाहेब आणखी कांहीं विचारणार तोंवर सखू एकदम तिथं आल्यामुळं त्या विषयाला कलाटणी मिळाली...

आई आणि भाऊ अचानक आलेली बघून ती आश्चर्यानं आणि आनंदानं लक्ष्मीजवळ पळत गेली. लक्ष्मीनं तितक्याच प्रेमानं लेकीला जवळ घेतलं....तिच्या अंगावरचं नऊवारी हिरवं पातळ, डोक्यावर व्यवस्थित असलेला पदर, गळयांतील दोन्हीं लहानमोठीं मंगळसूत्रं, पायांतील बारीकशी जोडवीं, आणि तोंडावरचा योग्य तो पोक्तपणा बघून लक्ष्मी समाधानानं म्हणाली, "बरी आहेस बाळ!" तितक्यांत राजेंद्रहि तिच्या पाठोपाठ तिथं आल्यामुळं गोविंदाशीं हस्तांदोलन करीत त्यानं मोठया आश्चर्यानं त्याला विचारलं, "हॅलोऽ कधीं आलास तूं!..." आणि लक्ष्मीहि त्याच्याबरोबर आल्याचं ध्यानांत येतांच जीभ चावून तो पुन्हां म्हणाला, "म्हणजे?...तुम्ही केव्हां आलां!... यानंतरच्या गाडीनं तुम्ही याल या समजुतीनं आत्तांच तर सदानंद स्टेशनवर गेला कीं!..."

● ● ●

## छे !.... तें शक्य नाहीं !

## २१

...अतिशय मोठ्या अशा एका नदीच्या पुलावरून आगगाडी चालली होती. गोविंदा आपल्या परीक्षेसाठीं निघाला होता...गाडीचा एक डबा असा होता कीं, तिथं एका कोपऱ्यांत बसलेल्या गोविंदाखेरीज आणखी कुणीचनव्हतं... परीक्षेसाठीं नेमलेलं पुस्तक हातांतून बाजूला ठेवून गोविंदानं खिडकींतून वांकून पाहिलं...लहानपणीं तो शाळेंत शिकला होता त्या गाण्याप्रमाणं 'कशासाठीं...पोटासाठीं...भक् भक्... ' करीत गाडी निघाली होती...एका सुंदर पुलावरून ती चालली होती...खालीं नदीचं पाणी संथपणानं वहातांना दिसत होतं...

...खिडकीचं दार एकाएकीं झाकलं गेलं...गोविंदानं घाबरून तोंड बाजूला केलं... हात बाजूला घेतांना दारांत बोट अडकल्यामुळं त्याला मार बसला...बोटांतून रक्त येऊं लागलं.... गोविंदा किंचाळला... 'काय झालं बाळ ?' कुठून तरी आवाज आला म्हणून गोविंदानं आजूबाजूला पाहिलं ... हाताच्या एका मुठी एवढ्या आकृतींत सुभाषबाबू त्याला खिडकीशीं दिसले ! ... डोळे उघडून, पुन्हां मिटून आणि पुन्हां उघडून गोविंदानं ती आकृति पाहिली...हळूहळू त्या आकृतीला मोठा आकार येत चालला !...प्रत्यक्ष सुभाषबाबूच त्याच्या शेजारीं येऊन बसले !...गोविंदा चटकन् उठला आणि त्यांना बालवीर

थाटाची सलामी देत म्हणाला, ' जयहिंद ! ' सुभाषबाबूहि आपल्या खड्या आवाजांत ' जयहिंद ! ' म्हणाले...त्यांनीं गोविंदाला जवळ घेतलं आणि त्याच्या कानांत ते हळूच म्हणाले, '...आतां परीक्षा संपली कीं, तूं माझ्या सैन्यांत ये... आझाद हिंद फौज !... हो, तिथं तूं ये !... देशाच्या भोंवतीं परचक्राची पडलेली दास्यशृंखला आतां आपण तोडायला हवी... 'चलोदिल्ली'चा जयघोष करायला हवा... तूं, आणि तुझे मित्र...आजचीं मुलं, आजचे तरुण, हेच उद्याचे राष्ट्राचे पाईक !... देशासाठीं प्राण पणाला लावायला शिका .... '

...गाडीभोंवतीं एकाएकीं गलका झाला...क्षणार्धांत एकाद्या सुईसारखा आकार घेऊन सुभाषबाबू तिथून पसार झाले...गोविंदानं मोठ्या आश्चर्यानं खिडकींतून डोकावून पाहिलं...सुभाषबाबूंचा सुगावा लागल्यामुळं त्यांना पकडायला बाहेर पोलीस जमले होते ! ... आपली मूट उघडीत सुभाषबाबूंनीं त्यांच्यावर कसली तरी धूळ टाकली... एकाएकीं प्रचंड वादळ निर्माण झालं ! ...पोलिसांच्या हातांवर तुरी देऊन सुभाषबाबू कुठंतरी अज्ञातस्थळीं निघून गेले... पोलिसांमध्यें गोंधळ उडाला ! ' पळाऽ पळाऽऽ ' करीत पोलीस धावले...आणि...

गोविंदानं भीतभीतच तोंडावरचं पांघरूण बाजूला फेकलं आणि तो गडबडीनं उठून बसला. त्यानं घाईघाईनं आजूबाजूला पाहिलं... तिथं त्यानं हा स्वप्नांत पाहिलेला कसलाच प्रकार नव्हता ! ... तो थोड्यावेळापूर्वी झोपला होता तीच ती खोली होती... मात्र अंगणांत जमलेलीं मुलं बराच गलका करीत हंसत खिदळत असल्याचं त्याच्या कानावर त्यावेळीं आलं. म्हणून कपाळावर आलेले केंस मार्गे सारून आणि पायाशीं लोळणारा धोतराचा सोगा खांद्यावर टाकून व खिडकीच्या गजांना धरून त्यानं खालीं डोकावून पाहिलं तों तिथं बरींच लहान लहान मुलं गोंगाट करीत उभी होती.

लक्ष्मी पुण्याला राहत होती त्या घरासमोर एक मोठं आंब्याचं झाड होतं. त्या झाडाला अगदीं चिकटून तिची खोली होती. त्या खिडकीच्या मध्यापर्यंतच गजांची सोय असल्यामुळं वरचा भाग मोकळा होता ! त्यामुळं

त्या खोलींत पडलेल्या रंगीबेरंगी भावल्या बघून कितीतरी बानरं घरांत एकदम आंत शिरत !...आणि एखादी भावली उचलून ' उ ऽ ळू ऽ ऽ प ...' करीत पुन्हां झाडावर चढत !...आतांहि तसंच झालं होतं. बानरानं भावली पळवून आणली होती आणि तें झाडावर न चढतां आतां घराच्या छपरावर बसलं होतं ! त्याचा सुगावा लागतांच 'भावली! ...ताई , तुमची भावली पळवली बानरानं !...अरे पळा ऽ ऽ ती बघा गंमत ! !' असं ओरडत तीं लहान लहान मुलं तिथं गोळा झालीं होतीं. ...बानराच्या हातांतील भावली आणि त्या बानराचं त्या भावलीकडे निरखून पहाणं या गोष्टी मुलांना अगदीं गमतीच्या वाटत होत्या; आणि म्हणून बानरानं भावली खालीं टाकावी यासाठीं त्यांचा गोंधळ उडाला होता !...

मुलांची गडबड कशासाठीं चालली होती हें जेव्हां गोविंदाला समजलं, तेव्हां तो खालीं आला आणि त्यानं तें बानर पाहिलं ! बानर मुलांच्याकडे दांत विचकून पहात होतं...गोविंदालाहि तें बघून हसूं आलं आणि लक्ष्मीला हांक मारून तो म्हणाला, 'आई, तुझ्या भावल्या कुठं कुठं निघाल्या पाहिल्यास ! ...'

डेक्कन जिमखान्याच्या आमराई कॅंपमध्यें लक्ष्मीची ती जागा होती. तिथं तिसरा प्रहर झाला कीं, बरीच मुलं झाडाखालीं खेळायला म्हणून जमा होत असत...मधून मधून लक्ष्मी त्यांना खाऊ देत असे...एखादी मुलगी हट्ट धरून रडूं लागली कीं, तिला तिच्याकडून हमखास भावली मिळायचीच ! त्यामुळं ह्या मुलांची आणि तिची बरीच दोस्ती जमली होती...लक्ष्मी समोर आलेली दिसतांच तीं मुलं टाळ्या पिटून ओरडलीं, " ताई, ती बघा गंमत ! "

बानरानं भावली पळवावी यांत लक्ष्मीलाहि गंमत वाटली म्हणून त्यावेळीं छपरावरून उडून झाडावर बसलेल्या बानराकडे पहात ती त्या मुलांना म्हणाली, " अरे त्यांत एवढं कसलं नवल वाटलं तुम्हांला ? तुम्ही भावलीनं खेळतां नि मग त्यानंच कां खेळूं नये ! अं ! ...त्यालाहि गंमत वाटली म्हणून नेली त्यानं भावली ! " ...तितक्यांत बानराच्या

हातून चुकून भावली निसटली आणि खालीं पडली !...मुलांना तेंच हवं होतं !...' भावली, भावली ' करून त्यांनीं भरपूर गोंधळ माजवला... बिचारं वानर मात्र त्या गडबडीनं घाबरून केव्हांच पळून गेलं होतं !

भावली खालीं पडतांच तिथं जमलेल्या मुलांपैकीं एका मुलीनं ती चटकन उचलली आणि ती लक्ष्मीला म्हणाली, " मला असूं दे ! "

लक्ष्मी काय उत्तर देणार म्हणून सगळया मुलांची नजर तिच्याकडे वळली...लक्ष्मीनं तें ओळखलं आणि त्यामुळं कुणालाहि नाराज करायची वेळ येऊं नये म्हणून ती म्हणाली, " अंहं ! तुला एकटीला पाहिजे तर मी पुन्हां दुसरी देईन ! ही सगळ्यांना खेळायला घ्या. पण भांडायचं नाहीं हं !..." हीं मुलं म्हणजे लक्ष्मीच्या भावल्यांची मोठी जाहिरात होती ! त्यांना तिचं म्हणणं पटलं...त्यामुळं तिथल्या तिथंच एकमेकांत समेट होऊन तीं मुलं खेळायला गेलीं, तेव्हां गोविंदानं आपणाला पडलेलं मघांचं स्वप्न लक्ष्मीला सांगितलं...त्यावेळीं देशांतील प्रत्येक माणसाला सुभाषबाबू विषयीं, त्यांच्या आझादहिंद फौजेविषयीं, त्यांच्या भूमिगत जीवनाविषयीं आणि एकंदर धाडसाविषयीं नेहमींच कुतुहल वाटत होतं...'तुम मुझे खून दो, मैं तुमको आझादी दूंगा' असं म्हणणाऱ्या सुभाषबाबूंना सामील होऊन, रक्ताच्या शाईनं सही करून, शेंकडो सैनिक पाठिंबा देत होते... तीं वर्णनं प्रसिद्ध झालीं कीं, लोक तीं वाचायला पुढयांतील जेवणाचं ताट बाजूला सारून उठत असत ! ...तें स्वप्न म्हणजे ह्याच कल्पनेचं प्रतिबिंब होतं असं गोविंदाला पटवून देत लक्ष्मी म्हणाली, " देशांतील प्रत्येक माणूस आतां स्वतंत्र व्हायला हवा आहे. स्वातंत्र्याची जाणीव प्रत्येकाला झाली, तरच आतां येणारं स्वातंत्र्य आपण टिकवूं शकूं..."

बदलत्या काळाप्रमाणं विचारांना चालना देणाऱ्या आपल्या आईबद्दल गोविंदाला नितांत आदर होता. अमर्याद प्रेम वाटत होतं. तिचे उरलेले दिवस अत्यंत सुखासमाधानांत जावेत अशी त्याची मनापासूनची इच्छा होती...इंजिनियरिंग कॉलेजांत तो बी. ई. ला पहिला आल्यामुळं मिळालेली फेलोशिपची जागा त्याला या दृष्टीनं मोलाची वाटत होती... आपण कमावलेल्या पैशांतून एक टुमदार घर बांधून आईला आरामांत

ठेवायचं असा त्याचा विचार होता. म्हणून तो आपल्या आईला ती तसं बोलतांच म्हणाला, " अगदीं खरं बोललीस...आतां मी घर बांधलं कीं त्या घराला स्वराज्यांतील कमाई म्हणून काय नांव देणार ठाऊक आहे ! ... "

" काय रे बाळ ? " लक्ष्मीनं उत्सुकतेनं विचारलं तेव्हां गोविंदा म्हणाला, " छे बुवा ! आत्तांच नाहीं सांगत. आधीं घर तर मिळूं दे..."

● ● ●

" ए आईऽऽ घे ग्राई याला ! किती त्रास देतोय पाहिलास ? "

गोविंदाच्या लग्नाची वेळ जवळ येत चालली तशी करवली म्हणून सखूची धांदल जास्तच वाढली. कडेवरचा तिचा संजीव देखील त्यावेळीं तिला सांभाळणं जिकिरीचं झालं. म्हणून अंगावरच्या शालूचा पदर सावरीत ती असं म्हणाली तेव्हां लक्ष्मी कौतुकानं तिच्याकडे पहात म्हणाली, " आण त्याला...पण राहील ना ग माझ्याजवळ ? "

" न रहायला काय वेडा आहे तो ! त्याला आणि त्याची आजीच फार आवडते आमच्यापेक्षां ! "

सखूच्याऐवजीं राजेंद्रच असं बोलल्यामुळं " तर तर ! " असं म्हणत लक्ष्मीनं संजीवला नीट मानेवर टाकला आणि ती येणाऱ्या मंडळीच्या स्वागतासाठीं म्हणून तिथून बाहेर गेली...

टाळ्यांच्या गजरांत वधूवरांमधील अंतरपाट दूर झाला. वधूवरांनीं एकमेकांना हंसतमुखानं आणि सलज्ज नजरेनं लग्नमाळ घातली. चोहोंकडून त्यांच्यावर अभिनंदनाचा वर्षाव झाला...गर्दीतून वाट काढीत सदानंद गोविंदाजवळ आला आणि म्हणाला, " बाहेर मंडळी वाट पाहताहेत. चल तिकडे. "

मित्रमंडळींचे नजराणे आणि अभिनंदन स्वीकारीत गोविंदा बाहेरच्या मंडळींत आला तों बाबूराव प्रत्येक माणसाला आनंदानं हार आणि गोटा देत होते !... नानासाहेब आणि राजेंद्र आल्या गेल्याचं स्वागत करीत होते आणि गोविंदाचा मामा, महादेव, प्रत्येकाला नारळ

देण्यासाठीं म्हणून दरवाजावर उभा होता ... सगळेजण अत्यंत सुखासमाधानानं एकत्र वावरत असलेलीं बघून लक्ष्मीला अतिशय आनंद झाला... आपल्या मुलाचं लग्न व्यवस्थित पार पडलं, म्हणून तिनं त्यावेळीं समाधानाचा निःश्वास सोडला ... आपल्या आयुष्यांतलि एक महत्त्वाचा टप्पा आपण यशस्वी रीतीनं ओलांडला, म्हणून तिला आपल्यावरचा बराचसा भार हलका झाल्यासारखं वाटलं.

अलिकडे बाबूराव लक्ष्मीकडेच येऊन राहिले होते. त्यांनीं घरांत पाऊल टाकतांना ' मी आतां पूर्वीचा बाबूराव राहिलों नाहीं ' असं तिला सांगून टाकलं होतं. एवढंच नव्हे तर आतांशीं ते सर्वांशीं अत्यंत प्रेमळपणानं वागतहि होते !...लक्ष्मीरोडवरील एका मोठ्या पुस्तकाच्या दुकानांत ते मॅनेजर म्हणून काम पहात होते. त्यामुळं महिन्याकाठीं निदान शंभरसव्वाशें रुपये तरी लक्ष्मीच्या हातावर ते आणून ठेवीत ! मधून मधून सखूला आग्रहानं माहेरी आणून बाबूराव आतां तिला भारी भारी कपडे घेत होते आणि आतां तिला मुलगा झाल्यापासून तर त्यांनीं त्याला चारदोन तोळ्यांचे डागहि केले होते !... एखादं चांगलंसं शर्टचं नाहींतर कोटाचं कापड कुठं दिसलं कीं, ते आतां गोविंदासाठीं खरेदीत होते, आणि दिवसभर भावल्या करण्यामुळं आलेला थकवा घालवीत संध्याकाळीं शांत पडलेल्या लक्ष्मीलाहि मोठ्या प्रेमानं म्हणत होते, " कशाला एवढा त्रास घेतेस ! मी असतांना तुला मिळविण्याची काय जरूर ? ... " आणि आतां सून आल्यापासून तर आपलं घर चार माणसांत कसं उठून दिसेल यासाठीं नवं नवं सामान आणण्यांतच त्यांचा बराचसा वेळ जात होता ! ... त्यामुळं त्यांच्या घरांतल्या माणसांना वाटत होतं कीं, खरंच बाबूराव आतां बदलले हं ! ... पण त्या वाटण्याबरोबरच पुन्हां त्यांचा बेत केव्हां फिरेल याची धास्ती मात्र प्रत्येकाला वाटत असल्यामुळं जो तो त्यांच्याशीं वागतांना 'नको बाबा. दिलेल्या सवलतीचा जास्त फायदा घेण्यांत मुळींच अर्थ नाहीं ! असंच म्हणत होता !

● ● ●

" नानासाहेब,

कितीतरी दिवसांत मिळालं नव्हतं एवढं स्वास्थ्य आज माझ्या मनाला मिळालंय म्हणानात ! आणि म्हणूनच तुम्हांला चार ओळी लिहायला म्हणून बसलेंय. पण...

हातांत टाक घेतलाय, समोर कागद आहे. मनांत खूप खूप लिहावं असं आहे, पण प्रत्यक्ष काय लिहावं तेंच सुचेनासं झालंय् !... खरंच काय बरं लिहूं ?...

हो, आज माझी पक्की खात्री झालीय कीं, माणसापेक्षां त्यानं लिहिलेलं पत्रच आधिक बोलकं असतं म्हणून !... त्या दिवशीं गोविंदाच्या लग्नाचा सोहळा बघून तुम्ही म्हणालात ' ताई, फार भाग्यवान अहांत तुम्ही ! ' कदाचित तें खरंहि असेल. पण माझी मात्र समजूत अशी आहे कीं, ही जी मी म्हणून आज तुम्हां सर्वांना दिसते आहे त्याचं बरंचसं श्रेय तुमच्याकडे जातं...माझ्या घरांतला त्रास असह्य झाल्यामुळं ज्या दिवशीं लहान लहान पोरं घेऊन मी घराबाहेर पडलें, त्या दिवशीं जगाची कल्पनाहि नसतांना मी कुठंतरी जायचं म्हणून निघालें होतें... अनाथ बालकाला कुणीतरी प्रेमानं जवळ करावं नि धीर द्यावा त्याप्रमाणं पूर्वीची कांहीं एक ओळख नसतांना तुम्ही व सदानंदांनीं मला जवळ केलंत ! ...खरंच किती उपकार आहेत तुमचे माझ्यावर म्हणून सांगू ?...नाहीं नाहीं, त्यावेळीं तुम्ही भेटला नसतां, सदानंद भेटलं नसते, तुमचे बालवीर धाऊन आले नसते तर !...तर कदाचित यापूर्वीच मी जगाला आणि जगानं मला कायमचा निरोप दिला असतां !...कुठंतरी बणबण करीत भटकलें असतें मी !...चार घास खाण्याइतपत, कुणीं सांगावं मी मिळवूंहि शकलें असतें !... पण... तुम्ही कांहींहि म्हणा, मी मात्र खात्रीनं म्हणूं शकतें कीं, माझ्या मुळांतल्या बंडखोर वृत्तीला तुम्हीच तावून सुलाखून तेजस्वी बनवलंत. हंसतमुखानं जगायची दीक्षा मला सदानंदानंच दिली. खेळीमेळीनं वागण्यांत आनंद असतो हें तुमच्या माधुरीनंच माझ्या मुलांना प्रेमानं जवळ करून मला दाखविलं...

माझं स्वतःचं मन खंबीर होतं. आजहि आहे आणि पुढंहि तें तसंच

राहील. पण तें जास्त खंबीर बनविण्यासाठीं तुम्ही रजपूतांच्या बाण्याला जागून माझ्याशीं रक्षाबंधनानं जें बंधुप्रेमाचं नात जोडलंत, त्यामुळंच मी आणखी खंबीर बनत गेलें...तुमची, तुमच्या शेंकडों बालवीरांची ओवाळणी माझ्या पाठीशीं आहे, हें मी कसं नाकबूल करूं ?

सुदैवानं सखूच्या लग्नामुळं आपलं नातं अधिक दृढ झालं...आपला स्नेहसंबंध विशेष बळकट झाला...खरोखरच त्यामुळं फार समाधान वाटतं मनाला...

खरंच, आपण सगळे कुठचे कोण ! पण अचानक एकत्र येतों काय नि आपला ऋणानुबंध असा वाढतो काय ? ... याचंच मला राहून राहून कुतूहल वाटतं !

आतांशीं हे आम्हा सर्वांशीं फारच प्रेमानं आणि आपुलकीनं वागताहेत. देव त्यांना पुन्हां दुर्बुद्धि न देवो म्हणजे झालं...तूर्त तरी माझ्या संसाराला दृष्ट लागणार नाहीं अशी खात्री आहे...."

मनांत आलं तें सारं लिहून झाल्यावर आणखी कांहीं लिहावं कीं काय याचा विचार करीत लक्ष्मीनं हातांतला टाक खालीं ठेवला. तितक्यांत गोविंदा तिथं येत तिला म्हणाला, " आपल्याला नव्या घरीं नाहीं का जायचं आज ? मी केव्हांची वाट पहातोंय तिकडे ! आणि तूं आपली इथंच ! "

" आलेंच हं ! " असं म्हणत लक्ष्मी तिथून उठली आणि सही करून तें पत्र बंद करीत तिनं गोविंदाला सांगितलं, " तिकीट लावून आणि नानासाहेबांचा पत्ता लिहून एवढं पोस्टांत टाक न विसरतां. "

" म्हणजे ? इथल्याइथंच पोस्टानं पत्र द्यायचं ? ...अग, आतां येतील खुद्द नानासाहेबच सखूला घेऊन ! ही बघ सखूची तार आलीय तशी..."

नव्या घरीं जायचं म्हणून गोविंदाला फार हौस वाटत होती. त्यानं स्वतःच्या मिळकतीवर आज छोटासा बंगला बांधला होता. टिळक रस्त्याच्या नव्या भागांत ही जागा त्यानं घेतलेली आणि तिथंच हवा चांगली म्हणून मनाप्रमाणं घराची आंखणीहि केलेली. त्यामुळं त्या

घरांत जायला तो फार उतावीळ झाला होता. तशांतच उद्यां स्वातंत्र्य-दिन असल्यामुळं मुहूर्तहि आयता चांगला मिळालेला ! म्हणून अशा आनंदांत आपली बहीण आणि नानासाहेब जवळ असावेत यासाठीं त्यानं त्यांना तार करून बोलावलं होतं...पण तें लक्ष्मीला ठाऊक नव्हतं! म्हणून ती बातमी ऐकतांच ती गोविंदाच्या पाठोपाठ तिथून बाहेर पडत कौतुकानं म्हणाली, " मला रे काय ठाऊक हें !..."

गोविंदाच्या पाठोपाठ लक्ष्मी जेव्हां नव्या बंगल्याकडे आली, तेव्हां त्या बंगल्याचा थाट बघून तिला अत्यंत समाधान झालं. स्वातंत्र्यदिनाच्या मंगलप्रसंगीं त्या बंगल्याचं उद्‌घाटन असल्यामुळं अगदीं समोरच्या बाजूलाच " स्वातंत्र्य " हीं अक्षरं संगमरवरी दगडावर कोरलेलीं दिसत होतीं. दारावर सुंदर तोरण लोंबत होतं आणि आंत भरपूर उत्साही वातावरण खेळत होतं...

घर संपूर्ण बांधून झाल्याशिवाय लक्ष्मीनं तिथं येतां कामा नये अशी गोविंदाची इच्छा ! त्यामुळं आज ती घरांत आल्याबरोबर दरवाजाच्या नव्या पद्धतीच्या दारापासून तों एकजात सारा कोनान् कोपरा गोविंदानं तिला हिंडून दाखवला ! त्यावेळीं पराकोटीचा आनंद त्याच्या तोंडावर ओसंडत होता...

तो बंगला लहानसाच होता खरा पण आंतील सगळी रचना मात्र सुखसोईनीं सुसज्ज अशी होती. सगळीकडे भिंतीवर फिकट निळा रंग आणि दारावर व खिडक्यावर निळसर पडदे लावलेले दिसत होते. आंत गेल्याबरोबर समोरच्या बाजूला दिवाणखान्यासारखी मोठी प्रशस्त खोली होती. तिथं रेडिओचा एक लहानसा सेट, दोन तीन सुंदर कोच, एक आरशाचं कपाट आणि सुंदर टेबल व खुर्च्या दिसत होत्या...ह्या खोलीच्या उजव्या भागाला गोविंदानं आपल्या वडिलांसाठीं खोली ठेवली होती आणि तिथं त्यांना लागतील त्या सोई तो करून देणार होता. डाव्या हाताला त्यानं लक्ष्मीची खोली तयार केली होती. तिथं एका सुंदरशा काचेच्या कपाटांत लक्ष्मीनं केलेल्या भावल्या सुरेखानं, गोविंदाच्या पत्नीनं, सौंदर्याकृति निर्माण होईल अशा थाटांत मांडलेल्या

होत्या. जवळच एक पलंग होता. लहानशा स्टुलावर विणकामाच्या सुया आणि लोकर दिसत होती आणि खिडकी शेजारीं एक आराम खुर्ची मांडून तिथं पडलं असतां समोर दिसतील अशा सुंदर देखाव्यांच्या प्रतिमा भिंतीवर टांगल्या होत्या...गोविंदानं आपली स्वतःची आणि सुरेखाचीहि खोली सुंदर सजवली होतीच. शिवाय, सैंपाकघर, न्हाणीघर, बंगल्याभोंवतालची बाग वगैरे बंगल्याचा इतर भागहि डोळयांत भरेल असा काळजीपूर्वक बांधून निघालेला होता.

गोविंदा स्वतःच इंजीनियर असल्यामुळं बंगल्याचा उठाव जितका मनोवेधक करतां येईल तितका करण्याची त्यानं काळजी घेतली होती.

गोविंदाच्या ह्या उत्साहाप्रमाणंच साऱ्या पुण्यांत आनंद नांदत होता. गल्लोगल्लीं प्रशस्त आणि आकर्षक कमानी उभारून सारे लोक नव्यानं उगवणाऱ्या स्वराज्यसूर्याच्या स्वागताच्या तयारींत होते. प्रत्येकाच्या दुकानासमोर त्या त्या दुकानांतील नेहमींच्या मालाप्रमाणं बाहेरच्या बाजूला उभारलेल्या कमानींतून मालाची मांडणी झालेली होती...भांडीं-आळींत तर सर्वांत आकर्षक देखावा दिसत होता. सोन्या मारुतीपासून स्टेशनकडे गेलेल्या रस्त्यावर नुसत्या बंबांचीच एक कमान तर नुसत्या घागरींचीच एक कमान किंवा नुसत्या टिपांचीच एक कमान....अशा अनेक कमानी दिसत होत्या आणि त्या कमानींच्या वरच्या बाजूला एका ओळींत पितळेच्या बादल्या अडकवलेल्या होत्या !...विजेच्या लखलखाटांत प्रत्येक प्रकारच्या मालांचा उठाव असाच चित्तवेधक रीतीनं केलेला सर्वत्र दिसत होता...

शनिवारवाड्याचा दिमाख तर त्यावेळीं मराठ्यांच्या वैभवाची साक्ष पटवीत होता असं म्हटलं तरी चालेल ! असंख्य दिव्यांची माळ शनिवारवाड्याचं सौंदर्य रेखीत होती. आणि त्या अलौकिक सौंदर्यापुढं आपल्या तेजाचा दिमाख अखिल पुण्यनगरीला दाखविणारा अशोक-चक्रांकित तिरंगी ध्वज साऱ्या जनतेचा मानाचा मुजरा स्वीकारीत तिथं हंसत मुखानं उभा असलेला दिसत होता...

पुण्यांतील सारीं लहान मोठीं माणसं मोठ्या खेळीमेळीनं आणि

अतिशय उत्साहानं आपल्या पुण्यांतील हें स्वातंत्र्याचं स्वागत पहात गल्लोगल्लीं फिरत होतीं...त्या सर्वांचा उत्साह अपूर्व होता ! ... स्वातंत्र्याची तहान लागलेलीं माणसं तें येतांक्षणींच त्याच्या स्वागतासाठीं किती उत्सुक होतात याचं तें एक प्रतीक होतं...हिंदी स्वातंत्र्याचे मानकरी म्हणून मिरविणारे गांवोंगांवचे नागरिक त्याच्या स्वागताला किती पात्र आहेत याचं ब्रिटिश जनतेला दिलेलं हें एक प्रकारचं आवाहन होतं ! ...

त्या दिवशीं रात्रीं बरोबर बारा वाजून एक मिनिटानं स्वातंत्र्याचा जयघोष नभोवाणीवर निनादला...त्याच क्षणाला स्टेशनवरच्या आगगाड्यांनीं शीट दिली. ठिकाठिकाणीं चौघडा वाजूं लागला. पोलिसांनीं तिरंगी ध्वजाला तोफांची सलामी दिली. घरोघरचीं मुलं 'जय हिंद' करीत नाचूं लागलीं...सगळीकडे आनंदी आनंद झाला...

पृथ्वीवरचं हें समाधान देवादिकांनाहि अलौकिक वाटलं असावं !... कारण त्याचवेळीं आकाशांत ढग जमूं लागले, वीज लकाकूं लागली आणि ह्या आनंदांत सामील होण्यासाठीं जलधारांचा सर्वत्र वर्षाव होऊं लागला...पारतंत्र्याचं किल्मिष धुतलं गेलं... !

त्या दिवशीं, स्वातंत्र्य दिनाच्या दिवशीं, घरोघरीं पक्वान्नं झालीं... दारोदारीं गुढ्या उभारल्या गेल्या...

" घराघरांत आरास झाली, आज देशांत दिवाळी आली "

असंच सर्वांना वाटूं लागलं...

स्वराज्याच्या आनंदाचं करतां येईल तितकं आविष्करण चोहोंकडून केलं गेलं...

संध्याकाळच्या वेळीं नानासाहेब, बाबूराव, सदानंद, सखू, राजेंद्र, गोविंदा वगैरे सर्वजण बंगल्यासमोरच्या अंगणांत गप्पा मारीत बसलीं होतीं. अशा या मंगल प्रसंगीं देशाची एकंदर परिस्थिति लक्षांत घेतां आज सुभाषबाबू हवे होते .याबद्दल त्यांच्यांत बोलणं चाललं होतं... सखूच्या संजीवला मांडीवर घेऊन लक्ष्मी पर्वतीवर उडणारं दारुकाम

दाखवीत होती. क्षणाक्षणाला रंग बदलून तिरंगी ध्वज तयार करणारी व जमिनीपासून खूप उंच जाऊन वेगानं खालीं येणारी ती कलाकृति बघून संजीव आनंदानं टाळ्या पिटीत होता ! लक्ष्मी कौतुकानं त्याच्याकडे पहात होती. बोलतां बोलतां बाबूराव म्हणाले, " नानासाहेब, खरंच, फार चुकलों मी...लक्ष्मीला भारी त्रास दिला...आज मला त्याचा पुरेपूर पस्तावा होतोय !..."

उशीरां कां होईना माणसाला आपण केलेल्या चुकीची जाणीव झाली तरीहि हिताचं होतं हें जाणून लक्ष्मीच म्हणाली, " झालं गेलं तें ! आतां कशाला तेंच तेंच बोलून दाखवतां ?..."

त्यावर गोविंदा लक्ष्मीजवळ गेला आणि लहान मुलाप्रमाणं तिला बिलगून म्हणाला,

" आज एक गोष्ट ऐकशील तूं माझी ? " लक्ष्मी आपल्या मुलांसाठीं वाटेल तें करायला तयार होती. त्यामुळं नानासाहेब म्हणाले, " विचारतोस कशाला ? काय आहे तें बोल ना स्पष्ट ! "

अभिमानानं आपल्या बंगल्याकडे पहात गोविंदानं सांगितलं, " आतां मी मिळवतों. आपलं सर्वांचं सहज भागूं शकेल एवढं कमावण्याची माझ्यांत ताकद आली आहे...तेव्हां आतां आईनं या घरांत खुशाल आराम करावा....कसलंहि काम करूं नये. अगदीं भावल्यांचं सुद्धां !...तिनं आतां आपलं उरलेलं आयुष्य सुखांत घालवावं. "

" आणि मी सुद्धां तेंच म्हणेन. आतां मी सुद्धां पैसे कमावतोंच कीं ! तेव्हां हिनं खुशाल मजेंत रहावं. कशाला दगदग करावी ? "

गोविंदानंतर लगेच बाबूरावांनींहि ही इच्छा दर्शविल्यामुळं नानासाहेब म्हणाले, " काय ताई, आतां मात्र खरंच आरामांत रहायला हरकत नाहीं तुम्हाला. "

हें ऐकून लक्ष्मी हंसली. त्यावेळीं तिच्या तोंडावर चमकणारं समाधान दिव्यांच्या उजेडांत सर्वांना दिसलं...पण संजीवला उचलून मांडीवर घेत गंभीर पणानं लक्ष्मीनं उत्तर दिलं, " छे ! ...तें शक्य नाहीं!...माझे

हात पाय चालताहेत तोंवर मी कष्ट हे करणारच...कुणी सांगावं पुढं काय काय प्रसंग येतील !...माझं मलाच पाहिलं पाहिजे..."

लक्ष्मीचा हा करारीपणा बघून बाबूराव ओशाळले...सर्वांनाच लक्ष्मीच्या ह्या उत्तरानं तिच्याबद्दल विशेष अभिमान वाटला.

नानासाहेबांना तर कल्पनेच्या बाहेर आनंद झाला. ते चटकन् म्हणाले, "शाबास !"...लक्ष्मीला आजवर आपण फारच त्रास दिला, तिला नाहीं नाहीं त्या प्रसंगांतून जायला भाग पाडलं आणि म्हणूनच ती तसं म्हणाली हें बाबूरावांनीं ओळखलं...त्यामुळं कौतुकानं तिच्याकडे पहात ते अभिमानानं म्हणाले, " खरंच, तूं अजिता आहेस...तुझ्यावर हजारों संकटं आलीं तरी तूं अजिताच राहिलीस !...आणि सुख पुढं चालून आलं असतांना देखील आज तूं पुन्हां तेंच सिद्ध करून दाखवलंस !...धन्य आहे तुझी !...अजिता !...होय, अजिताच...खरंच, अखेर अजिता ठरलीस तूं लक्ष्मी !..."

